श्री

# विग्रहकोश

हा ग्रंथ 704

वेदशा० रा० रा० गोपाळशास्त्री घांटे

यांजपासून करवून

मुंबईंत

बापूहर शेट देवळेकर

यांणीं

आपल्या छापखान्यांत छापिला.

आवृत्ति १ ली.

शके १७८९

ता० १ सप्तंबर सन १८६७

# श्री
# प्रस्तावना.

हा विग्रहकोश करण्याचा मुख्य उद्देश असा आहे कीं, संस्कृत शिकलेले व न वीन शिकणारे लोक या सर्वांस अमरकोशांतील शब्दांचे विग्रह व त्यांचे अर्थ हे फार लवकर समजावे. ते विग्रहार्थ वैयाकरणाखेरीज पुष्कळ संस्कृत जाणणारे अ सले तथापि त्यांस विग्रह न समजल्यामुळें, पुराणादिग्रंथांचा अर्थ बराबर ध्यानां त येण्यास फार आयास पडतो एवढेंच नव्हे; तर वैयाकरणाला ही प्रसंगीं शब्दोत्प त्तीला मुख्य कारण जो धातु तो व त्याचा अर्थ त्यांची स्फूर्ति न झाल्यामुळें ग्रंथ लापनेला फार अडचण पडत्ये ती दूर होऊन आबालवृद्ध संस्कृतेच्छूंला विग्रह समजून शब्दार्थ चांगला करतां यावा इतकाच आहे.

अमरकोशांतीलच सर्व शब्दांचे विग्रह करण्याचें कारण जरि कोश बहुत आहे त तथापि अमरकोश हा त्यांमध्यें सर्वांशीं मुख्य व अभ्यासी लोक तोच प्रथम प ढतात. आणि या कोशांतील शब्दांचे विग्रह करण्यास एक रामाश्रमी ह्मणून सर्व मान्य अशी टीका व दुसरी लिंगसूरिकृत टीका आहे त्या दोनहि टीका अमरांती ल विग्रह करण्यास साधन आहेत असें मनांत आणून त्या दोन टीकांच्या आश्र यानें हे सारे विग्रह केले आहेत. आतां त्या टीकांमध्यें व्याकरणाचा विचार फा र आहे तो ग्रंथ विस्ताराच्या भयानें या ग्रंथांत लिहिला नाहीं.

रामाश्रमीवरून विग्रहार्थोपयोग जो होतो तो सर्वांस होत असतो असें ना हीं कारण कीं, तो ग्रंथ पाहण्यास संपूर्ण सिद्धांत कौमुदी ह्मणावी तेव्हां ती टीका बराबर समजून विग्रहार्थ समजतात. कौमुदीची माहिती नाहीं अशा व्युत्पन्नांनीं ती टीका पाहिली तथापि स्पष्टपणें विग्रहार्थ समजत नाहींत. या ग्रंथावरून तर अशा अडचणींत लोकांनीं न पडतां आबालवृद्धांस विग्रह समजतील.

या ग्रंथांत मराठी भाषेनें विग्रहांचे अर्थ काव्य पद्धतीनें लिहिले आहेत तेणें करून केवळ प्राकृत लोकांलाहि संस्कृत शब्द व त्यांची अर्थव्युत्पत्ती हीं सुलभ रीतीनें गुरूला श्रम दिल्यावांचून समजतील.

कित्येक शब्दांविषयीं अमुक शब्दाचा हा विग्रह केला परंतु या विग्रहापासून हाच अर्थ निष्पन्न होतो हें कशावरून असा संशय उत्पन्न न व्हावा ह्मणून विग्रहा पुढें शब्दोत्पत्तीला मुख्य कारण जो धातु तो व त्याचा अर्थ हे लिहिले आहेत त्या योगानें तो संशय येणार नाहीं·

या ग्रंथाला विग्रहकोश हें नाव देण्याचें कारण हेंच आहे कीं, यांत सर्व शब्दांचे विग्रह दाखविले आहेत· विग्रह ह्मणजे वृत्यर्थावबोधक वाक्याचें नाव तीं वाक्यें दोन प्रकारचीं एक लौकिक आणि दुसरें अलौकिक त्यांतून अलौकिक विग्रहवाक्य दाखविण्याचा प्रकार असा आहे कीं, अक्षराणां विन्यासः या दोन पदांच्या समासवृत्ति विवक्षाकालीं अक्षर आम् विन्यास सु असें दाखवितात· आणि अक्षराणांविन्यासः अक्षरविन्यासः या वाक्यास लौकिकविग्रहवाक्य ह्मणतात· या दोन वाक्यांमध्यें जें अलौकिक विग्रहवाक्य सांगितलें त्यांत प्रकृतिप्रत्ययांची कूडाकूट व तें साधारणलोकांस अनुपयोगी असें जाणून लौकिकविग्रहवाक्येंच सर्वत्र लिहिलीं आहेत त्यांचेंच विग्रह हें नाम जाणावें·

वृत्ति पांच आहेत समासवृत्ति, एकशेषवृत्ति, तद्धितवृत्ति, सनाद्यंतधातुवृत्ति आणि कृद्वृत्ति त्यांतून अक्षराणां विन्यासः इत्यादि समासाच्या जागीं धातु व त्यांचे अर्थ हे लिहिले नाहींत· कारण अक्षराणां विन्यासः या दोन पदांच्या समासविवक्षाकालीं समासवृत्तिवाक्य मात्र लिहिल्यानें अर्थ निर्वाह होऊन धातु आणि त्यांचे अर्थ त्यांची आकांक्षा उत्पन्न होत नाहीं; तर त्यांतील प्रत्येक पदाच्या व्युत्पादनसमयीं मात्र ती उत्पन्न होत्ये; यास्तव तशा स्थलीं मात्र ते लिहिले आहेत.

पितरौ इत्यादिक एकशेषाच्या जागींहि सिद्धनामाचीच एकशेषवृत्ति होत असत्ये ह्मणून अशा स्थलींहि धातु व तदर्थ यांची आकांक्षा नाहीं यास्तव ते लिहिले-नाहींत आणि केवळ पितृशब्द व मातृशब्द या प्रत्येकाच्या व्युत्पत्तिप्रदर्शनकालीं ते लिहिले आहेत.

त्याच प्रमाणें दितेरपत्यं दैतेयः इत्यादि तद्धितवृत्तिस्थलींहि सिद्ध दितिशब्द घेऊन वृत्त्यर्थावबोधक वाक्य ह्मणजे विग्रह करितात, या कारणानें दितिशब्द व्युत्पादन

कालिक धातूंच्या अपेक्षेप्रमाणें देतेय त्याजागीं ती नाहीं ह्मणून ते धातु व तदर्थ हे लिहिले नाहींत.

आतां कृद्वृत्तीच्या व्युत्पत्तिप्रदर्शनकालीं धातु व त्यांचे अर्थ त्यांची अत्यावश्यकता पडती यास्तव त्याजागीं धातु व तदर्थ हे दाखविले आहेत. परंतु हा नियम प्रातिहारिकः इत्यादि स्थलीं प्रतिहरणं प्रतिहारः सप्रयोजनमस्य प्रातिहारिकः अशा जागीं अंतर्गतवृत्तीला लागू नाहीं केवळ प्रतिहारशब्दाच्या जागीं तो नियम आहे. व कृद्वृत्तींत सनाद्यंतधातुवृत्ति आहे तेथें मात्र सनाद्यंतधा. व त्यांचे अर्थ हे लिहिले आहेत त्यांचीं उदाहरणें रेमंतेयोगिनोऽस्मिन्निति रामः पुनःपुनरतिशयेन यजति यजतेवा यायजूकः इत्यादि.

आतां स्त्रीप्रत्ययांत जें अजा मृडानी इत्यादि शब्दांचें व्युत्पादन केलें आहे तेथें पूर्वीं सांगीतलेल्या वृत्तींपैकीं कोणतीहि वृत्ति संभवत नाहीं, ह्मणजे स्त्रीप्रत्ययांत शब्दास कोणती वृत्ति आहे असें ह्मणतां येत नाहीं यास्तव तेथें मूलभूत प्रातिपदिकांची जी वृत्ति तिचाच अर्थप्रदर्शनानें धातु व तदर्थ यांचा निर्णय प्रायः सिद्ध आहे परंतु अधिक जें स्त्रीत्व त्याचें प्रकाशन करणारा तेथें टाप् ङीप् ऊङ् इत्यादि प्रत्यय मात्र अधिक आहे या करितां त्या शब्दांच्या पुढें स्त्रीप्र. अशी खुणा लिहिली आहे त्यावरून ते शब्द स्त्रीप्रत्ययांत आहेत असें समजेल.

त्या ग्रंथांतील शब्दांचा लिंगनिर्णय करणें तो प्राकृत विग्रहार्थ लिहिले आहेत त्यावरून तो ध्यानांत येता कांकीं, प्राकृत मराठी भाषेंत जे नियम आहेत पुल्लिंगी तो. स्त्रीलिंगी ती. नपुंसकलिंगीं तें. तेच त्यांत आहेत, तेव्हां त्याविषयीं कांहीं नवीन सांकेतिक चिन्हें करून लिहिलीं नसतीं परंतु हा विचार धात्वर्थापुढें प्रकृतोपयोगी जो शब्दाचा अर्थ लिहिला आहे त्याविषयीं मात्र उपयोगीं पडेल; परंतु कित्येक शब्दांचे जे नानार्थ त्याच प्रकृतार्थापुढें लिहिले त्यांचीं लिंगें समजण्या करितां त्यासंकेतांची आवश्यकता आहेच यास्तव त्यात्या जागीं तीनहि लिंगांचीं आद्याक्षरें लिहिलीं आहेत ह्म० पुल्लिंगाविषयीं पु. याचप्रमाणें स्त्रीलिं. स्त्री. नपुंसकीं न. अशावरून त्यात्या अर्थीं ते शब्द विद्यमान असतां त्यांचीं लिंगें कोणतीं व विशेष्यनिघ्नस्थलीं विशेष्य

निम्नशब्दाचें आद्यक्षर· दोन दोन लिंगें तीन तीन लिंगें ज्या शब्दांचीं आहेत त्या त्या श ब्दांपुढें तीं तीं अक्षरें लिहिलीं आहेत त्यांवरून सर्व लिंगनिर्णय करतां येईल·

आतां पूर्वीं ज्या पांच वृत्ती सांगितल्या त्यांचे विग्रह लिहिले आहेत, परंतु कोणत्या शब्दाची कोणती वृत्ती हें समजावें ह्मणून स· ए· त· सना· आणि कृ· अशा खुणा लि हिल्या आहेत त्यांवरून कोणत्या शब्दाच्या जागीं कोणती वृत्ति आहे हें समजून येईल· ह्मणजे समासवृत्तिस्थलीं स· याच प्रमाणें पुढच्या जाणाव्या·

आतां पूर्वीं ज्या पांच वृत्ती लिहिल्या आहेत त्यांमध्यें समासवृत्ती आणि एकशेषवृत्ति त्या दोन वृत्ति मानण्याचें कारण काय कांकीं, एकशेषस्थलीं समास वृत्ति आहेच तेव्हां वृत्तिद्वय कल्पना व्यर्थ अशी आपाततः शंका येत्ये खरी, परंतु समास आणि एकशेष निखालस भिन्न आहेत· ते असे कीं, समासाला सुबंत पदांची अपेक्षा असत्ये आणि एकशेष सुबुत्पत्तीच्या पूर्वींच द्वंद्वाचा अपवादक होतो; असे विषयभेद आहेत· बरेंतर विशेषभेदप्रदर्शनानें वृत्ति दोन मानल्या पाहिजेत इतकें सिद्ध झालें परंतु एकशेष आ तां द्वंद्वाचा अपवादक असें ह्मणतां येणार नाहीं· कांकीं, भिन्नविषयता येत्ये ह्मणून उत्सर्गापवादांची समान विषयता सर्वत्र पाहिजे ही गोष्ट खरी, परंतु या जागीं एकशेष न झाला तर विभक्त्युत्पत्ति होऊन द्वंद्व होणार· एकशेष तर तों पर्यंत राहातच नाहीं अं तरंगत्वास्तव पूर्वीं होतो· तो झाल्यावर मग द्वंद्वाला जीं अनेक विभक्त्यंतें पाहिजेत तीं नाहींत ह्मणून तो होत नाहीं ती द्वंद्वाची अनेक विभक्त्यंतांची सामग्री एकशेषानें, नष्ट केली आहे या कारणानें एकशेष हा द्वंद्वाचा अपवादक· अशारीतीनें द्वंद्वापवाद क एकशेष आहे यावरून अपवादक होणार नाहीं अशी शंका उत्पन्न झाली होती ती दूर होत्ये·

आतां बहुधा रामः कृष्णः इत्यादि शब्दस्थलीं जो धात्वर्थ दाखविला आहे तो लो कप्रसिद्ध अर्थाबराबरच आहे या करितां त्या विषयींचा लोकांस बोध होऊन शब्दार्थ निर्वाह यथार्थ होईल हें सांगावयास नको, परंतु कित्येक केवळ रूढ असे शब्द आ हेत तेथें त्यांचा प्रकृति प्रत्ययार्थावरून अर्थ पाहिला असतां तो लोकप्रसिद्ध अर्था पासून फारच दूर पडतो· उदाहरण गौः गच्छतीतिगौः गमन करणारा प्राणी असा

अर्थ धात्वर्थानें होतो परंतु गोशब्दाचा लोकप्रसिद्ध अर्थ नाहीं आहे. पंचजन शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ पाहिला असतां पंच महाभूतांनीं उत्पन्न करिजेतो तो पंचजन म्हणजे मनुष्यजातीय पुरुष, अशा स्थलीं केवल विग्रहार्थाकडेसच दृष्टि दिली तर हा शब्द स्त्री पुरुष साधारण व मनुष्य पशु इत्यादि साधारण असा भासतो. असो. असे अनेक शब्द लोकप्रसिद्धार्थाशीं मिळत नाहींत तेथें जें व्युत्पत्तिप्रदर्शन केलें आहे तें आमचा उद्देश्यास अनुसरून आहे. लोकप्रसिद्ध अर्थाशीं धात्वर्थ प्रदर्शित अर्थ साम्यता पावत नाहीं ह्मणून तो टांकावा तर तसे शब्द बहुत असल्यानें ग्रंथीं अपूर्णता दोष येईल असें जाणून ते न टांकितां सर्वत्र मूल ग्रंथाप्रमाणें लिहिले आहेत.

या कोशांत ग्रंथ लिहिण्याचा क्रम असा ठेविला आहे कीं, प्रथम मोठ्या अक्षरांनीं शब्द लिहिले ते शब्द अपदंनप्रयुंजीत ह्मणजे अपदाचा प्रयोग करूंनये ह्मणून सुबंत एकवचनीं असून बहुधा प्रथमांत आहेत. क्वचित् पुष्पवंतौ इत्यादि स्थलीं द्विवचनांत. वसवः इत्यादि स्थलीं बहुवचनांत लिहिले आहेत. व त्यां विषयीं द्वि. ब. त्या खुणा लिहिल्या आहेत. आणि ह्रस्व दीर्घादि विशेषानें अक्षरानुपूर्वी निराळी होत्ये आणि विग्रहादि ज्यांचे एक असेजे शब्द ते विल्हेवारींत एकत्र लिहून त्यांचे पुढें विग्रहादि लिहून त्यांचे ह्रस्वदीर्घादि विशेष दाखविले आहेत. शब्दाच्या पुढें विग्रह त्यांपुढें त्यांचा अर्थ नंतर वृत्तीच्या बोधक खुणा इतकें झाल्यावर पूर्व संकेताप्रमाणें धातु व तदर्थ त्याच्या पुढें शब्दाचा अर्थ व नानार्थ असल्यास ते व लिंगबोधक चिन्हें आणि अकारांतादि प्रातिपदिकांत असे लिहिले आहेत.

ते प्रातिपदिकांत प्रत्ययोत्पत्ती होऊन कार्यांतरांनीं रूपांतर पावले आणि कर्ता इत्यादि शब्दांच्या अंतीं आकारादिक रूपानें दिसूं लागले तेव्हां मुळचे त्यांचे अंतजे ऋकारादिक ते दृष्टोत्पत्तीस येणार नाहींत ते यावे ह्मणून त्या त्या प्रातिपदिकांचे तेते अंतीचे वर्ण लिहिले आहेत त्या योगानें अकारांतादि प्रातिपदिकें प्रत्ययोत्पत्तीच्या पूर्वी कोणत्या रीतीचीं होतीं तो निश्चय करतां येईल.

क्वचित् जागीं उपसर्गाच्या बलानें वधातूच्या अनेकार्थत्वानें लौकिक प्रसिद्ध-अर्थ संभाळण्याचा प्रसंगीं त्या दोन हि शास्त्रार्थांचा अवलंब केला आहे. आणि प्र

करणवशात्‌हि मुख्य धात्वर्थ सोडिला आहे कीं कीं, तो सोडिला तरंचं, सामान्य लोकांसहि शब्दार्थ चांगला कळावा असा जो आमचा उद्देश तो सिद्धीस जातो.

आतां धातु असा शब्द लिहिण्याचा प्रसंगीं, धा. उदाहरण शब्दाच्या जागीं उ. ह्मणजे या जागीं ह्म. द्विवचन, द्वि. यानें बहुवचन, ब. यानें समजावें.- लिंगाच्या बोधक चिन्हाच्या स्थलीं अ. ही अव्ययाची खुणा धात्वर्थाचे शेवटीं तो असेल तर, अ. यानें अर्थ असें जाणावें आणि लिंगबोधक अक्षरा मागें, अ. असल्या पासून अकारांत व इ. यानें इत्यादि असा अर्थ जाणावा. आणि को. असेल त्याचा कोशांतरीं असा अर्थ समजावा आणि पुढें जसजशी गरज लागेल तसतसे संकेत करून प्रस्तावना पुरवणी शेवटीं लिहावी लागल्यास लिहूं.

या कोशांत नानार्थांचे सारेच विग्रह लिहावे तर तें काम क्लिष्ट कल्पनेचें होणार, प्रत्यय दाखवावे तर त्या पासून साधारण लोकांस कांहींच उपयोग न होतां उगीच घोंटाळ्यांत मात्र पाडावे असें होईल व ते दाखविल्या वर त्यांचे अर्थ आणि प्रकृतीचे अर्थ यांचा परस्पर अन्वय कसा होतो हें लोकांच्या मनांत येण्या जोगें न लिहिलें तर तें प्रत्यय लिहिणें व्यर्थ आहे आणि अन्वयाचाहि प्रयास करावा तर ह्माहीं संस्कृत ग्रंथ आहेत तेच बरे इतका हा दुर्बोध ग्रंथ होईल असें मनांत आणून ते लिहिले नाहींत.

**अ** अततीति अ, निरंतर ह्मणजे सदोदित गमन करितो जो तो. कृदन्त. अत धातु. सातत्यगमनअर्थी. वस्तुमात्राचा अभाव, अविद्यमानता. अव्यय. उदाहरण. अराजदैविकंनष्टं. २ अर्थ कोशांतरीं वासुदेव. अकारांत. पुल्लिंगी.

**अकं** नकं अकं, नव्हेजें क ह्म. सुख तें-अंक. समास. दुःख. २ पाप. अ. न.

**अकरणिः** अकरणं अकरणिः, अकरण ह्म. विरुद्ध करणें जें ती. कृ. डुकृञ्धा. करणअ. शिवीचा एकभेद. उ. आः पापक थमकरण्यानलज्जसे. इ. स्त्री.

**अकुप्यं** नकुप्यं अकुप्यं, नव्हेजें कुप्य ह्म. सुवर्णरजतभिन्नधन तें. अकुप्य. स. सोनें २ रुपें. अ. न.

**अकूपारः** कुंपिपर्तीतिकूपारः नकूपारः अकूपारः, पृथ्वीतें पूरण करितो जोतो कूपार नव्हेजो कूपार तो. स. सागर. अ. पु.

**अकृष्णकर्मा** अकृष्णंशुक्लं कर्मयस्यसः अकृष्णकर्मा, शुद्ध आहे कर्मजाचें तो. स. पुण्याचरण करणारा. न्. पु.

**अंकः** अंक्यतेनेनेत्यंकः, लक्षिजेतें ह्म भिन्नत्वानें जाणलें जातें वस्तुमात्रजेणें करून तो. कृ. अकिधा. लक्षणअ. चिन्ह. २ उत्संग. ३ एक दोन ही संख्या. अ. पु.

**अंकुरः अंकूरः** अंक्यतइत्यंकुरः, आंत असून बाहीर आल्यामुळें स्पष्ट होतो जोतो. कृ. अकिधा. लक्षण भु. कोंब. अ. पु.

**अंकुशः** अंक्यतेहस्तिरनेनेति अंकुशः, चिन्हित करिजेतो हत्ती जेणेंकरून तो. कृ. अकिधा. लक्षणअ. गजस्वाधीन रा खण्याचें आयुध. अ. पु.

**अंकोठः** अंक्यतइति अंकोठः, पर्वताच्या उच्च प्रदेशीं असल्यानें सर्वांनीं लक्षिजेतोजो तो. कृ. अकिधा. लक्षणअ. अंकोडाचा वृक्ष. अ. पु.

**अंक्यः** अंकेभवः अंक्यः, उत्संगाच्या ठायीं वाजविण्या करितां आणि स्थित तो त. मांडीवर घेउन वाजविण्याचा मृदंग अ. पु.

**अक्षं** अश्णोतीत्यक्षं, स्वस्वविषयांतें व्याप्त करितो जो तो. कृ. अक्षूधा. व्याप्तिअ. इंद्रिय. २ पादेलोण. अ. न. १ फांसा ४ चाक ५ बिब्याचें झाड. ६. तोला ७ व्यवहार. ८ बेहडा. अ. पु. को. सुरमा. अ. न. २ समजलेला अर्थ. अ. पु. ३ भुजंग. ४ रुद्राक्ष. ५ भद्राक्ष. ६ गाडा. अ. पु.

**अक्षताः** क्षणनंक्षतं नक्षतंयेषांते अक्षताः, नाहीं आहे हिंसन ह्म. विकार

जांस ते. स. धुतळेले तांदूळ यव. अ. पु. क

**अक्षदर्शक:** पश्यतीति दर्शक: अक्षा णांव्यवहाराणांदर्शक: अक्षदर्शक:, व्य वहारांचा दर्शक ह्म. व्यवहार पाहणारा. स. न्यायनिवडणारा. अ. पु.

**अक्षदेवी** अक्षैर्दीव्यतितच्छील: अक्ष देवी, अक्ष ह्म. पाश यांनीं क्रीडा कर- णें हा ज्याचा स्वभाव तो. क्र. दिवुधा. क्री डाअ. फांशांनीं खेळणारा, जुवेबाज. इन्. पु.

**अक्षधूर्त:** अक्षेषुधूर्त: अक्षधूर्त:, फां- शांचाठायीं जो धूर्त तो. स. अर्थ वर- च्या शब्दाचाच. अ. पु.

**अक्षपाद:** अक्षंचक्षुरिंद्रियंपादेयस्य स: अक्षपाद:, चक्षुरिंद्रियआहे चर णाचेठायीं ज्याचा तो. स. सप्त ऋषीं तला गौतमसुनी. जेनन्हे. अ. पु.

**अक्षरं** नक्षरतीत्यक्षरं, नाहीं नष्ट हो तजें तें. क्र. क्षरधा. क्षरणअ. मोक्ष. २ अकारादिवर्ण. ३ ब्रह्म. अ. न. को. तपश्चर्या. १ यज्ञ. २ आदिकारण. ४ आकाश. ५ धर्म न.

**अक्षरचण:** अक्षरैर्वित्तोक्षरचण:, लेखनाविषयीं अक्षरानीं जो वित्त ह्म. प्रसिद्ध तो. त. लेखक. अ. पु.

**अक्षरचुंचु:** अक्षरैर्वित्त: अक्षरचुं चु:, त. अर्थादिवरच्याशब्दाप्रमाणेंऊच्छ.

**अक्षरविन्यास:** अक्षराणांविन्यास: अ क्षरविन्यास:, अक्षरांचाजो विन्यास ह्म. मांडणी तो. स. लिपि. अ. पु.

**अक्षरसंस्थानं** अक्षराणांसंस्थानं अ क्षरसंस्थानं, अक्षरांचें जें संस्थान ह्म. सम्यक् स्थिति तें. स. लिपि. अ. न.

**अक्षरुचकं** रुच्यतइतिरुचकं अक्षस्य रसनेंद्रियस्य रुचकमक्षरुचकं, रोचन- करितें जें तें रुचक रसनेंद्रियाला- जें रुचक ह्म. रुचि आणणारें. स. क्षारांतील एक भेद, सोरा. अ. न.

**अक्षवती** अक्षा: पाशका: संत्यस्या मिति अक्षवती, अक्ष ह्म. पाश आ हेत क्रीडेला साधन जीच्याठायीं ती. त. निर्जीव पदार्थांचा खेळ. ईबं. स्त्री.

**अक्षाग्रकीलक:** अक्षस्यनाभिस्थस्य स्यअग्रकीलक: अक्षाग्रकीलक:, गा डीच्या आंखाचाजो अग्रकीलक तो. स. गाडीच्या आंखाच्या टोकचा खिळा. अ. पु.

**अक्षांति:** क्षमणंक्षांति: नक्षांति: अक्षां ति:, क्षांति ह्म. क्षमा तीशीं जी विरुद्ध ती. स. ईर्षा. इ. स्त्री

**अक्षि** अश्नुतेनेनेत्यक्षि. पदार्थमात्राला दर्शनेंक्रियेनें व्यापितें त्या. यावत्पदार्थ ज्ञानाला जें साधन तें. कृ. अशूङ्धा. व्याप्तिअ. नेत्र. नृ. न.

**अक्षिकूटकं** अक्ष्णोः कूटकमक्षिकूट कं. अक्षीचें जें कूटक त्या कनीनिकातें हत्तीच्या डोळ्यांतील बाहुली. अ. न.

**अक्षिगतः** अक्ष्णिगतः अक्षिगतः, नें त्याचा ठायीं प्रतिकूलत्वानें जो गत त्या प्राप्त तो. स. डोळ्यांत सलणारा शत्रु. अ. पु.

**अक्षिवं** अक्षिवातीत्यक्षिवं. नेत्रांतें पीडा करितें जें तें. कृ. वाधा. गतिअ. समुद्राचें पाणी सुकवून केलेलें मीठ. अ. न.

**अक्षीवं** नक्षीवतीत्यक्षीवं, नाहीं उन्म त्त करीत जें ते. कृ. क्षीवृधा. मदअ. शेवग्याचा वृक्ष. अ. न.

**अक्षोटः** अक्ष्णोतीति अक्षोटः. स्ववि स्तारानें व्याप्त करितो जो तो. कृ. अक्षू धा. व्याप्तिअ. डोंगरी आक्रोडाचा वृ क्ष. अ. पु.

**अक्षौहिणी** ऊहः समूहोस्या ऊहिनी अक्षाणा मूहिनी अक्षौहिणी. समूह आहे जीस ती ऊहिनी अक्षांची जी ऊहिनी त्या. अनीकिनीच्या समुदायांतें वाहणारी. स. दाहा अनीकिनी सेना. ईबं. स्त्री.

**अखंडं** नखंड्यते नदखंडं, नाहीं खंड न करीत जें तें. कृ. खडिधा. भेदनअ. संपूर्णवस्तु ज्याचा भेद झाला नाहीं तें. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अखातं** खातादिन्नं अखातं. खाताहू न जें निराळें तें अखात. स. मनुष्यानें खटलेलें नव्हे असें जें सरोवरादि तें. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अखिलं** नखिलंयस्य अखिलं. नाहीं आहे संक्षेप ज्या मध्यें तें. स. परिपूर्णवस्तु सगळें. अ. न.

**अगः** नगच्छतीत्यगः, नाहीं गमन क रीत जो तो. कृ. गम्लृधा. गतिअ. डों गर. झाड. अ. पु.

**अगदः** नगदोयस्मादगदः, रोगभा हींसा होतो ज्यापासून तो. स. औष ध. अ. पु.

**अगदंकारः** अगदंकरोतीति अगदंका रः, निरोगी करितो जो तो. कृ. डुकृञ् धा. करणअ. वैद्य. अ. पु.

**अगस्त्यः** अगंविंध्यं स्त्यायति इत्यगस्त्यः विंध्यपर्वताप्रत प्रतिबंध करितो जो तो.

कृ. स्फे धा. संघात अ. अगस्त्यमुनी अ.पु.

**अंग** अंगतीत्यंगं. गमन करितें जें तें कृ. अगि धा. गति अ. शरीरावयव. अ. न. २ संबोधन ३ पुनः या अर्थी

**अंगदं** अंगं दयते अंगदं, अंगातें भूषित करितें जें तें कृ. दे‍ङ् धा. पालन अ. बाहुभूषण. अ. न.

**अंगनं** अंगंत्यत्रेति अंगनं, गमन करिताहेत ज्याचे ठायीं तें कृ. अगि धा. गति अ. आंगण. अ. न.

**अंगना** प्रशस्तान्यंगानिअस्याइति अंगना, प्रशस्त आहेत अंगें जीचीं ती. त. सुंदर अवयवांची स्त्री. २ सार्वभौम संज्ञक उत्तर दिग्गजाची स्त्री. आबं स्त्री.

**अगमः** नगच्छतीति अगमः नाहीं गमन करीत जो तो. कृ. गम्लृ धा. गति अ. वृक्ष. अ.पु.

**अंगविक्षेपः** अंगानांविक्षेपः अंगविक्षेपः, अंगांचा जो विक्षेप ह्म. चालन-तो. स. अंगचालन पूर्वक नृत्यांतील एक प्रकार. अ.पु.

**अंगसंस्कारः** अंगंसंस्क्रियते अनेनेति अंगसंस्कारः, अंग जें तें संस्कृत ह्म. सुगंधित करिजेतें जेणें करून तो. कृ. डुकृञ् धा. करण अ. अंगाला सुगंधि द्रव्य लावणें. अ.पु.

**अंगहारः** अंगानांहारोऽन्यत्रनयनं अंगहारः, अंगें जीं त्यांचें जें अन्यत्रनयन तो. स. नृत्यांतील अंगावयवांचें इतस्ततश्चालन. अ.पु.

**अगाधं** नगाधमगाधं, नव्हे जें गाध तें अगाध. स. ज्याच्या तळाचा अंत लागत नाहीं इतकें खोल तें. सरोवरादि. वि. अ.पु.न. आबं. स्त्री.

**अगारं** अगान् वृक्षान् ऋच्छति प्राप्नोतीति अगारं वृक्षांतें अनाशकत्वें करून प्राप्त होतें जें तें. कृ. ऋ धा. गति अ. गृह. अ.न.

**अंगारः** अंगतीत्यंगारः, मेषादि राशीं प्रत किंवा शीत निवारणाप्रत गमन करितो जो तो. कृ. अगि धा. गति अ. मंगळनामक ग्रह. २ कोलित. ३ इंगळ. अ.पु.

**अंगारकः** अंगार इव रक्तवर्णत्वात् अंगारकः, अंगार ह्म. निखारा त्या सारिखा जो तो. त. मंगलनामक ग्रह. अ.पु.

**अंगारधानिका** अंगाराधीयंते ऽस्यामिति अंगारधानिका अंगार ह्म. इंगळ जे ते राहतात जीचा ठायीं ती. कृ. डुधाञ् धा. धारण अ. शेकडी. आबं. स्त्री.

**अंगारवल्ली** अंगारवत वल्ल्योयस्याः-सा अंगारवल्ली, निखाऱ्यां सारख्या आहेत वल्लीजीस ती. स. भारंगीची वेल. ईबं. स्त्री.

**अंगारवल्लरी** अंगारवर्णपर्णा वल्लरी-अंगारवल्लरी, निखाऱ्यां सारिखीं आहेत पर्णेंजीचीं ती. स. करंज वृक्षांतील एकभेद. ईबं. स्त्री.

**अंगारशकटिः अंगारशकटी** अंगाराणां शकटिः अंगारशकटिः अंगारांची जी शकटि ह्म. पात्रविशेष ती. स. शेगडी. इ. स्त्री. २ ईबं. स्त्री.

**अंगीकारः** अंगीकरणमंगीकारः, -स्वीकार करणें जो तो. कृ. कृधा. करण अ. स्वीकार. अ. पु.

**अंगीकृतं** अनंगमंगमकारि अंगीकृतं, अनंगाला अंग करिजेतें जें तें. त. स्वीकृत. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अगुरुः** न विद्यतेगुरुरस्मादित्यगुरुः नाहीं आहे गुरु ह्म. सारभूत वृक्ष जाहून तो. स. शिसव्याचा वृक्ष. उ. पु. न. २ कृष्णागरु चंदन. अ. न.

**अगुरुशिंशपा** शिंबाभिः शपतीति शिंशपा अगुरुश्चासो शिंशपाच अगुरुशिंशपा. स. शिंबांशीं आक्रोश ह्म. स्थिति करित्येजी ती. शिंशपा अगुरु ह्म. लोकोत्तर गुरु अशी जी ती. स. शिसव्याचें झाड. आबं. स्त्री.

**अंगुलं** अंगुलातीति अंगुलं, हस्तातें ग्रहण करितें जें तें. कृ. लाधा. आदान अ. बोट. अ. न.

**अंगुलिः अंगुली** अंगतीति अंगुलिः क्रिया करण्या करितां गमन करित्येजी ती. कृ. अगिधा. गति अ. हाताचें बोट. २ हत्तीचें कर्णभूषण. इ. स्त्री. २ ईबं. स्त्री.

**अंगुलिमुद्रा** अंगुल्याः मुदंरावीति अंगुलिमुद्रा. अंगुलीची जी मुत् ह्म. शोभा तीतें देत्येजी ती. कृ. राधा. दान अ. रामनामादिकांची आंगठी. आबं. स्त्री.

**अंगुलीयकं** अंगुलोभवं अंगुलीयकं, अंगुलीचाठायीं शोभा देण्याकरितां जें भव ह्म. उत्पन्न तें. त. अंगुलिभूषण. आंगठी. अ. न.

**अंगुष्ठः** अंगोपाणौ तिष्ठतीति अंगुष्ठः, हस्ताचाठायीं राहतो जो तो. कृ. ष्ठाधा. गतिनिवृत्ति अ. आंगठा. अ. पु.

**अग्नायी** अग्नेः स्त्री अग्नायी, अग्नीची जी पत्नी ती. स्वाम. अग्नीची स्त्री. ईबं. स्त्री.

**अग्निः** अंगतीत्यग्निः, अंगानि ह्म. थंडीला कांपवितो जो तो. कृ. अगिधा. कंपन

अ. विस्रव. इ. पु.

**अग्निकण:** अग्नेः कणः अग्निकणः. अग्नीचा जो कण तो. स. ठिणगी. अ. पु.

**अग्निचित्** अग्निमचैषीदिति अग्निचित् अग्नीतें चेतविता झालाजो तो. कृ. चिञ् धा. चयन अ. विस्तवपेटविणारा. न. पु. स्त्री. न.

**अग्निज्वाला** अग्नेर्ज्वालेव अग्निज्वाला; अग्नीच्या ज्वालेच्यापरी जीज्वाला ती. स. वनो. जीस धायटी असें म्हणतात ती. आबं. स्त्री.

**अग्निभू:** अग्नेर्भवतीत्यग्निभूः; अग्नीपासून जो उत्पन्न होतो तो. कृ. भू धा. सत्ताअ. षडानन. ऊ. पु.

**अग्निमंथ:** अग्निं मथ्नातीत्यग्निमंथः अग्नीतें मथन स. विलोडन करितो जो तो. कृ. मंथ धा. विलोडन अ. नरवेल्याचें झाड. अ. पु.

**अग्निमुखी** अग्निरिव मुखं यस्याः सा अग्निमुखी; अग्नी प्रमाणें आहे तीक्ष्ण म्ह. दाहक मुख जीचें ती. स. बिब्याचें झाड. ईषं. स्त्री.

**अग्निशिखं** अग्निरिव शिखा यस्य तत् अग्निशिखं, अग्नि तुल्य आहे शिखा म्ह. अग्र जाचें तें. स. कुंकू. अ. न.

**अग्निशिखा** अग्निरिव शिखा यस्याः सा अग्निशिखा. अग्नि सारखी आहे शिखा जी ती जीस. स. वाग चबका कळलावी असें म्हणतात ती. २ शाकविशेष. आबं. स्त्री.

**अग्नीध्र:** अग्नीनिंधे इति अग्नीधः अग्नीतें प्रदीप्त करितो जो तो. कृ. ञिइंधी धा. दीप्तिअ. ऋत्विग्विशेष. अ. पुं.

**अग्न्युत्पात:** अग्नेरुत्पातः वैकृतमग्न्युत्पातः, अग्नीपासून जो उत्पात तो. स. अग्निकृत उपद्रव विशेष. अ. पु.

**अग्रं** अगतीत्यग्रं, वांकडें जातें जें तें. कृ. अगधा. कुटिलगतिअ. शेंडा, पुढचा प्रदेश. उ. अग्रगामी. ३ अधिक. उ. साग्रंशतं. अ. न. ४ प्रमुख. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अग्रज:** अग्रेजातः अग्रजः, प्रथम झाला जो तो. कृ. जनी धा. प्रादुर्भाव अ. आदीं झालेला. अ. पु.

**अग्रजन्मा** अग्रे जन्म यस्यसः अग्रजन्मा ज्याचा आहे वर्णाच्या आदीं आहे जन्म जाचें तो. स. ब्राह्मण. न. पु.

**अग्रणी:** अग्रेनयतीत्यग्रणीः, अग्रभागीं गमन करितो जो तो. कृ. णीञ् धा. प्रापण अ. श्रेष्ठ. ई. पु.

**अग्रत:** अग्रेइत्यग्रतः, अग्रभागीं म्ह. पुढें प्रथम. त. उ. अग्रतः पुस्तकं २ अग्रतो

मुख. अव्यय.

अग्रतःसरः अग्रतः सरतीत्यग्रतःसरः, अग्रभागीं गमन करितोजो तो. कृ. सृधा. गतिअ. पुढें जाणारा. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

अग्रमांसं अग्रंच तन्मांसंच अग्रमांसं, जीवनाला मुख्यजें मांस तें. स. काळीज अ. न.

अग्रसरः अग्रेसरतीत्यग्रसरः, अर्थादिक अग्रतःसर शब्दाप्रमाणें.

अग्रियं. अग्रीयं अग्रेभवं अग्रियं, अग्राचाठायीं ह्म. प्रथमजें झालें तें. न. वं धूवगैरे वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

अग्रेदिधिषुः अग्रेप्रधानंदिधिषुर्यस्यसअग्रेदिधिषुः, प्रधानआहे दिधिषु जास तो. स. दोनवेळ विवाहित बायकोचा दुसरा नवरा. उ. पु.

अग्रेसरः विग्रहादिसर्व अग्रसर शब्दाप्रमाणें.

अग्र्यः अग्रेभवः अग्र्यः, अग्रभागींजो झाला तो. त. मुख्य. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

अघं अंघतेगच्छतिदानादिनेनेति अघं, दानादिकेंकरून दूरजातें जें तें. कृ. अघिधा. गतिअ. पाप. २ मरणादिदुःख. २ मृगयादिव्यसन. अ. न.

अघमर्षणं अघंमर्षतीति अघमर्षणं, पापानें घपकावितें जें तें. कृ. मृषधा. तितिक्षाअ. सर्वपापनाशनार्थजपावयाची ऋचा. अ. न.

अघ्न्या नहन्यते हंतिवादातारमितिअघ्न्या. देणारामत नाहीं हनन ह्म. पतनकरीत जी ती. कृ. हनधा. हिंसाअ. गाई. आवं. स्त्री.

अंघ्रिः अंहते अनेनेति अंघ्रिः, गमन होतें हे जेणेंकरून तो. कृ. अहिधा. गमनअ. चरण, पाय. इ. पु.

अंघ्रिजः अंघ्रेर्जातः अंघ्रिजः चरणापासून झालाजोतो. कृ. जनीधा. प्रादुर्भावअ. शूद्रवर्ण. अ. पु.

अंघ्रिपर्णिका अंघ्रेरारभ्यपर्णान्यस्या इति अंघ्रिपर्णिका, मुळापासून आहेत पर्णें ह्म. पत्रें जीस ती. स. वनौषधि जिला डवलापिठव असें ह्मणतात ती. आवं. स्त्री.

अंघ्रिनामकः अंघ्रेर्नामयस्यसः अंघ्रिनामकः, अंघ्रि ह्म. चरण त्याचें आहे नामजास तो. स. वृक्षाचें मूल. अ. पु.

अंघ्रिवल्लिका अंघ्रिमूलमारभ्यवल्लिरस्याइति अंघ्रिवल्लिका मुळापासून आ

हून वढीजीस ती. स. वनें। या ढवळा पिवळण असें ह्मणतात ती. आबं. स्त्री.

**अचंडी** नचंडी अचंडी, नव्हे जी चंडी ती. स. तापट नव्हे अशी गाई. ईबं. स्त्री.

**अचलः** चलतीतिचलः नचलः अचलः, चंचल होतो जो तो चल; नव्हे जो चल तो अचल. कृ. चलधा. कंपन. अ. पर्वत. अ. पु.

**अचला** नचलतीत्यचला; नाहिं कंप पावत जी ती. कृ. चलधा. कंपन अ. पृथ्वी. आबं. स्त्री.

**अच्युतः** नास्तिच्युतं स्खलनंयस्यसः अच्युतः, नाहीं आहे कधींहि स्खलन ह्म. भ्रंश जो तो जास ती. स. विष्णु २ मत्स्यविशेष. अ. पु.

**अच्युताग्रजः** अच्युतस्यअग्रजः अच्युताग्रजः, अच्युताचा जो अग्रज ह्म. श्रेष्ठबंधु ती. स. बलराम. अ. पु.

**अंचितः** अंचतेस्मइतिअंचितः, पूजिलेला जो तो. कृ. अंचुधा. पूजा अ. पूजिलेला वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अच्छः** नच्छ्यते इति अच्छः, छेदने सा. अच्छ जीस - हीं जें तें कृ. छोधा. छेदन अ. स्वच्छ वि. अ. पु. न. आबं. स्त्री. १ आ. स्वल. ३ स्फटिकमणी. अ. पु.

**अच्छभल्लः** अच्छमाभिमुख्येनभल्लतेइति अच्छभल्लः, आभिमुख्येंकरून हिंसा करणारा. कृ. भल्लधा. हिंसा अ. आस्वल. अ. पु.

**अजः** न जायते अजनीतिवा अजः, नाहीं उत्पन्न होत अथवा गमन करितो जो तो. कृ. जनीधा. प्रादुर्भाव अ. अज. गनिअ. महादेव. २ बोकड. अ. पु.

**अजगंधिका** अजस्येवगंधोयस्याः अजगंधिका, शेळीसारखा आहे गंध जोतो जीस ती. स. शाकविशेष. आस्या प्राति लवण कानफोडी असें ह्मणतात ती. आबं. स्त्री.

**अजगरः** गिरतीतिगरः अजस्यगरः अजगरः, अज जो बोकड त्याचा जो भक्षक तो. स. आर ह्मणून एक सर्पाचा भेद. अ. पु.

**अजगवं** अजेनब्रह्मणा गम्यतइत्यजगवं, ब्रह्मदेवानें जाणलें जानें अथवा पाविजे तें जें तें कृ. गम्लधा. गमन अ. महादेवाचें धनुष्य. अ. न.

**अजननिः** अजननंअजननिः, जन्म

नसो यामकारें करून जो आक्रोश- ती. कृ. जनधा. जननअ. शिवीचाए कभेद. इ. स्त्री. उ. अजननिस्तेशठभू यात्

**अजन्यं** नजनेसाधुरजन्यं, जनह्म. लोक त्याविषयीं जें साधुनव्हेनें. त. शु भाशुभसूचक उपद्रवविशेष. अ. न.

**अजमोदा** अजंमोदयतीत्यजमोदा. अजातें हर्ष करितेजीती. कृ. मुद धा. हर्षअ. ओवा. आबं. स्त्री.

**अजशृंगी** अजः शृंगमस्या अजशृंगी. अजशृंगतुल्य आहे शृंग जें नें जीचेंती स. वनो. जीस शाकृ. मेंढशृंगी असें ह्मणतात ती. ईबं. स्त्री.

**अजस्त्रं** नजस्यतीत्यजस्त्रं, नाहीं मोक्ष ण करीत जें नें. कृ. जसुधा. मोक्षण- अ. निरंतर. अव्यय.

**अजहा** नजहातिशुकानितिअजहा,- शुकांशन त्याग करीत नाहींजो तो. कृ. ओहाकृधा. त्यागअ. वनो. प्रा. कुव- ली कुहि असें ह्मणतात ती. आबं. स्त्री

**अजा** अजतीतिअजा, गमन करित्ये जीती. कृ. अज धा. गतिअ. शेळी. आ बं. स्त्री.

**अजाजी** अजमजतीतिअजाजी, अ जामत् भस्यतें करून गमन करित्ये जीती. कृ. अजधा. गतिअ. जिरें ईबं. स्त्री.

**अजाजीवः** अजाजीवोजीविकायस्य सअजाजीवः, अजाआहे जीविका- ह्म. उपजीवन ज्याचें तो. स. मेंढपाळ. मेंढक्या. अ. पु.

**अजाजीवी** अजयाजीवतितच्छीलः अजाजीवी, शेळीनेंजीवन धारणें ह्म आहे स्वभाव ज्याचा तो. कृ. जीवधा. प्राणधारणअ. मेंढपाल मेंढक्या. इन्. पु

**अजितः** नजितः अजितः, नव्हेजो जित ह्म. जिंककेला तो. स. पराभव नझालेला. वि. अ. पु. न. आबं. स्त्री. २ महादेव. अ. पु.

**अजिनं** अज्यतेतदजिनं, शरीरव्याप्त करिजेतें जें नें. कृ. अजधा. गतिअ- हरणाचें कातडें. अ. न.

**अजिनपत्रा** अजिनमिवपत्राणियस्याः साअजिनपत्रा, चर्म सदृश आहेत प त्रें ह्म. पक्ष जीचे ती. स. पक्षिविशे ष ज्यास प्रा. वडुरी वामकिराई असें ह्मणतात ती. आबं. स्त्री.

**अजिनयोनिः** अजिनस्ययोनिर्यस्मा द्दिस्यजिनयोनिः, पवित्रचर्माचीआ

हे यानि ह्म. उत्पन्न जापासून तो. स. हरिण. इ. पु.

**अजिरं** अजंतिगच्छंत्यत्रेति अजिरं, गमन करिताहेत ज्याचेठायीं तें. क्र. अजधा. गतिअ. अंगण. २ विषय. ३ शरीर. अ. न. को. बेडुक. वायु.

**अजिह्मः** नजिह्मः अजिह्मः, नव्हे जो जिह्म ह्म. कुटिल तो. स. सरळ. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अजिह्मगः** अजिह्मंगच्छतीतिअजिह्मगः, सरळ गमन करितो जो तो. क्र. गम्लृधा. गतिअ. बाण. अ. पु.

**अजीवनिः** अजीवनमजीवनिः, अजीवन होवो असाजो आक्रोश तो. क्र. जीवधा. प्राणधारणअ. शिवीचा एकभेद. इ. स्त्री.

**अज्जुका** अर्ज्यतेइत्यज्जुका, अर्जन ह्म. संपादन करित्येजी ती. क्र. अर्जधा. अर्जनअ. नृत्य करणारी वेश्या. आबं. स्त्री.

**अज्झटा** अनआश्चर्यस्यझटः संघातोऽस्यामज्झटा. आश्चर्याचा आहे संघ ह्म. समूह जीचाठायीं ती. स. भुईआंवळी. आबं. स्त्री.

**अज्ञः** अजानातीत्यज्ञः, नाहीं जाणत जो तो. क्र. ज्ञाधा. अवबोधन अ. मूर्ख. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अज्ञानं** विरुद्धंज्ञानमज्ञानं, विरुद्ध जें ज्ञान तें. स. अयथार्थज्ञान. अ. न.

**अंजनः** अनक्तिगच्छतीति अंजनः, गमन करितो जो तो. क्र. अंजूधा. गमनअ. पश्चिमेचा दिग्गज. अ. पु. २ अंजन, नेत्रशुद्धि करणारें कज्जलादिक. अ. न.

**अंजनकेशी** अंजनमिवकेशाः यस्या सा अंजनकेशी, अंजनासारखे आहेत केश जीचे ती. स. सुवासिकद्रव्यविशेष ह्म. पवारी असें ह्मणतात ती. ईबं. स्त्री.

**अंजनावती** अंजनवर्णत्वात् अंजनमस्त्यस्याः अंजनावती, अंजन ह्म. कज्जलरूप आहे वर्ण जीस ती. त. पश्चिमदिग्गजाची स्त्री. ईबं. स्त्री.

**अंजलिः** अज्यतेनेनेति अंजलिः सेचन करिजेनें जेणेंकरून क्र. अंजूधा. व्यक्त्यादिअ. पसा. इ. उ.

**अंजसा** अंजनंअंजः अंजंस्यतीति अंजसा, अंजंस्यति ह्म. स्पष्टताजीवें नाशक जें तें. क्र. षोधा. अंतकर्मअ. शीघ्र, लवकर. २ साक्षात् या अ

र्थी. उ. अंजसायातितुरगः २ अंजसे तिरूरधुः कुचग्रहेः अव्य.

**अरनिः अरत्नी** अरतिगुणोत्रेति- अरनिः, गमनकरितोहेगुण ह्म. मत्यं चारज्जुजीचाठायीं ती.क्र. अरधा.गति अ.धनुष्याचें अग्र. इ.स्त्री. ईबं.स्त्री.

**अरविः अरवी** अर्टत्यत्रेतिअरविः, अरन ह्म. गमनकरिताहेत जीचाठायीं ती. क्र.अरधा. गतिअ.अरण्य.इ.ईबं.स्त्री.

**अटरूषः अटरूषः** अरान्नाच्छतो रूषतीतिअटरूषः, गमन करणाऱ्यांप्र न हिंसा ह्म.प्रतिबंधकरितोजो तो. क्र.रू षधा. हिंसाअ. अडुळशाचें झाड. अ.पु.

**अटा** अटनंअटा, गमनजें ती. क्र.अ टधा. गतिअ. जाणें. आबं. स्त्री.

**अट्टः** अट्टयतिअतिक्रामयतीतिअ- ट्टः, अधःप्रदेशातिक्रमणपूर्वकगम न करवितोजो तो. क्र. अट्टधा. अति क्रमणअ. माडी. अ.पु.

**अट्या अटाट्या** विग्रहादिसर्वअ टाशब्दाप्रमाणें.

**अणकः** अणतइतिअणः कुत्सितः अणः अणकः कुत्सित बोलतोजो तो. त.अ.पु.

**अणवीनं** विग्रहादिसर्वपुढच्या शब्द प्रमाणें.

**अणव्यं** अणूनांभवनंक्षेत्रमणव्यं. अणूचें भवन ह्म. उत्पादक क्षेत्र तें. त. अणुनामक धान्य जांत होतें तें. वि. अ.पु.न.आबं.स्त्री.

**अणिः अणी** अणतीतिअणिः, श ब्द करितो जो तो. क्र.अणधा. शब्द अ. गाडीचें चाक राहाण्याकरितां क- ण्याच्या शेवटास जी खिळीअसत्ये- ती. इ.पु. २ ईबं.स्त्री.

**अणिमा** अणोर्भावः अणिमा, अणू चा जो भाव ह्म. सत्ता तो. त. अष्टसि द्धींतील एकभेद. न.पु.

**अणीयः** अतिशयेनाणुरणीयः, अ तिशयेंकरून जें अणु तें. त.स.न.

**अणुः** अणतीत्यणुः, स्वभक्षणानें पोषण करितो जो तो. क्र.अणधा. प्राणनअ. धान्यविशेष.उ.पु. २ सू क्ष्म. वि.उ.पु.न. ईबं.उ.स्त्री.

**अंडं** अमत्यस्मादित्यंडं, गमन क रितोहे पक्ष्यादिक ज्यापासून तें. क्र. अमधा. गतिअ. अंडें कवठ.अ.न

**अंडकोशः अंडकोषः** अंडयोः कोशः अंडकोशः, अंडांचा जो को

श ह्म· धारकावखव तो· स· वृषणआं
ड· अ·पु·

**अंडज:** अंडाज्जात: अंडज:, अंडापा
सून जोउत्पन्न तो· कृ· जनीधा· प्रादु-
र्भावअ· पक्षि· २ सर्प· ३ ब्रह्मदेव· ४
मत्स्य· अ·पु·

**अतट:** नतटो:स्यत्रेतिअतट:, नाहीं
आहे तट ज्याचेठायीं तो· स· पर्वताचा
तुटलेलाकडा· अ·पु·

**अतलस्पर्श** नविद्यतेतलस्पर्शो:त्रे-
त्यतलस्पर्श, नाहींआहे तलस्पर्श ह्म· अं
त ज्याविषयीं तें· स· ज्याचा तलाचा
अंत नाहीं तें· वि· अ· पु·न·आबं·-
स्त्री·

**अतसी** अततीत्यतसी, निरंतरग-
मन करित्येजी ती· कृ· अतधा· सात
त्यगमनअ· धान्यविशेष· ज्यास ज-
वस असें ह्मणतात ती· ईबं· स्त्री·

**अति** अततीत्यति, प्रकर्षाविषयीं अ
थवा लंघनार्थीं निरंतर गमन करितो
जो तो· कृ· अतधा· सातत्यगमनअ·
उत्कर्ष·२ अतिक्रमण·उ· अत्युत्तमो
विष्णु: २ अतिवेलंजलधिजलं· को·
अतिशय· स्तुति· पूजा· अव्य·

**अतिक्रम:** अतिक्रमणमतिक्रम:,
अतिक्रमण जें तो· कृ· क्रमुधा· पा
दविक्षेपअ· शत्रूवर निर्भयपणानें
शूरांचें गमन· २ उल्लंघन· अ·पु·

**अतिचरा** अतिचरतीत्यतिचरा, सं
चरण करित्ये जी ती· कृ· चरधा· ग
तिअ· वनौषधिविशेष जीस पद्मचा
रिणी असें ह्मणतात ती· आबं· स्त्री·

**अतिछत्र: अतिछत्रा** छत्रमति
क्रांत: अतिछत्र:, आकृत्यादिकानें
छत्रातें अतिक्रमण करून राहिला
जो तो· स· जलतृणविशेष ह्मा वेरवं
डासारखा असतो·अ·पु· २ शोफेची
भाजी· आबं· स्त्री·

**अतिजव:** अतिशयितोजवोस्यअ
तिजव:, अतिशयित आहे जव ह्म·
वेग ज्याचा तो· स· अतिवेगवान्· वि·
अ·पु·न·आबं· स्त्री·

**अतिथि:** अततीत्यतिथि:, गमन
करितो जो तो· कृ· अतधा· सातत्य
गमनअ· दुरून श्रमून वैश्वदेवांतीं
आलेला· इ·पु·

**अतिनु** नावमतिक्रांतमतिनु, नौके
प्रत अतिक्रमण करून राहिलें जें-
तें· स· नौकेचें अतिक्रमण केलेलें
जलादि· औ· पु·स्त्री·न·

**अतिपंथाः** अतिशयेनशोभनःपंथाः अतिपंथाः, अतिशयेंकरून उत्कृष्ट जोमार्ग तो. स. चांगलामार्ग. इन्. पु.

**अतिपातः** अतिपतनमतिपातः, अतिपतन जें तो. कृ. पत्लृधा. गमन- अ. अर्थादि सर्व अतिक्रमशब्दाप्रमाणें

**अतिबलः** अति अत्यंतं बलंयस्यसः अतिबलः, अत्यंत आहे बल जास तो. स. बलिष्ठ. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अतिमात्रं** मात्रास्तोकं अतिक्रांतम तिमात्रं, स्वल्पातें अतिक्रमण करून राहतें ह्म. त्याचें विरोधि जें तें. स. अ तिशय. अ. न.

**अतिमुक्तः** अतिक्रांतोमुक्तंशौक्ल्या तइतिअतिमुक्तः, शुक्लगुणानें मुक्ताफलाप्रत अतिक्रमण करू. न राहिला जो तो. एकफुलझाड - ज्यास कुसरी, कस्तूरीमोगरा असें ह्मणतात तो. अ. पु.

**अतिमुक्तकः** अतिशयितःमुक्तो विस्तारोयस्येत्यतिमुक्तकः, अत्यंत मुक्त आहे विस्तार जो तो ज्याचा तो. स. तिवसाचें झाड. अ. पु.

**अतिरिक्तः** अतिरिच्यतेस्मइत्य- तिरिक्तः, अतिरिक्त होइजेला जो- तो. कृ. रिचिर्‌धा. विरेचनं अ. अ धिक. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अतिवक्ता** अत्यंतंवक्ताअतिवक्ता, अत्यंत जो वक्ता ह्म. बोलका तो. स. बहुतबोलणारा. ऋ. पु. न. ईबं. स्त्री.

**अतिवादः** अतिक्रम्यउक्तिरतिवा दः, अतिक्रमण करून जी उक्ति तो. स. निष्ठुरभाषण. अ. पु.

**अतिविषा** विषमतिक्रांताअतिवि षा, विषातें अतिक्रमण करून राहि ली जी ती. स. औषधिविशेष. आबं. स्त्री.

**अतिवेलं** वेलांमर्यादांअतिक्रात- मतिवेलं, मर्यादेतें अतिक्रमण क रून राहिलें जें तें. स. अतिशय. अ. न.

**अतिशक्तिता** अतिशयिताशक्तिर स्यतस्यभावोऽतिशक्तिता, अत्यंत शक्तिमानाचो जो भाव ह्म. सत्ता ती. त. अतिपराक्रम. आबं. स्त्री.

**अतिशयः** अतिशयनमतिशयः, अतिशयन ह्म. आधिक्य जें तें. कृ. शीङ्‌धा. स्वप्नार्थक. उत्कर्ष. अ. पु.

**अतिशोभनं** अतिशयेनशोभनः

अतिशोभनः, अतिशयेंकरून जो शोभन तो अतिशोभन. स. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अतिसर्जनं** अतिशयेनसृज्यतेत-दतिसर्जनं, अतिशयेंकरून देइजेतें जें तें. कृ. सृजधा. विसर्गअ. अतिशयदान करणें. अ. न.

**अतिसारकी** अतिसारोस्यास्तीति-अतिसारकी, अतिसार आहे ज्यास तो. त. अतिसाररोगझालेलापुरुष इन्. पु. न. ईबं. स्त्री.

**अतींद्रियं** इंद्रियमतिक्रांतमतींद्रि-यं, इंद्रियातें अतिक्रमण करून राहिलें जें तें. स. इंद्रियागोचर. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अतीव** अतिचइवचेत्यतीव, अत्यंत निश्चयेंकरून. स. अतिशयार्थी-अव्य.

**अत्तिका** अत्तिभ्रातृभार्यावचनेरि त्यत्तिका, भ्रातृभार्येतें वचनानीं भक्षण करित्ये ह्म. त्रासदेत्येजी ती. कृ. अदधा. भक्षणअ. ज्येष्ठभगिनी. २ चुल्ली. ३ नाट्योक्ति. आबं. स्त्री.

**अत्यंतकोपनः** अत्यंतंकुप्यतितच्छीलः अत्यंतकोपनः, अत्यंत कोपनशील ह्म. कोपिष्टस्वभावाचा जो-तो. कृ. कुपधा. क्रोधअ. अतिकोपिष्ठ. वि. अ. पु. न. ईबं. स्त्री.

**अत्यंतीनः** अत्यंतंगामी अत्यंतीनः, अत्यंत गमन करितो जो तो. त. फार चालणारा. अ. पु.

**अत्ययः** अत्ययनमनेनवा अत्ययः, अतिशयेंकरून जें गमन ह्म. मरण तें किंवा तें होतें जेणेंकरून तो. कृ. अय धा. गतिअ. मरण. अ. पु.

**अत्यल्पः** अतिशयेन अल्पः अत्यल्पः, अतिशयेंकरून जो अल्प तो. स. अत्यंत अल्प. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अत्यर्थं** अर्थमतिक्रांतमत्यर्थं, अर्थाप्रत अतिक्रमण करून राहतें जें तें. स. अतिशय. अ. न.

**अत्यध्यक्षं** अक्षेषु इति अध्यक्षं अध्यक्षमतिक्रांतमत्यध्यक्षं, इंद्रियांचे ठायीं ह्म. इंद्रियगोचर जें तें अध्यक्ष त्याप्रत अतिक्रमण करून राहिलें तें अत्यध्यक्ष. स. इंद्रियातीत. अ. न.

**अत्याहितं** अतीवमनसि आधीयतेस्म इति अत्याहितं, अत्यंत मनाचा ठायीं धरलें जें तें. कृ. डुधाञ्धा. धारणअ. जीवाची आशा न धरितां

केलेलें साहसकर्म. २ मोठें भय. अ. न.

**अत्रिः** अत्तुंतेइत्यत्रिः, व्याप्त करितो जो तो. कृ. अत्र्धा. व्याप्तिअ. अत्रिनामक सप्तर्षींतला एक ऋषि. इ. पु.

**अथ** अर्थयतइतिअथ, प्रश्नाद्यर्थाची याच्ञा करणारा ह्म. अनंतराद्यर्थकजो तो. कृ. अर्थधा. उपयाच्ञाअ. मंगल. २ प्रारंभ. ३ प्रश्न. ४ अनंतर. ५ साकल्य. उ. अथातोब्रह्मजिज्ञासा. २ अथशब्दानुशासनंलिख्यते. ३ स्नानंकृत्वाथभुंजीत. ४ अथवक्तुंसमर्थोसि. ५ अथधामूक्ष्मः को. समुच्चय. संशय. अधिकार. प्रतिज्ञा. अव्य.

**अथो** विग्रहादिसर्वपूर्वशब्दाप्रमाणें. - अव्य.

**अदभ्रं** दभ्रादन्यददभ्रं, अल्पाहून जें अन्य ह्म. अधिक तें. स. पुष्कळ. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अदर्शनं** दर्शनस्य अभावः अदर्शनं, दर्शनाचा जो अभाव ह्म. दर्शनप्रतिबंध तें. कृ. दृशिर्धा. प्रेक्षणअ. दृष्टीचें आच्छादन. अ. न.

**अदितिनंदनः** अदितेर्नंदनः अदितिनंदनः, अदिती जी तिचा जो नंदन ह्म. पुत्र तो. स. देव. अ. पु.

**अदृक्** नदृष्टिरस्येतिअदृक्, नाहीं आहे दृष्टि ज्यास तो. स. आंधळा. श. पु.

**अदृष्टं** नदृष्टमदृष्टं, दृष्ट ह्म. अवलोकित जें तें. नव्हे जें दृष्ट तें. अथवा अकस्मात प्राप्त होतें जें तें. स. अनवलोकित.- अग्न्युत्पात अतिवृष्टि अनावृष्टि मूषक शलभ यानीं केलेलें भय. अ. न.

**अदृष्टिः** विरुद्धादृष्टिरदृष्टिः, विरुद्ध ह्म. प्रतिकूल जी दृष्टि ती. स. क्रूरदृष्टि. इ. स्त्री.

**अद्धा** अतंसंततं गमनंदधातीतिअद्धा, निरंतर गमनाला धारण करितो जो तो. कृ. डुधाञ्धा. धारणपोषणअ. साक्षाद्या अर्थी. उ. अद्धा अवैति. अव्य.

**अद्भुतं** अदाश्चर्यंतस्यभवनंअद्भुतं, आश्चर्याचें जें भवन ह्म. उत्पत्ति तें. स. आश्चर्य. २ आठरसांतील एक रस. अ. न.

**अद्मरः** अत्तुंशीलमस्येत्यद्मरः, भक्षण करण्याचा आहे शील ह्म. स्वभाव ज्याचा तो. कृ. अदधा. भक्षणअ. खादाड. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अद्य** अस्मिन्नहनिअद्य, आजच्या दिवसीं जें तें. त. आजच्या अर्थी. उ. अद्यगंतुंनशक्नोमि. अव्य.

**अद्रिः** अत्तिअद्यतेवाअद्रिः, भक्षण

करितो अथवा भक्षिजेतो जो तो. कृ. अदधा. भक्षणअ. पर्वत. २ वृक्ष. ३ सूर्य. इ. पु.

**अद्वयवादी** अद्वयंवदत्यवश्यमित्य द्वयवादी, अवश्य अद्वयातें बोलणारा जो तो. कृ. वदधा. व्यक्तवाणीअ. बुद्धाचा अवतार. इन. पु.

**अधमः** अवत्यस्मादात्मानमधोभवो वाअधमः, रक्षणकरिजेतें जापासून किंवा अधोभागीं जो होतो तो. कृ. अवधा. रक्षणअ. १ त. निकृष्ट. २ न्यून. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अधमर्णः** अधममृणमस्याधमर्णः, अधमआहे ऋणजाचें तो. स. ऋण घेणारा रिणको. अ. पु.

**अधरः** धरादूर्ध्वात्कठिनाद्वाअन्योधरः ऊर्ध्वकिंवा कठिणपाहून जोअन्यतो किंवा नध्रीयतइत्यधरः, नाहीं विध्वंसनकरीत जो तो. स. कृ. धृङ्धा. अवध्वंसनअ. अधरोष्ठ, ओंठ. अ. पु. २ खालचा. ३ अधम. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अधरात्** अधरस्मिन्देशेकालेवाअधरात्, अधोदेशीं अथवा कालींतोअर्थ. उ. अधराद्गतः अव्य.

**अधरेण** अधरस्यांदिशिअधरेण, ग्रामादिकापेक्षां पश्चिमसमीपजें तें. अर्थ अधरात् याशब्दाप्रमाणें. अव्य.

**अधरेद्युः** अधरेन्हिअधरेद्युः खालच्या दिवसाच्यादायींजोतो. त. अधरदिवसीं त्याअर्थी. उ. अधरेद्युः प्रसूता. अव्य.

**अधस्तात्** अधः अधरस्मिन्नधस्तात् अधोभागाच्येठायींजोतो. त. खालीं त्याअर्थी. उ. अधस्ताद्गतः अव्य.

**अधामार्गवः** धाम्नोर्गः गतिःधामार्गः, धामर्गंवातीतिधामार्गवः अविद्यमानः धामार्गवोयस्मात्सः अधामार्गवः, धामार्गाचा गतीतें देतोजोतोधामार्गव अविद्यमानआहे धामार्गवजाहून तो. कृ. वाधा. गतिअ. आघाड्याचें झाड अ. पु.

**अधिकं** अध्यारूढमधिकं, अत्यंत आरूढ म्ह. परिमाणावरजें तें. त. अधिक. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अधिकर्द्धिः** अधिकाऋद्धिर्यस्येत्याधिकर्धिः, अधिक आहे ऋद्धि म्ह. समृद्धिजाची तो. स. संपन्न. वि. इ. पु. न. आवं. स्त्री.

**अधिकांगं** अधिकमंगादधिकांगं, अंगापेक्षां जें अधिक तें. स. पुरुषानें आंगरखा घालून पाठीवरून छातीवर

बांधलेलें वस्त्र ज्यास पचांगी असें म्ह-
णतात ती. अ. न.

**अधिकारः** अधिकरणमधिकारः, अ-
धिकाराचें जें करण म्ह. क्रिया तो. क्र.
डुकृञ्धा. करण अ. व्यवस्था देवणें.
अ. पु.

**अधिकृतः** अधिउपरिकृतो अधि-
कृतः, उपरिभागाचे ठायीं जो कृत तो.
स. अधिकारी. अ. पु.

**अधिक्षिप्तः** अधिक्षिप्यतेस्मइत्य-
धिक्षिप्तः, अधिक्षेपिजेला म्ह. तिर-
स्कृत केला जो तो. कृ. क्षिपधा. प्रे-
रणअ. आक्षेपिलेला. अ. पु. आ-
बं. स्त्री. अ. न.

**अधित्यका** अध्यारूढाभूमिरधि-
त्यका, अध्यारूढा म्ह. उच्चप्रदेशीं-
चीजी भूमि ती. त. पर्वतावरची उंच
भूमि. आबं. स्त्री.

**अधिपः** अधिपातीत्यधिपः, अत्यं-
त रक्षण करितो जो तो. कृ. पाधा.
रक्षणअ. प्रभु अथवा यजमान.
अ. पु.

**अधिभूः** अधिभवतीत्यधिभूः, -
प्रभुत्वेंकरून होतो जो तो. कृ. भूधा.
सत्ताअ. प्रभु स्वामी. ऊ. पु.

**अधिरोहिणी** अधिरुह्यते नया ऽधि-
रोहिणी, आरोहण करिता हे त जीणें ती.
कृ. रुहधा. बीजादिकअ. शिडी, निस-
ण. ईबं. स्त्री.

**अधिवासनं** अधिवास्यत इत्यधिवास-
नं, अधिक सुवासित करितात जें तें. कृ.
वासधा. उपसेवनअ. गंधमाल्यादिक-
नीं केलेला संस्कार. अ. न.

**अधिविन्ना** अधिउपरिविन्नं लाभोय-
स्याः सा अधिविन्ना, अधिउपरि म्ह. पू-
र्वीं आहे पतीला लाभ जीचा ती. स. अ-
नेक स्त्रियांतून पूर्वीं पाणिग्रहण केलेली
आबं. स्त्री.

**अधिश्रयणी** अधिश्रियते ऽधिश्रय-
णी, पाक करिजे तो जीचा ठायीं ती. कृ.
श्रीञ्धा. पाकअ. चूल. ईबं. स्त्री.

**अधिष्ठानं** अधितिष्ठतिरधिष्ठीयते वा
अधिष्ठानं, राहतो किंवा राहिजे तो जे-
णेंकरून तें. कृ. ष्ठाधा. गतिनिवर्तन-
अ. बसणें. २ चाक. ३ नगर. ४ प्रभाव.
अ. न.

**अधीनः** इनमधिगतो अधीनः, स्वामी-
प्रत प्राप्त झाला जो तो. स. स्वाधीन. वि
अ. पु. न. आबं. स्त्री.

**अधीरः** नधीर्धैर्यमस्य अधीरः, ना

ही आहे धैर्य जास तो॰ स॰ भयानें व्याकुल॰ वि॰ अ॰ पु॰ न॰ आबं॰ स्त्री॰

**अधीश्वर:** अधिक: ईश्वर: अधीश्वर:, अधिक ह्म॰ अत्यंत जो ईश्वर तो॰ स॰- देशांतरींचे राजे सर्व जास नम्र आहेत तो॰ अ॰ पु॰

**अधुना** अस्मिन्काले अधुना, याकालाच्याठायीं॰ न॰ सांप्रत त्या अर्थी॰ अव्य

**अधृष्ट:** धर्षतीति धृष्ट:, नधृष्ट: अधृष्ट:, सहन करितो जो तो धृष्ट नव्हे जो धृष्ट तो अधृष्ट॰ स॰ लज्जित॰ वि॰ अ॰ पु॰ न॰ आबं॰ स्त्री॰

**अधोंशुकं** अध: अंशुकं अधोंशुकं, देहाच्या अधोभाग संबंधीं जें वस्त्र तें॰ स॰ नेसावयाचें वस्त्र॰ अ॰ न॰

**अधोक्षज:** अध: अक्षजं यस्य स अधोक्षज:, खालीकडेस आहे इंद्रियजन्य ज्ञान ज्याच्या तो अधोक्षज॰ स॰ विष्णु॰ अ॰ पु॰

**अधोभुवनं** अध: स्थितं भुवन मधोभुवनं, अधोभागीं स्थित जें भुवन- ह्म॰ रसातल तें॰ स॰ पाताल॰ अ॰ न॰

**अधोमुख:** अध: मुखं यस्य स अधोमुख:, अधोभागीं आहे मुख जें तें ज्याचें तो॰ स॰ अधोवदन॰ वि॰ अ॰ पु॰ न॰- ई॰ बं॰ स्त्री॰

**अध्यक्ष:** अधिगतोक्ष मधिगतोक्षेण॰ वाक्षेषु अधिकृतोधिकृतान्यक्षाण्यस्याध्यक्ष्णोतिवा अध्यक्ष:, इंद्रियांप्रत किंवा इंद्रियें करून अथवा व्यवहाराविषयीं अधिकृत आहेत अक्षि जाचीं अथवा व्याप्ति करितो जो तो॰ स॰ २ कृ॰ अ ष्पृथा॰ व्याप्तिअ॰ अधिकारी॰ अ॰ पु॰ २ प्रत्यक्ष॰ वि॰ अ॰ पु॰ न॰ आबं॰ स्त्री॰

**अध्यवसाय:** अध्यवसानं अध्यवसाय:, अध्यवसान जें तो॰ कृ॰ षोंतकर्मणि॰ उत्साह॰ अ॰ पु॰

**अध्यापक:** अध्यापयतीत्यध्यापक:, पढवितो जो तो॰ कृ॰ इङ्॰ धा॰ अध्ययनअ॰ पढविणारा॰ अ॰ पु॰

**अध्याहार:** अध्याहरणं अध्याहार:, अध्याहरण ह्म॰ ग्रंथादिकांत अर्थपूर्तिकरितां योग्य पदादिकांची जी योजना तो अध्याहार॰ कृ॰ हृञ्‌धा॰ हरण अलर्क॰ अ॰ पु॰

**अध्यूढा** अधिउपरि ऊढसु द्वहनं यस्या: सा अध्यूढा, उपरिकालीं ह्म॰ प्रथमत: आहे विवाह जीचा ती॰ स॰ एका पुरुषानें अनेक विवाहितें स्त्रियांतील पहिली स्त्री॰ आबं॰ स्त्री॰

अध्येषणा अध्येषणमध्येषणा, आराधनजें ती. क्र. इषधा. गतिअ. कोणे करुणाविषयीं प्रार्थना करून सांगणें. आवं. स्त्री.

अध्वगः अध्वानंगच्छतीतिअध्वगः, मार्गाप्रत गमन करितो जो तो. क्र. गम्लृधा. गतिअ. मार्गस्थ. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

अध्वनीनः अध्वानमलंगच्छतीति अध्वनीनः, मार्गाप्रत अत्यंत गमन करितो जो तो. त. मार्गस्थ. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

अध्वा अत्तिबलमिति अध्वा, बल क्षीण करितो जो तो. क्र. अद्धा. भक्षणअ. मार्ग. न्. पु.

अध्वन्यः विग्रहादिसर्वअध्वनीनशब्दाप्रमाणें.

अध्वरः नध्वरतीत्यध्वरः, कौटिल्यातें पावत नाहीं जो तो. क्र. ध्वृधा. हूर्छनअ. यज्ञ. अ. पु.

अध्वर्युः अध्वरंयातीतिअध्वर्युः, यज्ञाप्रत जातो जो तो. क्र. याधा. प्रापणअ. यजुर्वेदी ऋत्विज. उ. पु.

अनक्षरं नप्रशस्तान्यक्षराणियस्मिन् तदनक्षरं, नाहीं आहेत प्रशस्त अक्षरें जाचेठायीं तें. स. अवाच्यभाषण. अ. न.

अनंगः नास्तिअंगंयस्येतिअनंगः, नाहीं आहे अंग म्ह. शरीर जें तें ज्यास तो. स. मदन. अ. पु.

अनच्छः नअच्छःअनच्छः, नव्हे जो अच्छ म्ह. स्वच्छ तो. स. गढूळ. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

अनड्वान् अनः शकटं वहतीति अनड्वान्, शकटातें वाहतो जो तो. क्र. वहधा. प्रापणअ. बैल. ह. पु. न. ई. स्त्री.

अनध्यक्षं अक्षमधिगतमध्यक्षं न अध्यक्षं अनध्यक्षं इंद्रियग्राम जेंनें अध्यक्ष नव्हे जें प्रत्यक्ष तें अनध्यक्ष. स. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

अनंतः नअंतोयस्यसःअनंतः, नाहीं आहे अंत जो तो ज्याचा तो. स. शेष. अ. पु. २ विष्णु. अ. पु. ३ आकाश. अ. पु. न. ४ मर्यादातीत. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

अनंता नास्त्यंतोयस्याःसाअनंता, नाहीं आहे अंत जो तो जीचा ती. स. पृथ्वी. २ धमासा. ३ दूर्वा. ४ अग्निशिखा. ५ उपळसरी म्ह. उपरसाल. आवं. स्त्री.

**अनीक** अनंत्यनेनानीकं, जीवनहो तेंहें जेणेंकरून तें. कृ. अनधा. प्राणनअ. सेना, फौज. अ. न.

**अनीकस्थ:** अनीकेतिष्ठतीति अनीकस्थ:, सैन्याचेठायीं राहतो जो तो. कृ. ष्ठाधा. गतिनिवृत्तिअ. सेनारक्षकगण. अ. पु.

**अनीकिनी** अनीकंरणेतिप्रयोजनलेनअस्या अनीकिनी, सैन्य आहे अतिप्रयोजनत्वेंकरून जीसती. सेना. ईव. स्त्री. त

**अनु** अनितीत्यनु, पूर्वव्यापारावांचून ज्याचीउपपत्तिहोत नाहीं तें. कृ. अनधा. प्राणनअ. पश्चात्. सादृश्यार्थी भूपमनुगच्छति. २पितरमनुकुर्वते. को. लक्षण. वीप्सा. इत्थंभूतभाग. आयाम. हीन. सह. अव्यय.

**अनुक:** अनुकामयत इत्यनुक:, कामना ह्म. इच्छा करितोजो तो. कृ. कमुधा. कांतिअ. अतिकामी. कामुक, कामाभिभूत. अ. पु.

**अनुकंपा** अनुकंपनमनुकंपा, अनुकंपनजेंती. कृ. कंपिधा. चलनअ. दया. आकं. स्त्री.

**अनुकर्षा** अनुकृष्यतेनेनानुकर्षा, अनुकर्षणकरिजेतें जेणेंकरूनं तो. कृ. कृषधा. विलेखनअ. रथाच्या खालच्या बाजूचें एक लांकूड. न. पु

**अनुकर्ष:** विग्रहादिसर्व अनुकर्षाशब्दाप्रमाणें. अ. पु.

**अनुकल्प:** अनुहीन: कल्पोअनुकल्प:, गौणजोविधि तो. स. गौणपक्ष. अ. पु.

**अनुकामीन:** कामस्यसदृशमनुकामं तद्गामी अनुकामीन:, यथेच्छ जें गमन त्यातें करितो जो तो. न. स्वछंदानें फिरणारा. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनुकार:** अनुकरणमनुकार:, अनुकरणजेंतो. कृ. कृञ्धा. करणअर्थ. अनुकरण, दुसऱ्यासारखें करणें. अ. पु.

**अनुक्रम:** अनुक्रमणमनुक्रम अनुक्रमणजेंतो. कृ. क्रमुधा. पादविक्षेपअ. क्रम. अ. पु.

**अनुक्रोश:** अनुक्रोशंत्यनेनेति अनुक्रोश:, आह्वान करितात जेणेंकरून तो. कृ. क्रुशधा. आह्वानअ. दया. अ. पु.

**अनुगं** अक्षमिंद्रियंप्रतिगतमनु

ग, इंद्रियांप्रत गत स. प्राप्त तें. कृ. ग म्लृधा. गतिअ. अनुसरून त्याअर्थी. अव्यय.

**अनुग्रहः** अनुग्रहणमनुग्रहः, अनुग्रहण जें तो. कृ. ग्रहधा. उपादानअ. स्वीकार, २उपदेशविशेष. अ. पु.

**अनुचरः** अनुचरतीत्यनुचरः. अनुलक्षून गमन करितो जो तो. कृ. चरधा. गतिअ. सेवक, चाकर. अ. पु.

**अनुजः** अनुपश्चाज्जातः अनुजः, पाठीमागून झालेला. स. कनिष्ठबंधु. अ. पु.

**अनुजीवी** अनुजीवितुंशीलमस्या नुजीवी, स्वामिजीवनाला अनुसरून जगण्याविषयीं आहे स्वभाव ज्याचा तो. कृ. जीवधा. प्राणधारणअ. सेवक चाकर. इन्. पु.

**अनुतर्षणं** अनुतृष्यतेअनेनेति-अनुतर्षणं, अनुतर्षण होतें हे जेणें करून तें. कृ. तृषाधा. पिपासाअ. मद्यपान. अ. न.

**अनुतापः** अनुतपनमनुतापः, अनुतपन म्ह. संतापन जें तो. कृ. तपधा. संतापअ. पश्चात्ताप. अ. पु.

**अनुत्तमः** नोत्तमोयस्मादित्यनुत्तमः, नाहीं आहे उत्तम ज्याहून तो. स. मुख्य २सर्वोत्तम. अ. पु.

**अनुत्तरः** नउत्तरोयस्मादित्यनुत्तरः, नाहीं आहे उत्तर म्ह. मोटा ज्याहून-तो. स. श्रेष्ठ. २उत्तम. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अनुदात्तः** उच्चैरुदात्तः नउदात्तः अनुदात्तः उच्चस्वरानें उच्चारिजेतो तो उदात्त न व्हे जो उदात्त तो अनुदात्त स. स्वरविशेष. अ. पु.

**अनुपदं** परस्यपश्चादनुपदं, अन्याचा पश्चात् जें तें. स. अन्याचा लगन अनुसरून. अव्य.

**अनुपदीना** पादस्यायामोनुपदं-अनुपदंबद्धा अनुपदीना, चरणाचा जो आयाम म्ह. विस्तार तें अनुपद अनुपद जी बद्धा ती अनुपदीना. स. बाह्मण. आ. स्त्री.

**अनुपमा** नास्तिउपमायस्याः साअनुपमा, नाहीं आहे बलवर्णादिकें करून उपमा जीस ती. स. कुमुदनाम क नैर्ऋत्यदिशेचा हत्तीची स्त्री. आबं. स्त्री.

अनुप्लवः अनुप्लवत इत्यनुप्लवः, प श्चात् गमन करितो जो तो· कृ· प्लुङ् धा· गतिअ· अनुचर सेवक· अ· पु·

अनुबंधः अनुबध्यतेनेनेत्यनुबंधः अनुबंध करिजेतो जेणेंकरून तो· कृ· बधधा· बंधनअ· दोषोद्भावन· २प्रकृ तिप्रत्ययांतील नश्वरभाग· ३ माता पितर यांस अनुसरणारा पुत्र· ४प्र· कृतकार्यास अनुसरणें· अ· पु·

अनुबोधः अनुबुद्धिरनुबोधः, पूर्वा वगमनाला अनुसरून जो अवगम तो· कृ· बुधधा· अवगमनअ· जाव स्तूचा गंधगेला त्यास तो पुनः आण णें· अ· पु·

अनुभवः अनुभवनमनुभवः अ नुभवन ह्य· अनुभव घेणें जें तो· कृ· भूधा· सत्ताअ· साक्षात्कार· अ· पु·

अनुभावः अनुभावयतिरसानि तिअनुभावः, रसांप्रत उत्पादन क रितोजोतो· कृ· भूधा· सत्ताअ· अ भिप्रायसूचक नेत्रकटाक्षादिक· २ प्रभाव· ३ साधूंचाबुद्धिनिश्चय· अ·पु·

अनुमतिः अनुमन्यतेस्त्वभक्तेभ्यः अनुमतिः, अनुमोदिजेत्येजी ती· कृ· मनधा· ज्ञानअ· अनुमोदन· २ कलाहीन चंद्रानें युक्त पौर्णिमा· इ· स्त्री·

अनुयोगः अनुयोजनमनुयोगः, अ नुयोजन जें तो· कृ· युजिरधा· योग· अ· प्रश्न· अ· पु·

अनुरोधः अनुगम्यरोधनमनुरोधः, अनुगमन करून जें पराचें रोधन तो· कृ· रुधिरधा· आवरणअ· अनुकूल· ता· अ· पु·

अनुलापः अनुलपनमनुलापः, अ नुलपनजें तो· कृ· लपधा· व्यक्तवाणी अ· शोकयुक्त भाषण· अ· पु·

अनुलेपनं अनुलिप्यतेनेनेत्यनुले पनं, अंगादिकास लेप केलाजातो जेणेंकरून तें· कृ· लिपधा· उपदेह अ· गंधाचीउटीवगैरे· अ· न·

अनुवर्तनं अनुगम्यवर्तनमनुवर्तनं, अनुगमनानें जें वर्तन तें· कृ· वृतुधा· वर्तनअ· अनुकूलता· अ· न·

अनुवाकः अनूच्यतेअनुवाकः, वा रंवारउच्चारण केलाजातो जोतो· कृ· वचधा· परिभाषणअ· वेदांचाअव यव· अ· पु·

अनुशयः अनुशयनमनेन वानुशयः अनुशयन ह्य· पश्चात्ताप अथवा तो आहे जेणें करून तो· कृ· शीङ्धा·

स्तंभअ· दीर्घद्वेष· २पश्चात्ताप· ३ अनु बंधशब्दाचाअ· अ· पु·

**अनुष्णः** नउष्णः अनुष्णः, नव्हे जो उष्ण तो· स· उष्णनव्हे तो· २ आलस्ययुक्त· वि· अ· पु· न· आब· स्त्री·

**अनुहारः** अनुहरणमनुहारः, अनुहरण जें तो· कृ· हृञ्धा· हरणअ· अनुकरणकरणें· अ· पु·

**अनूनकं** ऊनयतीतिऊनं नऊनमनूनं अनूनमेवअनूनकं, अपूर्णहोतें जें तें ऊन नव्हे जें ऊन ह्म· न्यून तें अनून - अनूनजें तेंच अनूनक· न· स्वभाव· वंश· अ· न· ३ पूर्वजन्म· अ· पु·

**अनूचानः** अन्ववोचदितिअनूचानः सांगवेदाध्ययन करिता झाला जो तो· कृ· वच्धा· परिभाषणअ· यथासांग वेदाध्ययनकर्ता· वि· अ· पु· न· आब· स्त्री·

**अनूनं** ऊनयतीत्यूनं नऊनमनूनं, ऊनयति ह्म· न्यूनहोतें जें तें ऊन नव्हे जें ऊन तें· स· संपूर्ण· वि· अ· पु· न· आब· स्त्री·

**अनूनकं** अनूनमेवअनूनकं, अनूनजें तेंच अनूनक· न· परिपूर्ण· वि· अ· पु· न· आब· स्त्री·

**अनूपं** अनुगताआपोअस्मिन्निति अनूपं, अनुगत ह्म· प्राप्त आहेत उदकें ज्याचे ठायीं तो· स· जलप्राय ह्म· पाणथल भूप्रदेश· वि· अ· पु· न· आब· स्त्री·

**अनूरुः** अविद्यमानावूरूयस्येत्यनूरुः, नाहीं आहेत ऊरू ह्म· मांड्याजा स तो· स· सूर्यसारथि· उ· पु·

**अनृजुः** नऋजुः अनृजुः, नव्हे जो ऋजु ह्म· सरळ तो· स· वक्र· वि· अ· पु· ईउस्त्री· उ· न·

**अनृतं** नऋतमनृतं, नव्हे जें ऋत ह्म· सत्य किंवा उंछशीलादि तें· स· अनृतभाषण· २ कृषिकर्म· अ· न·

**अनेकपः** अनेकेनकरेण मुखेनच पिबतीतिअनेकपः, अनेक ह्म· शुंडादंडानें व मुखानें उदकपान करितो जो तो· कृ· पाधा· पानअ· हस्ती· अ· पु·

**अनेडमूकः** नएडमूकोस्मादनेडमूकः, नाहीं आहे एडमूक जाहून तो· स· मुकाअसून बेहरा· २ आंधळा· ३ शठ· अ· पु·

**अनेहाः** नईहतइत्यनेहाः, नाहीं चेष्टा करीत जो तो· कृ· ईहधा· चेष्टाअ· काळ· स· पु·

**अनोकहः** अनसः अकंगमिं हंतीति

अनोकहः, शकटान्यागतीतें प्रतिबं धकरितो जो तो. कृ. हनधा. हिंसाअ. वृक्षविशेष. अ. पु.

अंतःपुरं अंतरेपूर्वेगृहंअंतःपुरं, अभ्यंतराचाठायीं जें गृह तें. स. राजां-चें स्त्रीगृह. अ. न.

अंतः अंततनमंतः, अंतन स्त्र. नाश-जोतो. कृ. अनिधा. बंधनअ. मरण २नाश. ३समाप्ति. अ. पु. ४शेवटचा वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

अंतकः अंतंकरोतीत्यंतकः अंत-स्त्र. मरणांत नाश करितो जो तो. कृ. कृधा. करणअ. यम. अ. पु.

अंतरं अंतंरातिअंतरं, अंतानें दे-तें जें तें. कृ. राधा. दानअर्थ. अव-काश. २अवधि. ३पांघरूण. ४आ-च्छादन. ५भेद. ६छिद्र. ७अवसर. ८मध्य. ९अंतरात्मा १० सादृश्य. अ. न. ११आत्मीय. उ० १अंतरेहिमं २ मासांतरेदेयं. ३अंतरे शाटकाः ४ पर्वतांतरितोरविः. ५ यदंतरंसर्प पशोर्लराजयोः. ६ग्रहयांतरेग्रहतंव्यं. ७ अंतरंगः सेवकः. ८ आवयोरंतरे पर्वतः. ९ दृष्टोंतरेज्योतिरूपः. १० धर्मावस्थह कार्योत्मनमः ११ अप मत्यंतनरोमम. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

अंतरा अंतरेतीतिअंतरा. मध्यरू-पार्थी गमन करितो जो तो. कृ. इण् धा. गतिअ. मध्यभागीं. उ. त्वांमां चांतराअंतरेणवाकमंडलुः अव्य.

अंतरायः अंतर्मध्ये अंतरस्यव्यव धानस्यवा अयनमंतरायः, कृ. अ यधा. गतिअ. विघ्न. अ. पु.

अंतरालं अंतरंलातीतिअंतरालं, अंतर स्त्र. मध्य त्याप्रतलातिग्रहण करितें जें तें. कृ. लाधा. आदानअ. मध्यभागींचा अवकाश. अ. न.

अंतरिक्षं अंतरीक्षं अंतःऋ-क्षाणिनक्षत्राणि अस्येत्यंतरिक्षं, अभ्यंतराचाठायीं आहेत ऋक्षें स्त्र. नक्षत्रें जीनीं ज्यांच्या तें. स. आकाश. अ. न.

अंतरीपं अंतर्गताः आपः अत्रेति अंतरीपं, अंतर्मंत आहेत उदकें ज्या चेठायीं तें. स. द्वीप स्त्र. बेट. अ. न.

अंतरीयं अंतरेभवंअंतरीयं, परि धाना विषयींझालें जें तें. न. नेसा वयाचें वस्त्र. अ. न.

अंतरे विग्रहादिसर्व अंतरा शब्दा प्रमाणें

**अंतरेण** विग्रहादिमध्यार्थपर्यंतपूर्वं शब्दांप्रमाणें· १ त्यासाठीं· २वांचून ४विना· उ· त्वांमांचांतरेणकमंडलु:, २त्वदंतरेणकपयेतत्· ३पुत्रमंतरेणागतः पिता· ४अंतरेचंडालगृहाः· अव्यय·

**अंतर्गतं** अंतर्गम्यतेस्मइत्यंतर्गतं, अभ्यंतराचाठायींजेंलीन तें· कृ·गम्लृ धा· गतिअ· विस्मृतविसरलेंलें· वि अ·पु·न· आवं· स्त्री·

**अंतर्द्वारं** अंतःस्थितंद्वारं अंतर्द्वारं, अंतः स्थित जें द्वार तें· स·गुप्त· द्वार·अ·न·

**अंतर्द्धा·अंतर्द्धिः** अंतर्धानंअंतर्धा· अंतर्धान जेंती· कृ·डुधाञ् धा· धारणअ· आच्छादन· आ·स्त्री इ·स्त्री

**अंतर्मनाः** अंतर्मनोस्य अंतर्मनाः, अभ्यंतराच्चेठायीं खिन्न आहे मनजावें तो· स· व्यग्र· वि· स्·पु·स्त्री·न·

**अंतर्वेशिकः** अंतर्वेशेनियुक्तःअंतर्वेशिकः, अभ्यंतरगृहीं जो नियुक्त तो· व· अंतःपुरींयोजिलेला·अ·पु·

**अंतर्वत्नी** अंतर्वत्न्यस्यांगर्भइतिअंतर्वत्नी, अभ्यंतरीं आहे गर्भजीच्या ती· व· गरोदरस्त्री· ईवं·स्त्री·

**अंतर्वाणिः** अंतर्वाणचक्रीतंतर्वाणि:, अभ्यंतराचेठायीं शब्द करितो जो तो· कृ·वण्धा· शब्दअ· शास्त्रजाणणारा· वि·इ·पु·स्त्री·न·

**अंतावसायी** अंतमवसितुंशीलमस्य अंतावसायी, अंतामत अवसितु हा·अंतकर्मोविषयीं आहे स्वभाव जाचा तो· कृ·षोधा· अंतकर्मअ· नापित न्हावी·न्·न·

**अंतिकः** अंतोस्याकीत्यंतिकः, समीपभाग आहे जास तो· न· जवळचा वि·अ·पु·न· आवं·स्त्री·

**अंतिकतमं** अतिशयेन अंतिकंअंतिकतमं, अतिशयेंकरून जें समीप तें· त· फारजवळचें· वि·अ·पु·न· आवं·स्त्री·

**अंतिका** अंतत्यतेव अंतिका· अग्निबंधन करिजेतें जीच्याठायीं ती· कृ·अतिधा· बंधनअ· चूल·आवं·स्त्री·

**अंतिकाश्रयः** अंतिकेआश्रयनेआश्रयणंवा अंतिकाश्रयः, समीपभागीं आश्रिजेतो अथवा आश्रयणजें तो· कृ·श्रीञ्धा· सेवाअ· समीपाश्रयण· अ·पु·

**अंतेवासी** अंतेसमीपेवस्तुंशील

**अवितं** अवतेस्मइत्यवितं, संरक्षण केलें जें तें. कृ. अवधा. रक्षण अ. रक्षण केलेलें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अविद्धकर्णी** अविद्धोऽच्छिद्रःपर्णरूपः कर्णोयस्या इत्यविद्धकर्णी, अच्छिद्र आहे पर्णरूपी कर्ण जीचा ती. स. पाडवळी, पाहाडमूळ. ई. स्त्री.

**अविद्या** विरुद्धाविद्या अविद्या, विरुद्ध ज्ञान करणारी जी ती. स. अज्ञान. आ. स्त्री.

**अविनीतः** नव्यनायीत्यविनीतः, नाहीं जो नम्र होता झाला तो. कृ. नीञ्धा. प्रापणअ. अनम्र. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अविरतं** अविद्यमानंविरतंयस्मिन्‌तत् अविरतं, जांत विश्राम नाहींतें. स. निरंतर. अव्य.

**अविलंबनं** नविलंबतेस्मइत्यविलंबनं, नाहीं विलंब करितें झालें जें तें. कृ. लबिधा. अवस्रंसन अ. लवकर जाणारें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अविलंबितं** विलंबतेस्म इति विलंबितं, नविलंबितं अविलंबितं, विलंब करितें झालें जें तें विलंबित. नव्हे जें विलंबित तें. स. लवकर जाणारें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अविस्पष्टं** नविस्पष्टमविस्पष्टं, नव्हे जें विशेषें करून स्पष्ट तें. स. अस्पष्टार्थकभाषण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अवी** विग्रहादिसर्व अविशब्दाप्रमाणें विटाळशी. ई. स्त्री.

**अवीरा** नविद्यतेवीरोयस्याः सा अवीरा, नाहीं आहे वीर जिला ती. स. पतिपुत्रहीन स्त्री. आ. स्त्री.

**अवीचिः** अवंतेस्मात् अवीचिः, रक्षण करिताहेत जापासून तो. कृ. अवधा. रक्षणअ. नरकविशेष. इ. पु.

**अवेक्षा** अवेक्षणमवेक्षा, अवेक्षण जें ती. कृ. ईक्षधा. दर्शनअ. अवेक्षण, पाहाणें. आ. स्त्री.

**अव्यक्तः** नव्यज्यतेस्म अव्यक्तः, नाहीं स्पष्ट होत जो तो. कृ. अंजूधा. व्यक्त्यादिअ. विष्णु. २ महादेव. ३ आत्मा. अ. पु. ४ अस्पष्ट. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अव्यक्तरागः** नव्यक्तःरागोयस्य सः अव्यक्तरागः, नाहीं आहे स्पष्ट रक्तिमा जो तो जाचा तो. स. किंचित्लोहितवर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अव्यंडा** विगतमंडंयस्या इति व्यंडा नव्यंडा अव्यंडा, नष्ट आहे बीज जीचें ती व्यंडा नव्हे जी व्यंडा ती. स. वनौ. जीस कुवली कुहिरी असें म्ह. ती. आ. स्त्री.

**अव्यथा** नव्यथतइत्यव्यथा. नाहीं व्यथा म्ह. कंप पावत जी ती. कृ. व्यथधा. भय

वलनअ· हिरडआवें झाड· २ वनी· जीस पयस्करिणी, उत्तरदेशीं स्थलकमलिनी म्ह· ती· आ· स्त्री·

**अव्ययं** नव्येतीत्यव्ययं, कधींहि विकारपा वत नाहीं जें तें· स· इणूधा· गतिअ· तीनलिं गें व सर्व विभक्ति आणि सर्व वचनें ह्यांचे ठायीं समान म्ह· लिंगादिकांनीं विकृत हो त नाहींतें· अ·पु·न·

**अव्यवहितं** नव्यवधीयतेस्मइत्यवहि तं, नाहीं व्यवधान पावत जें तें· कृ· डुधाञ् धा· धारणपोषणअ· सन्निहित, जवळचें वि· अ·पु·न· आ· स्त्री·

**अंशः** अश्यतइतिअंशः, समानविभा गिजेतोजोतो· कृ· अंशधा· समाघातअ· भाग, वांटा· अ·पु·

**अशनाया** अशनस्येच्छाअशनाया, भोजनाची जीइच्छा ती· कृ· अशधा· भो जनअ· क्षुधा· भूक· आ· स्त्री·

**अशनायितः** अशनस्यइच्छाअश नायः, ससंजातोस्यशनायितः, त· बुभुक्षित· वि· अ·पु·न· आ· स्त्री·

**अशनिः** अश्नातीत्यशनिः, दुर्धर्ते भ क्षितोजो तो· कृ· अशधा· भक्षणअ· इं द्राचें प्रज्वनाथक आयुध· इ·पु· स्त्री·

**अशिश्वी** नविद्यतेशिशुर्यस्याः साअशि श्वी, नाहींआहे शिशु म्ह· पुत्रजीस ती· स· पुत्र नाहीं अशी बायको· ई· स्त्री·

**अंशुः** अंशयतीत्यंशुः, विभजन करितो जो तो· कृ· अंशधा· विभजनअ· किरण· अ·पु·

**अंशुकं** अंशुभिः कश्यतइत्यंशुकं, कि रणांनीं देदीप्यमान होतें जें तें· कृ· काशृ धा· दीप्तिअ· वस्त्र· अ·न·

**अंशुमती** अंशवः संत्यस्यामित्यंशुमती, किरण आहेत जीस ती· त· वनी· जीस सालपर्णी, पिठवण असें म्ह· ती· ई· स्त्री·

**अंशुमान्** अंशवः संत्यस्येति अंशुमान्, किरण आहेत जास तो· त· सूर्य· न्·पु·

**अंशुमत्फला** अंशुमंतिसूक्ष्मावयवंति फलान्यस्याइत्यंशुमत्फला, सूक्ष्मावयव वंति आहेत फळें जींतीं जीचीं ती· ब· के ळीचें झाड· आ· स्त्री·

**अशेषं** नशेषोअस्त्यस्येत्यशेषं· नाहीं आहे शेष जो तो ज्याचा तें· म· समग्र, सर्व वि· अ·पु·न· आ· स्त्री·

**अशोकः** अपगतःशोकोयस्मादित्य शोकः, गेला आहे शोक जो तो ज्यापासू न तो· म· अशोकवृक्ष· अ·पु·

**अशोकरोहिणी** अशोकइवरोहती तिअशोकरोहिणी, अशोकाप्रमाणें श

दुर्भूत होत्ये जीती· कृ· रुदधा· प्रादुर्भावअ· कुटकी· ई· स्त्री·

**अश्मगर्भः** अश्मनोगर्भः अश्मगर्भः, पाषाणाचा जो गर्भ तो· स· रत्नविशेष पाच· अ· पु·

**अश्मजं** अश्मनःजातंअश्मजं, अश्म्यापासून जें झालें तें· कृ· जनीधा· प्रादुर्भावअ· यास शिलाजित म्ह· तें· अ· न·

**अश्मपुष्पं** अश्मनःपुष्पमिवअश्मपुष्पं, दगडाचा फुलाप्रमाणें जें तें· स· शिलाजित· अ· न·

**अश्मा** अश्नुतइत्यश्मा, उत्तमप्रकारानें व्यापन करितो जो तो· कृ· अशूङ्धा· व्याप्तिअ· पाषाण, दगड· न्· पु·

**अश्मंतं** अश्मनामंतोत्रेतिअश्मंतं दगडांचा आहे अंत म्ह· नाश जाचेठायीं तें· स· चूल· अ· न·

**अश्मरी** अश्मानंरातीतिअश्मरी· दगडाप्रत ग्रहण करित्ये जी ती· कृ· राधा· आदानअ· मूत्रकृच्छ्र नावाचा रोग· ई· स्त्री·

**अशितं** अश्नुतेइत्यशितं, भक्षिजे तें जें तें· कृ· अशभोजनअ· भक्षण केलेलें· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**अश्मसारः** अश्मनःसारः अश्मसारः, अश्मा म्ह· दगड त्याचा जो सार तो· म· लोखंड· अ· पु· न·

**अश्रपः** नश्रपयतीत्यश्रपः· श्रपणक करीत नाहीं जो तो· कृ· श्राधा· पाकअ· राक्षस· अ· पु·

**अश्रांतं** अविद्यमानंश्रांतंयत्रेत्यश्रांतं, नाहीं आहे विश्रांति जाचेठायीं तें· निरंतर· अव्य·

**अश्रिःअश्री** अश्नुतइत्यश्रिः· आघात करित्ये जी ती· कृ· अशूङ्धा· संघातअ· अग्र शस्त्रधारा· इ· स्त्री· २ ई· स्त्री·

**अश्रु** अश्नुतेकष्टमितिअश्रु, कष्टसेवन करितें जें तें· कृ· अशूङ्धा· व्याप्तिअ· नेत्रोदक, डोळ्यांतील पाणी· अ· न·

**अश्लीलं** नविद्यतेश्रीरत्रेत्यश्लीलं, नाहीं आहे शोभा जाचेठायीं तें· स· शिश्लिलभाषण· अ· न·

**अश्वः** अश्नुतइतिअश्वः, शीघ्र दूरदेश व्याप्ति करितो जो तो· कृ· अशूङ्धा· व्याप्तिअ· घोडा· अ· पु·

**अश्वकर्णकः** अश्वकर्णइवपत्रं यस्य सः अश्वकर्णकः अश्वकर्णासारखें आहे पत्र ज्याचें तो· स· सापन्याचें झाड· अ· पु·

**अश्वत्थः** शाल्मलिवृक्षाद्यपेक्षयाचिरंनतिष्ठतीत्यश्वत्थः, शाल्मलीहून चिरकाल राहात नाहीं जो तो· कृ· ष्ठाधा· गतिनिवृत्ति

अ. पिंपळाचें झाड. अ. पु.

**अश्वयुक्** अश्वेनयुनक्तिरूपेणानुकरो तीत्यश्वयुक्, अश्वाशीं युक्त होत्ये म. अश्व रूपाशीं अनुकरण करित्ये जीती. क्ृ. युजि र्‌धा. योगअ. अश्विनी. ज् स्त्री.

**अश्ववडवं** अश्वश्चवडवाचअनयोः स माहारः अश्ववडवं, घोडाआणि घोडी यां चा जो समाहार तें. घोडाघोडींचा समाहा र. अ. न.

**अश्वमेधीयः** अश्वमेधायहितोश्वमे- धीयः, अश्वमेधाकारणें जो हित तो. त. अ श्वमेधोपयुक्तश्यामकर्ण. अ. पु.

**अश्वा** अश्वस्यजातिरश्वा, अश्वाची जी जाति ती. स्त्री. आ. स्त्री.

**अश्वारोहः** अश्वमारोहतीत्यश्वारोहः अश्वाप्रत आरोहण करितो जो तो. क्ृ. रु हधा. बीजजन्मादिअ. स्वार. २ घोड्याव रबसणें. अ. पु.

**अश्विनी** अश्वः अश्वरूपमस्त्यस्याः अ श्विनी, अश्विनीरूप जें तें अस्तिअस्याः म्ह. आहे जीसती. त. अश्विनी. ई. स्त्री.

**अश्विनीसुतौ** अश्विन्याः सुतावश्विनीसुतौ, अश्विनीचे जे सुत म्ह. पु त्र दोघे स. अश्विनीकुमार, स्वर्गींचेवैद्य. अ. पु. द्वि.

**अश्विनौ** प्रशस्ताः अश्वाः संतिपयोरश्वि न्यां जातावितिवा अश्विनौ, उत्कृष्ट आहे त अश्वजांचे अथवा अश्विनीचे ठायीं जे उत्पन्न ते. त. अर्थादिकांचा शब्दा प्रमाणें

**अश्वीयं** अश्वानांसमूहः अश्वीयं, घो ड्यांचा जो समुदाय तें. त. अश्वसमूह. अ. न.

**अषडक्षीणः** अविद्यमानानिषडक्षी णयत्रासषडक्षीणः, अविद्यमान आहेत सा हा अक्षि म्ह. कर्ण ज्याविषयीं तो. त. षट्‌क र्ण न झालेला विचार. अ. पु.

**अष्टमूर्तिः** अष्टमूर्तयोयस्यसः अष्टमू र्तिः, अष्टादिआठ आहेत मूर्ति ज्याच्या तो. स. महादेव. इ. पु.

**अष्टापदं** अष्टानिपदान्यस्य अष्टापदं, आठ आहेत पदें ज्याचीं तें. स. सोनें, सों गट्यांचा पट. अ. पु. न.

**अष्ठीवत्** अतिशयान्यस्थीनियस्मिन्न ष्ठीवत्, अतिशयित आहेत अस्थिज्याचे ठायीं तो. त. ढोंपर, गुडघा. त्. पु.

**असकृत्** नसकृत् असकृत्, नव्हेंजें सकृत् म्ह. एकवार तें. स. वारंवार. पुनः पुनः याअर्थी. अव्य.

**असती** नसती असती, नव्हे जी सती म्ह. पतिव्रता ती. स. व्यभिचारिणी स्त्री. ई. स्त्री.

**असतीसुत:** असत्याः सुतो असतीसुतः, असतीचा जो पुत्र तो· स· व्यभिचारिणीचा पुत्र· अ· पु·

**असन:** अस्यतीति असनः, गृहादिबंधनार्थ पुरुषैः हेत· ऌ· असुधा· क्षेपण अ· असणा वें झाड· अ· पु·

**असनपर्णी** असनपर्णानीवास्याः सा असनपर्णी, असन वृक्षाच्या पर्णां सारखीं प र्णें जीचीं ती· स· गोकर्णीची वेल· ई· स्त्री·

**असमीक्ष्यकारी** असमीक्ष्य विचार्य कर्तुं शीलमस्य सः असमीक्ष्यकारी, अविचारानें कार्य करण्याचा आहे स्वभाव ज्याचा तो· ऌ· कृञ्धा· करण अ· अविचारी· वि· र· पु· न· ई· स्त्री·

**अंस:** अस्यते समाहन्यते भारादिनेति अंसः, भारादिकानें शिणतो जो तो· ऌ· अंसधा· समाघात अ· भुज· शिर· स्कंध· अ· पु·

**अंसल:** प्रशस्तः अंसोस्यास्तीति अंसलः प्रशस्त आहे स्कंध ज्याचा तो· त· पुष्ट· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**असार** नसारो यस्य सः असारं, नाहीं आहे सार ज्याचे ठायीं तें· स· निर्मळ· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**असि:** अस्यत इत्यसिः, टाकिजेतो जो तो· ऌ· असुधा· क्षेपण अ· खड्ग, तलवार इ· पु·

**असिक्नी** नासिता असिक्नी, शुभ्रनव्हे जी ती· स्त्रीप्र· राजगृहीं राहणारी, वृद्ध नव्हे अशी राजपत्नीनीं निरोपवगैरे पाठविण्याकरितां ठेविलेली बायको· ई· स्त्री·

**असित:** सितादन्यः असितः, सित म्ह· शुभ्र त्याहून जो भिन्न तो· स· नीलवर्ण· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**असिधावक:** असिं धावतीति असिधावकः, असी जी तलवार जी ती मत शुद्ध करितो जो तो· ऌ· धावुधा· गति शुद्धी अ· शिकलगार, शिकल करणारा· अ· पु·

**असिधेनुका** असेर्धेनुकेव असिधेनुका, खड्गाला धेनु सारखी जी ती· स· सुरी· आ· स्त्री·

**असिपुत्री** असेः पुत्री असिपुत्री, खड्गाची जी कन्या ती· स· सुरी· ई· स्त्री·

**असिहेति:** असिः हेतिर्यस्य सः असिहेतिः, खड्ग आहे आयुध ज्याचें तो· स· खड्गायुधी· निमचेकरी असें म्ह· तो· इ· पु·

**असिहेतिक:** असिर्हेतिरस्यासिहेतिकः, असिहेति आहे प्रहारसाधन ज्यास तो· त· खड्गायुधधारी, निमचेकरी· अ· पु·

**असव:** अस्यंते एभिरित्यसवः, पुरुषादिक दीप्तिमंत होतात ज्यांहीं करून त· ऌ· क्षिपधा·

दीर्घादिकप्राण. उ. पु. ब.

**असुधारणं** असूनांधारणमसुधारणं, प्राणाचें जें धारण तें. स. प्राणधारण. अ. न.

**असुर:** अस्यतिक्षिपतिदेवानित्यसुरः, देवांचा तिरस्कार करणारा जो तो. कृ. क्षिप धा. प्रेरण अ. दैत्य. अ. पु.

**असूक्षणं** असून्क्षिणोतीत्यसूक्षणं, प्राणातें क्षीण करितें जें तें. कृ. क्षिधा. क्षय अ. अनादर. सरेफ पाठे सूर्क्ष्यते जेनेतिसूर्क्षणं नसूर्क्षणमसूर्क्षणं, अनादरकरिजेतो जेणें करून तें सूर्क्षण. नव्हे जें सूर्क्षण तें. कृ. सूर्क्षधा. अनादरअ. अ. न.

**असूया** असूयनमसूया, संतपक्र्जें ती. कृ. असूञ्धा. उपतापअ. गुणावर दोषांचा आरोप करणें. आ. स्त्री.

**असृक्धरा** असृजोधरा असृक्धरा, रक्ताची धारण करणारी. स. चर्म. आ. स्त्री.

**असृक्** अस्यतेइतिअसृक्, प्रक्षिप्त केलें जें तें. कृ. असुधा. क्षेपणअ. रक्त. ज. न.

**असेचनकं** नसिच्यतेमनोयेनेति असेचनकं, मनः स्मरण होत नाहीं ज्याचेठायीं तें. पाहतां पाहतां मनाची तृप्ति न होणारें वस्तु. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**असौम्यस्वर:** असौम्यः स्वरोस्यासौम्यस्वरः, असौम्य आहे स्वर ज्याचा तो. स. कर्कशस्वरशब्दापुरुष. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अस्त:** अस्यतिस्मेतिअस्तः, दीप्तिमान होता झाला जो तो. कृ. असधा. दीप्तिअ. अस्ताचल नामक पर्वत. २ प्रेरणा केलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अस्तं** असनंअस्तं, क्षेपण कृ. तिरस्कार. कृ. असुधा. क्षेपणअ. दर्शनाभावस्या अर्थी. उ. सायमस्तमितोरविः अव्य.

**अस्ति** असनंअस्ति, दीपनजें तें. कृ. असधा. दीप्तिअ. आहे त्या अर्थी. उ. अस्ति परलोकइतिमतिर्यस्यस आस्तिकः, अव्य.

**अस्तु** असनीत्यस्तु, आदान करितो जो तो. कृ. असधा. आदानादिअ. असूयापूर्वकस्वीकार. उ. तथाविधस्तावदशेषमस्तुनः अव्य.

**अस्त्रं** विग्रहादि असृक् शब्दाप्रमाणें. शस्त्र. अ. न.

**अस्त्री** अस्त्रमस्यास्तीति अस्त्री, अस्त्र शस्त्र आहे ज्यास तो. त. धनुर्धर. २ शस्त्र धारण करणारा. इ. पु.

**अस्थि** अस्यतइति अस्थि, तीर्थादिकांत प्रक्षेप केला जातो ज्याचा तें. कृ. असुधा. क्षेपणअ. हाड. इ. पु.

**अस्थिर:** नस्थिरः अस्थिरः, नव्हे जो स्थिर तो. स. चंचल. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अस्फुटवाक्** नस्फुटावागस्येत्यस्फुटवाक्, स्पष्ट नाहीं वाणी ज्याची तो. स. स्पष्ट न बोलणारा. न्. पु.

**अस्त्रं** अस्यतेनदस्त्रं, प्रक्षिप्त करिजे तें जें तें. कृ. असुधा. क्षेपण अ. रक्त. २ नेत्रोदक अ. न. ३ केश. ४ कोपरा. अ. पु.

**अस्रप:** अस्रंपिबतीत्यस्रप:, रुधिर पान करितो जो तो. कृ. पाधा. पान अ. राक्षस. अ. पु.

**अस्रु** विग्रहादि अस्रुशब्दाप्र नेत्रोदक. उ. न.

**अस्वच्छंद:** नस्वच्छंदोस्येत्यस्वच्छंद:. नाहीं आहे स्वच्छंद जो तो ज्यास तो. स. स्वाधीन. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अस्वंतं** असूनामंतोयेतिअस्वंतं, असूंचा आहे अंत ह्मणजे फुकटां फुकटां नाश जाचे गावीं तें. वृ. अ. न.

**अस्वप्न:** अविद्यमान: स्वप्नोयस्येत्यस्वप्न:, नाहीं आहे स्वप्न ह्म. निद्रा जीतीजास तो. स. देव. अ. पु.

**अस्वर:** अप्रशस्त: स्वरोयस्यस: अस्वर: वाईट आहे शब्द ज्याचा तो. स. कर्कशस्वराचा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अस्वाध्याय:** नस्वाध्यायोयस्यस अस्वाध्याय:, नाहीं आहे स्वाध्याय ह्म. वेदाध्ययन ज्यास तो. स. संस्कार नमल्यामुळें ज्यास वेदाध्ययनाचा अधिकार नाहीं तो. अ. पु.

**अहंयु:** अहमस्यास्तीत्यहंयु:, अहंकार आहे ज्यास तो. त. अहंकारी. वि. उ. पु. स्त्री. न.

**अहंकार:** अहमितिकरणमहंकार:, अहंकृतीकरण जेणें ह्म. कृ. कृधा. करण अ. गर्व. अ. पु.

**अहंकारवान्** अहंकारोस्यास्तीत्यहंकारवान्, अहंकार जो तो असे ज्यास ह्म. आहे ज्यास तो. त. अहंकारी. न्. पु. न. ई. स्त्री.

**अह:** सूर्येण नहीयतइत्यह:, सूर्यानें जें हीन होत नाहीं तें. कृ. हिधा. गत्यादि अ. दिवस. न्. न.

**अहमहमिका** अहमहंशब्दोस्यामाहमहमिका, अहमहं असा आहे शब्द जीचा ठायीं ती. त. मी समर्थ मी समर्थ असा अहंकार विशेष. आ. स्त्री.

**अहंपूर्विका** अहं पूर्वमेवाहंपूर्विका, मी पूर्वी मी पूर्वी ह्मणून जी योध्यांची धावनोत्सुकतानीत. मी पुढें मी पुढें होतों असा आग्रहानें युद्धोद्यमन तें. आ. स्त्री.

**अहंमति:** अहंप्रधानामतिरहंमति:, अहंकारप्रधान जी बुद्धी ती. स. अज्ञान. इ. स्त्री.

**अहर्पति:** अन्ह: पतिरहर्पति:, दिवसाचा जो पति ह्म. स्वामी तो. स. सूर्य. इ. पु.

**अहर्मुखं** अन्ह: मुखंअहर्मुखं, दिवसा

तें जें मुरस स्म प्रारंभ तो. स. प्रातःकाळ. अ. न.

**अहस्करः** अहः करोतीत्यहस्करः, दिवसाप्रत करितो जो तो. कृ. कृञ्धा. करणअ. सूर्य. अ. पु.

**अहह** अहंजहातीत्यहह, अहंकार घालविणारा. कृ. ओहाकृधा. त्यागअ. अद्भुत, आश्चर्य. २खेदत्याअर्थी. उ. अहहबुद्धिमकर्षोराज्ञः २अहहनीतोघूतेनमथाकालः अव्य.

**अंहतिः** हंतिदुरितमनयेति अंहतिः, नष्ट होतें आहे दुरित जीणें ती. कृ. हनधा. हिंसाअ. दान, देणें. इ. स्त्री.

**अंहः** अमतिगच्छतीति अंहः, प्रायश्चित्तादिकानें जातें जें तें. कृ. अमधा. गतिअ. पाप. स्. न.

**अंघः** अंघते अंघः, पुण्याचरणानें जातें जें तें. कृ. अंघिधा. गतिअ. पाप. स्. न.

**अहार्यः** ह्रियतेसोहार्यः, नहार्यः अहार्यः, हरण करिजे तो जो तो हार्य नव्हे जो हार्य तो. स. पर्वत. अ. पु.

**अहिः** आहंतीति अहिः, आसमंताद्भागीं हिंसा करितो जो तो. कृ. हनधा. हिंसाअ. सर्प. २ वृत्रासुर. इ. पु.

**अहितः** नहितमस्मादहितः, नाहीं आहे हित ज्यापासून तो. स. शत्रु. अ. पु.

**अहिदंष्ट्रिका** अहेर्दंष्ट्रिका अहिदंष्ट्रिका, सर्पाची जी दंष्ट्रिका ती. स. सर्पाची दाढ. आ. स्त्री.

**अहितुंडिकः** अहेस्तुंडमहितुंडं तेनजीवतीत्यहितुंडिकः, अहि म्ह. सर्प त्याचें जें तुंड तें अहितुंड अहितुंडानें जीवन पावतो जो तो. त. गारुडी. अ. पु.

**अहिभयं** अहिरिवगृहस्थत्वादहिः, तस्माद्भयं अहिभयं, सर्पा सारखा जो गृहांत वाहिलेला त्यापासून जें भय तें. स. आपल्याच प्रधानापासून जें राजास भय तें. अ. न.

**अहिभुक्** अहिंभु क्ते अहिभुक्, सर्पातें भक्षितो जो तो. कृ. भुजधा. अभ्यवहारअ. गरुडपक्षि. २ मोर. ज्. पु.

**अहेरुः** नहिनोतीत्यहेरुः, नाहीं हीन होत जी ती. कृ. हिधा. गतिवृद्धीअ. जिला शतावरी म्ह. ती. उ. स्त्री.

**अहो** अहानमहो विस्मापनं जें तें. कृ. ओहाकृधा. त्यागअ. विस्मय. उ. अहोरूपमहोसत्वं. अव्य.

**अहोरात्रः** अह्नासहितारात्रिः अहोरात्रः, दिवसासहित जी रात्र ती. स. तीसमुहूर्तात्मक काळ. अ. पु.

**अन्हाय** नह्वनं अन्हाय, नाहीं जें काळातिक्रमण तें. स. लवकर त्या अर्थी. उ. अन्हायप्रवर्तत मोनिसर्गः अव्य

**आ** आप्नोतीति आ, स्मृति आणि वाक्याच्या अर्थानें व्याप्त करितो जो तो. कृ. आप्लृधा. व्याप्तिअ. उ. आ एवं किल तत्. २ आ एवं नु मन्यसे. को. इ. या. समुच्चय. अव्य.

**आः** आक्लेशनि आः, विद्यमान जो तो. कृ. अस्थधा. सत्ताअ. कोप किंवा पीडन या अर्थी. उ. आः पापकिं विकत्थसे. २ आः शीतं वर्तति. अव्य.

**आ** अततीति आ. किंचिदर्थ अथवा अभिव्याप्ति व मर्यादा आणि क्रियायोगजनितार्थ या अर्थाप्रत निरंतर गमन करितो जो तो. कृ. अतधा. सातत्यगमनअ. उ. आकंपितपुष्पाणि २ आब्रह्मभुवनात्. ३ आबालं हरिभक्तिः ४ आक्रामतीत्यादि. अव्य. ई.

**आकंपितः** आकंप्यतेस्माकंपितः, ईषत्कंपित जो तो. कृ. कंपिधा. चलनअ. किंचित्कांपलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आकरः** आकीर्यंतेधातवोत्रेति आकरः, प्रसारपावताहेत धातु ज्याचेठायीं तो. कृ. कृधा. विक्षेपअ. रत्नाची खाण. अ. पु.

**आकर्षः** आकर्षणं आकृष्यते आकर्षत्यनेनेति वा आकर्षः. आकर्षण जेणेंकरिजे तें किंवा करिताहेत ज्याचेठायीं तो. कृ. कृषधा. विलेखनअ. निर्जीवपदार्थांचा खेळ. २ फांसा. ३ सोंगट्यांचा पट. अ. पु. को. कोदंडाभ्यास करण्याचें साधन.

**आकल्पः** आकल्प्यतेनेनेति आकल्पः, ज्याचानें भूषित होतो तो. कृ. कृपूधा. सामर्थ्यअ. अलंकारांनीं केलेली शोभा. अ. पु.

**आकारः** आकरणमाकृतिर्वा आकारः, आकृति किंवा अभिप्रायानुरूप चेष्टित जें तो. कृ. कृञ्धा. करणअ. आकृति. २ अभिप्रायानुरूप वागणें. अ. पु.

**आकारगुप्तिः** आकारस्य गुप्तिर्गोपनमाकारगुप्तिः, आकार म्ह. शोकादि विकार त्यांचीजी गुप्ति म्ह. गोपन ती. स. शोकादिकें करून मुखावर आलेल्या ग्लानीचें गोपन करून हर्षादिकांचा आविर्भाव दाखविणें. इ. पु.

**आकारणा** आकार्यतेऽनयेति आकारणा, बोलाविजेतो जीणेंनी. कृ. डुकृञ्धा. करणअ. बलावणें. आ. स्त्री.

**आकाशः** आसमंतात्काशंतेप्रकाशंते सूर्यादयोत्रेति आकाशः, आसमंताद्भागाचेठायीं प्रकाशित होताहेत सूर्यादिक ज्याचेठायीं तो. कृ. काशृधा. दीप्तिअ. अवकाश, पोकळी. अ. पु. न.

**आकीर्णं** आकीर्यतेस्माकीर्णं, मिश्र करिजेतें जें तें. कृ. कृधा. विक्षेपअ. अत्यंतमिश्रित. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आकुलः** आकोलयतीत्याकुलः, व्याकुल होतो जो तो. कृ. कुलधा. संस्त्यानादि अ. व्या

कुल. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आक्रीड:** आक्रीडंत्यस्मिन्नित्याक्रीड:, क्रीडा करिताहेत ज्यांचे ठायीं तो. कृ. क्रीडृधा. विहारअ. स्त्रियांबराबर क्रीडा करण्याचें राजे लोकांचें स्थान. अ. पु. न.

**आक्रोश:** आक्रुष्टमाक्रोश:, सक्रोध होऊन शिव्या देणें जें तो. कृ. क्रुशधा. रोदनादि अ. शापोक्ति. अ. पु.

**आक्रोशनं** आक्रुष्टमाक्रोशनं, आक्रुष्ट ह्म. गालिप्रदान करणें. धात्वर्थादि आक्रोश शब्दाप्रमाणें. अ. न.

**आक्रंद:** आक्रंदनमाक्रंद:, आह्वान किंवा आक्रंदन जें तो. कृ. क्रदिधा. आह्वानादि अ. पीडा झालेल्याचा शब्द. २ रडें. ३ रक्षण ४ दारुणयुद्ध. अ. पु.

**आक्षारणा** आक्षारयतीत्याक्षारणा, संचलन ह्म. लोकांतून उठून जाण्यासारखें करिते जी ती. कृ. क्षरधा. संचलन अ. परपुरुषाशीं परस्त्रीच्या समागम होऊन झालेला लोकापवाद. आ. स्त्री. अ. न.

**आक्षारित:** आक्षारणमाक्षार:, आक्षारो मैथुनं प्रत्याक्रोशो जातोस्य आक्षारित:, मैथुनाप्रत झालाहे आक्रोश जास तो. त. ज्यावर लोकापवाद आला तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आक्षीव:** आक्षीवतीति आक्षीव:, रोगादि निरसन करितो जो तो. कृ. क्षीवृधा निरसन अ. शेवग्याचें झाड. अ. पु.

**आक्षेप:** आक्षिपति आक्षिप्यते वा आक्षेप:, आक्षेप करितो किंवा प्रश्न करितो जो तो. कृ. क्षिपधा. प्रेरण अ. निंदा. २ आश्चर्यकारक प्रश्न. अ. पु.

**आक्षोट: आक्षोड: ओखोट:** आसंमंतात् अक्ष्णोतीति आक्षोट:, आसमंताद्भागीं स्वविस्तारानें व्याप्त करितो जो तो. कृ. अक्षूधा. व्याप्त्यादि अ. डोंगरी आक्रोडाचा वृक्ष. अ. पु.

**आखंडल:** आसमंतात्खंडयतीत्याखंडल:, आसमंताद्भागीं दुष्टांतें खंडेन करितो जो तो. कृ. खडिधा. भेदन अ. इंद्र. अ. पु.

**आखु:** आसमंतात्खनतीति आखु:, आसमंताद्भागीं खणतो जो तो. कृ. खनुधा. अवदारण अ. उंदीर. उ. पु.

**आखुभुक्** आखून्भुंक्ते इति आखुभुक्, उंदराला भक्षितो तो जो तो. कृ. भुजधा. अभ्यवहार अ. मांजर. ज. पु.

**आखेट:** आखिद्यंते अत्र आखेट:, त्रास पावताहेत मृगादिक ज्याचे ठायीं तो. कृ. खिटधा. त्रास अ. पारध. अ. पु.

**आख्या** आख्यानमाख्या, आख्यान ह्म.

गाम जें ती. कृ. ख्याधा. प्रकथन अ. ना म. आ. स्त्री.

**आख्यातं** आख्यायते स्म इति आख्यातं, कथन करिजेलें तें. कृ. ख्याधा. प्रकथन अ. उक्त, बोललेलें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आख्यायिका** आचष्टे इति आख्यायिका, कथन करिती जी ती. कृ. चक्षिङ्धा. - थक वाणीअ. अनुभूतार्थ प्रतिपादक वास वदत्तादिकग्रंथ. आ. स्त्री.

**आगः** एतीति आगः, अनायासानें प्राप्त होतें जें तें. कृ. इणधा. गति अ. अपराध. २ पाप. स. नं.

**आगंतुः** आगच्छतीति आगंतुः, अकस्मात् भोजनाव्यवहित प्राक्कालीं येतो जो तो. कृ. गम्लृधा. गति अ. अतिथि. वि. उ. पु. स्त्री. न.

**आगारं** आ अग्यते इति आगारं, आसमंताद्भागीं मंडित जें तें. कृ. अगिधा. कुटिलगतिअ. गृह. अ. न.

**आगूः** आगमनमागूः, स्वीकरण जें ती. कृ. गम्लृधा. गति अ. स्वीकार. ऊ. स्त्री.

**आग्नीध्रः** अग्निमिंधे अग्नीध्, तस्य स्थानमाग्नीध्रः तात्स्थ्यादाग्नीध्रः, अग्नि प्रदीप्त करण्याचे स्थानीं राहतो जो तो. त. ऋत्विज. अ. पु.

**आग्रहायणिकः** आग्रहायणी यस्मिन्स आग्रहायणिकः, आग्रहायणी आहे ज्याचे ठायीं तो. त. मार्गशीर्ष. अ. पु.

**आग्रहायणी** अग्रे हायनमस्य, स्या आग्रहायणी, पूर्वी जन्मलें वरून आहे हायन स्य. व्रीही जीस ती. त. मार्गशीर्षी पौर्णिमा. २ मृगशीर्षनक्षत्र. ई. स्त्री.

**आम्** आमयतीति आम्, स्वीकार करितो जो तो. कृ. अमधा. गति अ. आं कुर्म: अव्य.

**आंगिकं** अंगेन भ्रूविक्षेपादिना निर्वृत्तं आंगिकं, भ्रूविक्षेपादिकानें जें संपादित तें. शरीरावयवानें झालेलें कर्म. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आंगिरसः** अंगिरसोपत्यमांगिरसः, अंगिरा संज्ञक ऋषीचें अपत्य जें तें. त. बृहस्पति. अ. पु.

**आचमनं** आचम्यते नेनेति आचमनं, उदकादिक भक्षण करिजे तें जेणं करून तें. कृ. चमुधा. अदन अ. हातावर पाणी घेऊन कर्मकालीं प्राशन करितात तें. अ. न.

**आचामः** आचम्यते आचामः, प्राशन पुरःसर भक्षिजेतो जो तो. कृ. चमुधा. अदन अ. भाताची पेज. अ. पु.

**आचार्यः आचार्या** आचर्यते इत्याचार्यः, वेदाचें व्याख्यान करिजेतो वशिष्यांनीं उपासिजेतो जो तो. कृ. चरधा. गति अ. वेदांचें व्याख्यान कर्ता. अ. पु. २ आ. स्त्री.

**आचार्यानी** आचार्यस्यस्त्री आचार्यानी, गुरूची जी पत्नी ती. स्त्रीम. आचार्याची बाय को. ई. स्त्री.

**आचितः** आचीयतेस्मइत्याचितः, रचिजेला जो तो. कृ. चिञ्धा. चयनअ. दाहा भार. २ गाड्यानें वाहण्या जोगा जो भार तो अ. पु.

**आच्छादनं** आच्छाद्यतेनेन आच्छादनं आच्छादन करिजेतें जेणें तें. कृ. छदधा. अपवारणअ. वस्त्र अथवा वस्त्रादिकानें जें वेष्टिन तें. अ. न.

**आच्छुरितकं** आच्छुरणमाच्छुरितं आच्छुरितमेव आच्छुरितकं, आच्छुरण स्त्र. दुसऱ्याचे मनोगताचें छेदन तें आच्छुरित तेंच आच्छुरितक. स. साभिप्रायका रहास्य. अ. न.

**आच्छोदनं** आच्छिद्यंतेमृगाअत्रआच्छोदनं, हिंसित होताहेत मृग ज्याचे ठायीं तें. कृ. छिदिर्धा. द्वैधीकरणअ. पारधकिंवा शिकार. अ. न.

**आजकं** अंजानांसमूहोआजकं, अजास. शेळ्या यांचा जो समुदाय तो. बकऱ्यांचा समुदाय. अ. न.

**आजानेयः** आजेनक्षेपेणआनेयः प्रापणीयः आजानेयः, प्रेरणानें जो आनेय स्त- आणण्यास योग्य तो. स. कुलीनाश्व. अ. पु.

**आजिः** अजंत्यस्यामाजिः, शूर अथवा अश्वादिकांस फेरणारे गमन करितात जीचेठायीं ती. कृ. अजधा. गतिअ. युद्ध. समानभूमी. इ. स्त्री.

**आजीवः** आजीव्यतेनेनेतिआजीवः, जीवनपावतो जेणें करून तो. कृ. जीवधा. प्राणधारणअ. जीवन अजणें. अ. पु.

**आजूः** आजीवतीतिआजूः आसर्वतः पाप रूपी होसे जीनी. कृ. जुधा. अंहसअ. अथवा तबलात्कारानें टाकणें. उ. स्त्री.

**आज्ञा** आज्ञायतइत्याज्ञा, श्रेष्ठानीं करिजेने जी ती. कृ. ज्ञाधा. अवबोधनअ. हुकूम. आ. स्त्री.

**आज्यं** आअज्यते अनेन आज्यं, अतिशयं करून अंगादि मर्दन करिजेतें जेणें तें. अंजूधा. व्यक्त्यादिअ. घृत, तूप. अ. न.

**आटिः आडिः** आसमंतादटतीतिआडतीतिवा आटिः, आसमंताद्वागीं गमन अथवा तत्पूर्वक उद्योग करितो जो तो. कृ. अटधा. गमनअ. २ अडधा. उद्यम अ. आडी संज्ञक पक्षी. इ. पु.

**आडंबरः** आडंब्यतेइत्याडंबरः, युद्धादिपर्यीं प्रेरणा करितो जो तो. कृ. डबिधा. क्षेपअ. युद्धांतील ध्वनि. २ समारंभ. ३ हत्तीचीगर्जना. ४ वाद्यांचाध्वनि. अ. पु.

**आढक:** आढ्यतेइत्याढक:, परिमाणा र्थ गमन करितो जो तो. कृ. ढौकृधा. गति अ. पायली. अ. पु.

**आढकिकं** आढकस्यवापः आढकिकं, आढक परिमित धान्य पेरण्याचें जें क्षेत्र तें त. पायलीभर धान्य ग्रहण्याचें किंवा पिकविण्या चें क्षेत्रादि. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आढकिका** आढकंपचतीति आढकिका आढक परिमित धान्यातें शिजविणारी ती. त. तपेली. २ तूर यानावाचें धान्य. आ. स्त्री.

**आढकी** आढकमस्याः परिच्छेदकत्वेनेति आढकी, आढक परिमाण आहे परिच्छेदक लें करून जीस ती. त. तुवरिका सं. तूर नां वाचें धान्य. ई. स्त्री.

**आढ्य:** आध्यायतीआढ्यः, द्रव्यरक्षार्थ चिंता करितो जो तो. कृ. ध्यैधा. चिंता अ. ध नाढ्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आणक:** विग्रहादिसर्व अणकाशब्दाप्र.

**आणवीनं** विग्रहादिसर्व अणव्यश. प्र.

**आणि:** विग्रहादिसर्व अणिशब्दाप्रमाणें.

**आतंक:** आतंक्यते अनेनेति आतंक:, संकटानें जीवन करिजेतें जेणेंकरून तो. कृ. तकिधा. कृच्छ्रजीवन अ. रोग. २ भय. ३ संताप. अ. पु.

**आतंचनं** आतंकः आतंचनं, एकामागून एकानें जें वचन तें. कृ. तंचूधा. गति अ. मतीवाप. २ वेग. ३ तृप्त करणें. अ. न.

**आततायी** आततंयथातथा अयितुं शीलमस्य आततायी, शीघ्र जैसें होय तैसें नाशार्थ गमन करावया कारणें आहे स्वभाव जाचा तो. दुसऱ्याचा प्राण हरणा र्थ जो तयार तो. वि. इ. पु. स्त्री. न.

**आतप:** आतपतीत्यातपः, संतप्त होतो जो तो. कृ. तपधा. संताप अ. सूर्याचा प्र काश. अ. पु.

**आतपत्रं** आतपात्त्रायतेतदातपत्रं, उ ष्णापासून रक्षण करितें जें तें. कृ. त्रैङ्धा. पालन अ. छत्र. अ. न.

**आतर:** आतरंत्यनेनेति आतरः, तरता हेत जेणेंकरून तो. कृ. तृधा. तरण अ. न द्यादिकांच्या उतारा बद्दल द्यावें द्रव्य. अ. पु.

**आतापी** आतपतीति आतापी, आकाशा मध्यें तकपतो जो तो. कृ. तपधा. दाह अ. प क्षि जास घार असें म्ह. तो. इन. पु.

**आतायी** आतायतेतच्छीलः आतायी, अंड्यादिकांचें पालन अथवा स्वशरीराचा पक्षद्वारा विस्तार हा आहे स्वभाव ज्याचा तो. कृ. तायृधा. पालनादि अ. अर्थादि सर्व पू र्वशब्दाप्रमाणें.

**आतिथेयं** अतिथौसाधु आतिथेयं.

अतिथांविषयींजें उत्कृष्टतें· न· अतिथि विषयीं दयाळु· वि· अ· पु· न· ई· स्त्री·

**आतिथ्यं** अतिथय इदमातिथ्यं, अति थि कारणें जें पूजादिक तें· न· अतिथीक रितां संपादन केलेलें वस्तुमात्र किंवा तद र्थ कर्म· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**आतुर:** आतीतोर्निइति आतुर:, अत्यं त मरणाविषयीं गमन करितो जो तो· सना· तुरधा· त्वरणअ· रोगी· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**आतोद्यं** आसमंतात्तुद्यतेताड्यतेतदा तोद्यं, आसमंताद्भागीं ताडिजेतें जें तें· कृ· तुदधा· व्यथनअ· वाद्य· अ· न·

**आत्तगर्व:** आत्तोगर्वोयस्यस आत्तगर्व:, आत्त आहे गर्व ज्याचा तो· स· ज्याचा गर्व गे ला तो· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**आत्रेयी** अत्रेरपत्यमात्रेयी, अत्रीचें जें अपत्य ह्म· कन्या ती ह्म· अगम्यत्वें करून तीप्रमाणें जी ती· रजस्वलास्त्री· ई· स्त्री·

**आत्मगुप्ता** आत्मनागुप्ता आत्मगुप्ता, आपणजी गुप्तती· स· कुहरी नामक औष धिविशेष· आ· स्त्री·

**आत्मघोष:** आत्मानंघोषयतीति आ त्मघोष:, आपल्यामत घोष करणारा ह्म· मी या जागीं आहें असें का का या शब्दानें सत्वविणारा जो तो· कृ· घुषिरधा· विशब्दन अ· काक· अ· पु·

**आत्मज:** आत्मनोदेहाज्जात: आत्मज:, देहापासून झाला जो तो· स· पुत्र· अ· पु·

**आत्तगंध:** आत्तोगंधोगर्वोयस्यस आ त्तगंध:, प्राप्त आहे गर्व ज्यास तो· स· अ र्थादि सर्व आत्तगर्व शब्दाप्रमाणें·

**आत्मजा** आत्मन: जाता आत्मजा, आ पल्यापासून जी झाली ती· कृ· जनीधा· प्रा दुर्भाव अ· कन्या· आ· स्त्री·

**आत्मा** अतिस्वकृतंशुभाशुभमत्तीति वा आत्मा, आपण केलेल्या पुण्य पापाचा उपभोग घेतो किंवा त्रिकाला बाध्यत्वें करू न गमन करितो जो तो· कृ· अदधा· भक्षण अ· १ अतधा· भूषणादि अ· देह, शरीर· २ यत्न, कृति· ३ धैर्य· ४ बुद्धि· ५ शरीराधिदैवत ६ स्वभाव· ७ परमात्मा· ८ मन· ९ परब्रावर्तन· न· पु·

**आत्मभू:** आत्मनोविष्णो: सकाशाद्भवती त्यात्मभू:, विष्णूपासून जो उत्पन्न तो· कृ· भू धा· सत्ता अ· ब्रह्मदेव· २ मदन· ऊ· पु·

**आत्मंभरि:** आत्मानंबिभर्तीति आत्मंभ रि:, आत्म्यातें पोषण करितो जो तो· कृ· भृञ्धा· पोषण अ· आपलें पोट भरणारा वि· इ· पु· स्त्री· न·

**आथर्वणं** अथर्वणांसमूह: आथर्व णं, अथर्व्यांचा जो समुदाय तें· त· अथर्वा

चं समुच्चय· अ·न·

**आदर्शः** आदृश्यतेअत्रेतिआदर्शः, दिसतें हें रूपादिक जाचेठायीं तो· कृ· दृ शिर्धा· प्रेक्षणअ· आरसा· अ·पु·

**आदिः** आप्रथमंदीयतेगृह्यतेइतिआदिः प्रथमग्रहण करिजेतो जो तो· कृ· डुदाञ् धा· दानअ· आद्य, पहिला· इ·पु·

**आदिकारणं** आदिश्चतत्कारणंचआदिकारणं, आदिम्ह· मुख्य जें कारण तें· स· मूलकारण· अ·न·

**आदितेयः** द्यतिखंडयतीतिदितिः, नद्भिन्नाआदितिः तस्याअपत्यमादितेयः, खंडन करित्येजी तीदिति तद्भिनाजी ती अदिति तिचें जें अपत्य तो· त· देव· अ·पु·

**आदित्यः** अदितेरपत्यमादित्यः, अदितीचा जो पुत्र तो· त· देव· २ देवांचा गणविशेष· ३ सूर्य· अ·पु·

**आदिष्टी** आदिष्टमनेनआदिष्टी, उपदेश केला जानें तो· कृ· दिशधा· अतिसर्जनअ· यजमान· इ·पु·

**आदिनवः** आदानमादीनं आदीनस्यवानमादीनवः, क्षयप्रापण जें तें· कृ· वाधा· गतिअ· क्लेश· अ·पु·

**आदेष्टा** आदिशत्यृत्विजोयागेस्वेष्टसंपादनायप्रेरयतीति आदेष्टा, ऋत्विजांप्रत इष्टसाधनार्थ प्रेरणा करितो जो तो· कृ· दिश धा· कृ· दिशधा· अतिसर्जनअ· यजमान· ऋ·पु·

**आदृतः** आद्रियतेस्मआदृतः, आदृतम्ह· सत्कृत करिजेला जो तो· कृ· दृङ्·धा· आदरअ· पूजित· वि·अ·पु·न·आ·स्त्री·

**आद्यः** आदौभवः आद्यः, प्रथम झाला जो तो· त· प्रथमचा· वि·अ·पु·न·आ·स्त्री·

**आद्यमाषकः** मष्यतइतिमाषः, आद्यश्चासौमाषश्च आद्यमाषः सएव आद्यमाषकः, भारसाही जो तो माष आद्य असा· जो माष तो आद्यमाष तोच आद्यमाषक· त· शास्त्रीय ८० गुंजाचा तोळा· अ·पु·

**आद्यूनः** आदेवादीतिआद्यूनः उदरपोषणार्थ क्रीडा करिता झाला जो तो· कृ· दिवुधा· क्रीडादिकअ· बुभुक्षित· वि·अ·पु·न·आ·स्त्री·

**आधारः** आधीयतेजलाद्यत्रेतिआधारः· ज्याहातें आहे जलादिजाचेठायीं तो· कृ· धीङ्धा· आधारअ· शेताचा बांध· २ नदीचें धरण· ३ अधिकरण· अ·पु·

**आधिः** आधीयतेदुःखमनेनआधानमधीयतेऽस्मिन्वाआधिः, प्राप्त होतें हें दुःख जानें अथवा स्थापन किंवा धारण करिजे तें जाचेठायीं तो· कृ· डुधाञ्धा· धारणअ· मनोव्याधि· २ गाहाणवस्तु· ३ आपत्ति· ४ अधि

षान. इ. पु.

**आंधसिकः** अधोभक्तंशिल्पमस्यआंधसिकः, भक्त ह्य. भात आहे शिल्प ज्यानें तो. त. आचारी, स्वयंपाक करणारा. अ. पु.

**आधूतः** आधूयतेस्मआधूतः, कंपन केलें जेंतो जो तो. कृ. चलधा. कंपनअ. कांहीं कांपलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आधोरणः** आधोरयतीत्याधोरणः, उत्तमप्रकारानें हत्ति चालवितो जो तो. कृ. धोरॄधा. गतिचातुर्यंअ. हस्तिपक. ह्य. महांत. अ. पु.

**आध्यानं** आध्यातिराध्यानं, निरंतर स्मरण जें तें. कृ. स्मृधा. आध्यान अ. चिंतन अ. न.

**आनकः** आनितीत्यनेनेतिआनकः, आनीतीत्यानक इतिवा, वाजंत्री वगैरे जीवन करिताहेत जेणें तो. कृ. अणधा. प्राणनअ. पटह नावाचें वाद्य. अ. पु. न. २ भेरी. ३ मृदंग. ४ मेघ. अ. पु.

**आनकदुंदुभिः** आनकैर्दुंदुभिश्चउपलक्षितः आनकदुंदुभिः, जन्मकालीं आनकांनीं व दुंदुभीनीं जो उपलक्षित तो. स. वसुदेव. इ. पु.

**आनतं** आनमतिस्मआनतं, नम्रक्ष. अधोमुख होतें झालें जें तें. कृ. णमधा. प्रह्वत्व. अधोवदन. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आनद्धं** आनह्यतेसुखेंचर्मणाबध्यतेस्मइत्यानद्धं, सुखानें गायीं चर्मानें बांधिजेला जो तो. कृ. णहधा. बंधनअ. मृदंग पटह इत्यादि. अ. न.

**आननं** आनंत्यनेनेतिआननं, भक्षण द्वारा जीवन होतें जेणें करून तें. कृ. अणधा. प्राणनअ. मुख. अ. न.

**आनंदः** आनंदयतीत्यानंदः, आनंदवितो जो तो. कृ. टुनदिधा. समृद्धिअ. हर्ष. अ. पु.

**आनंदथुः** आनंदयतीत्यानंदथुः, आनंदित करितो जो तो. कृ. टुनदिधा. समृद्धि अ. हर्ष. उ. पु.

**आनंदनं** आनंदः आनंदनं, कुशलप्रश्नादिकें करून जो आनंद तो. कृ. टुनदिधा. समृद्धिअ. स्वागत विचारून केलेला आनंद. अ. न.

**आनर्तः** आनृत्यंत्यत्रआनर्तः, नृत्य करिताहेत ज्यांचे गायीं तो. कृ. नृतीधा. गात्रविक्षेपअ. नाचण्याची जागा. २ युद्ध. ३ देशविशेष. अ.

**आनायः** आनयंतिमत्स्याननेनेतिआनायः, धरिताहेत मत्स्य जेणें करून तो. कृ. णीञ्धा. प्रापणअ. जाळें. अ. पु.

**आनाय्यः** आनीयतइतिआनाय्यः, दक्षिणाग्निकर्तें करून जो संस्कृत तो. कृ. णीञ्धा. प्रापणअ. गार्हपत्यांतून अग्नि आणून

दक्षिणभूमि केलेला. अ. पु.

**आनाहः** आनह्यतेऽनेनेति आनाहः, ज्या वायोगानें बंधन ह्म. संधिवगैरे धरतात तो. कृ. णहधा. बंधन अ. मळमूत्राच्या रोधनानें झालेला रोगविशेष. अ. पु.

**आनुपूर्वं आनुपूर्वी आनुपूर्व्यं** पूर्वपूर्वमित्यनुपूर्वं अनुपूर्वस्य भावः आनुपूर्वं, पूर्वपूर्व जें तें अनुपूर्व त्याचा जो भाव तें आनुपूर्व. त. अनुक्रम. अ. न. १ ई. स्त्री. ३ अ. न.

**आन्वीक्षिकी** अनुश्रवणांतरमीक्षणं परीक्षणं अन्वीक्षा साप्रयोजनमस्या इत्यान्वीक्षिकी, श्रवणोत्तर जें सदसद्विवेचन ती अन्वीक्षा ती आहे प्रयोजन जीस ती. त. गौतमप्रणीत न्यायशास्त्र. ई. स्त्री.

**आपक्कं** ईषत्पक्कमापक्कं, किंचित्पक्क जें तें. स. पोळी, रोटी. अ. न.

**आपगा** अपां समूहो आपं तेन गच्छतीति आपगा, उदकांचा जो समूह तें आप तेणें करून गमन करित्ये जी ती. कृ. गम्लृधा. गति अ. नदी. आ. स्त्री.

**आपणः** आसमंतात्पण्यते अत्रेति आपणः, आसमंताद्धागीं व्यवहार करितात ज्या ठायीं तो. कृ. पणधा. व्यवहारादि अ. बाजार. अ. पु.

**आपणिकः** आपणो व्यवहारोस्यास्तीति आपणिकः, व्यवहार आहे ज्यास तो. त. क्रयविक्रयें करून उपजीवन करणारा प्राणी. अ. पु.

**आपत्. आपत्तिः** आपादनमापत्, आपादन ह्म. व्यापन जें ती. कृ. गम्लृधा. गति अ. विपत्ति. त्. स्त्री. २ इ. स्त्री.

**आपत्प्राप्तः** आपदं प्राप्तः आपत्प्राप्तः, आपत्तीप्रत प्राप्त झाला जो तो. स. विपत्ति पावलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आपदा** आपदनमनया आपदनं वा आपदा, आपत् ह्म. विपत्ति प्राप्त होत्ये जीणें किंवा विपत्ति जी ती. कृ. पद्धा. गति अ. विपत्ति. आ. स्त्री.

**आपन्नः** आपद्यते स्म आपन्नः, विपत्ति पाविजेला जो तो. कृ. पद्धा. गत्यादिक विपत्ति पावलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आपन्नसत्वा** आपन्नः सत्वो जंतुर्यस्यामिति आपन्नसत्वा, प्राप्त आहे प्राणि जीवा गर्भी ती. स. गरोदर बायको. आ. स्त्री.

**आपमित्यकं** अपमित्यानिर्वृत्तं आपमित्यकं, अदलाबदली करून जें संपादिलें तें. त. मोबदला देऊन आणलेलें. अ. न.

**आपः** आप्नुवंतीति आपः, व्याप्त होतात ज्या त्या. कृ. आप्लृधा. व्याप्ति अ. उदक. स. स्त्री. नि. ब.

**आपानं** आसंभूयपिबंत्यत्रेति आपानं, ए

कत्र अमून पान करितात ज्याचे ठायीं तें. क्र. पा धा. पानअ. मद्यप्राशनार्थ मंडळी जमल्येतें स्थान. अ. न.

**आपीडः** आपीडयतीत्यापीडः, शिरें प्रत शोभा देतो जो तो. क्र. पीडधा. अवगाहनअ. शेंडीत किंवा शिरीं त माळलेलें पुष्प वगैरे. अ. पु.

**आपीनं** आप्यायतइति आपीनं, हृद्धि पावतें जें तें. क्र. ओप्यायीधा. वृद्धिअ. गाईचें स्तन स्थ. ओंठी. अ. न.

**आपूपिकः** अपूपाः पण्यमस्य अपूपानां समूह इतिवा आपूपिकः, अपूप आहेत विक्रेय ज्याचे तो. किंवा अपूपांचा समुदाय. त. वडे घारगे इत्यादि तळलेले भक्ष्य पदार्थ करून विकणारा व वडे घारगे वगैरेंचा ढीग. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आप्तः** आप्यतेस्म आप्तः, विश्वासानें व्याप्त करिजे तो जो तो. क्र. आप्लृधा. व्याप्तिअ. विश्वासु. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आप्यं** अपांविकारः आप्यं, उदकांचा जो विकार तें. त. जलाचा विकार. भोंवरे वगैरे. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ कोष्ठनामक वनस्पति. अ. न.

**आप्यायनं** आप्यायतिराप्यायनं, संतर्पण जें तें. क्र. प्यायीधा. वृ. यर्थक. संतुष्ट करणें. अ. न.

**आप्रच्छनं** आपृच्छा आप्रछनं, आपृच्छा जीनें. क्र. प्रच्छधा. ज्ञीप्साअ. स्वागत प्रश्न केल्यावरून झालेला आनंद. अ. न.

**आप्रपदीनं** आप्रपदं प्राप्नोति आप्रपदीनं, पादाग्र पर्यंत पावणार जें तें. त. पायांचा शेवटापर्यंत पावणारें वस्त्रादिक. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आप्लवः** आप्लवनमाप्लवः, आप्लवन स्नान जें तो. क्र. प्लुङ्धा. गतिअ. अंगोळ करणें. अ. पु.

**आप्लवव्रती** आप्लवत इति आप्लवः, आप्लवश्चासौ व्रतीच आप्लवव्रती, स्नान असा जो व्रती तो. सोडमुंज झालेला वेदव्रतीनाराइ. पु.

**आप्लावः** विग्रहादि सर्व आप्लव शब्दाप्रमाणें.

**आप्लुतव्रती** विग्रहादि सर्व आप्लुतव्रती शब्द.

**आबंधः** आबध्यतेऽनेन आबंधः, बंधन करिजेतें जेणें करून तें. क्र. बधधा. बंधनअ. जूं वगैरे बांधण्याची दोरी स्थ. जुपणी. अ. पु.

**आबाधा** आबाधत इत्याबाधा, पीडा करितेजीती. क्र. बाधृधा. विलोडनअ. वेदना. आ. स्त्री.

**आभरणं** आभ्रियतेऽनेनाभरणं, अलंकृत केला जातो जेणें तें. क्र. डुभृञ्धा. धारणादिअ. अलंकार. अ. न.

**आभाषणं** आभाषतेतदाभाषणं, बोलिजेतें जें तें. क्र. भाषधा. व्यक्तवाणिअ. परस्पर

भार्यं. अ. न.

**आभास्वरः** आसमंताद्भास्वरशील आभास्वरः, आसमंताद्भागीं जो प्रकाशनशील तो. रु. भास. धा. दीप्ति अ. देवांचा गणविशेष अ. पु.

**आभीरः** आसमंताद्भियं राति ददातीति आभीरः, आसमंतात् भागीं भीतीनें देतो जो तो. रु. रा. धा. दान अ. गवळी. अ. पु.

**आभीरपल्ली** आभीराणां पल्ली आभीरपल्ली, गवळ्यांचीजी पल्ली ती. स. गवळ्यांचें घर किंवा गांव ई. स्त्री.

**आभीरी** आभीरस्य स्त्री आभीरी, आभीराची जी स्त्री ती. स्त्रीप्र. गवळण ई. स्त्री.

**आभीलं** आसमंताद्भियं लातीति आभीलं. आसमंताद्भागीं भय देतें जें तें. रु. ला. धा. आदान अ. शरीरपीडा. अ. न.

**आभोगः** आभोजनमाभोगः, परिपूर्ण जें तें. रु. भुज. धा. पालनादि अ. सर्वांपचारांनीं परिपूर्णता. अ. पु.

**आमगंधि** आमो अपक्कोमलस्तस्येव गंधो स्येति आमगंधि, अपक्क मला सारिखा आहे गंध ज्याचा तो. अपक्क मांसादिकाच्या गंधासारखा गंध ज्याचा तें. वि. इ. पु. न. ई. स्त्री.

**आमंडः** आमंडयतीति आमंडः, आसमंताद्भागीं छायादिकें करून भूषित किंवा दीपित होतो जो तो. रु. मंड. धा. भूषादिक अ. एरंडाचा वृक्ष. अ. पु.

**आमनस्यं** मानसे साधु मानस्य मानस्याद्भिन्नमामनस्यं, मानसाविषयीं जें साधु तें मानस्य मानस्याहून जें भिन्न तें. स. दुःख अथवा वैमनस्य अ. न.

**आमयः** आमयनममनेन आमयः, हिंसन रू. प्राणवियोग होतो हे जेणें करून तो. रु. मीङ्. धा. हिंसा अ. रोग. अ. पु.

**आमयावी** आमयोस्यास्तीति आमयावी, रोग आहे ज्यास तो. त. रोगी. वि. इ. पु. न. ई. स्त्री.

**आमलकः. आमलकी. आमलकं.** आमलते सः स तद्वा आमलकः, रूचि किंवा फलपुष्पादिक धारण करितो किंवा करिते जी ती. रु. मिषु. धा. सेचन अ. आंवळा. २ आंवळ्याचें झाड. अ. पु. न. ई. स्त्री.

**आमिक्षा** आमिष्यत इति आमिक्षा, इच्छिजते जी ती. रु. मिषु. धा. सेचन अ. तापले दुधाला दधिसंयोगानें झालेली विकृति. आ. स्त्री.

**आमिषं** आमिषतीति आमिषं, स्पर्धा करितो जो तो. रु. मिष. धा. स्पर्धा अ. आमिष्यत इत्यामिषं वा इच्छिजे तें जें तें. रु. मिष. धा. संश्लेषण अ. मांस. २ भोग्यवस्तु. ३

संभोग· ४ लांस· अ· न·

**आमिषाशी** आमिषमश्नातीत्यामिषाशी·, आमिषातें भक्षण करितो जो तो· कृ· अशधा· भोजन अ· मांस भक्षण करणा रा· वि· इ·पु· न· ई· स्त्री·

**आमुक्तः** आमुच्यतेस्म आमुक्तः, अंगाचेठायीं मुक्त करिजे तो स्त· घालिजे तो जो तो· किंवा त्यापासून काढिजे तो जो तो· कृ मुच्लृधा· मोक्षण अ· आंगरखा· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**आमोदः** आमोदयतीत्यामोदः, हर्षित करितो जो तो· कृ· मुद्धा· हर्ष अ· हर्ष, आनंद· २ उत्कृष्ट मनोहारक जो कस्तूर्यादिकांचा सुगंध तो· अ· पु·

**आमोदी** आमोदयतीत्यामोदी· हर्षित करितो जो तो· कृ· मुद्धा· हर्ष अ· मुखवाला सुगंधित करणारा तांबूलादिक द्रव्यविशेष· इ· पु·

**आम्नायः** आम्नायते अभ्यस्यते आम्नानमितिवा आम्नायः, अभ्यस्त करिजे तो किंवा गुरुपरंपरागत प्राप्त जो सदुपदेश तो· कृ· म्नाधा· अभ्यास अ· वेद· अ· पु·

**आम्रः** अम्यतीति आम्रः, रुच्युत्पादन करितो जो तो· कृ· अमधा· गमनादिक अ· आंब्याचें फळ· वृक्षाद्य अ· पु·

**आम्रातकः** आम्रमततीत्याम्रातकः आम्रं रस· आम्ल त्यातें निरंतर गमन करितो जो तो· कृ· अतधा· सातत्यगमन अ· आंबाड्याचें झाड· अ· पु·

**आम्रेडितं** आम्रेड्यते आधिक्येनोच्यत इति आम्रेडितं, अधिक बोलिजेतें जें तें· दोनतीन वेळा उच्चारलेला शब्दादिक· अ· न·

**आम्लिका· आम्लीका** अम्लः आम्लो वा रसो स्त्यस्या इति आम्लिका, आम्लीका हे रस जीचा ती· त· चिंचेचें झाड· आ· स्त्री·

**आयतं** आयच्छते आयतं, लंबायमान होतें जें तें· कृ· यतीधा· प्रयत्न अ· दीर्घ, लांब· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**आयतनं** आयतंतेऽत्रेति आयतनं, पुण्यसंपादनार्थ प्रयत्न करिताहेत ज्याचेठायीं तें· कृ· यतीधा· प्रयत्न अ· यज्ञाची जागा· २ सामान्य स्थलविशेष· अ· न·

**आयतिः** आयम्यते अनया वा आयतिः, नैमानादिक कालादिकांचा उपसंहार होतो जीचेठायीं अथवा जीणें ती· कृ· यमधा· उपरम अ· उत्तरकाल· २ लांबी· ३ योगसाधन· ४ प्रभाव· ईका· स्त्री·

**आयत्तः** आयतते इति आयत्तः, यत्न करितो जो तो· कृ· यतिधा· प्रयत्न अ· स्वाधीन· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**आयामः** आयम्यते येनायामः, दुसरा

होतो जेणेंकरून तो. कृ. यमधा. उपरमअ. क्लीब. अ. पु.

**आयुधं** आयुध्यतेनेनेतिआयुधं, युद्ध करिजेतें जेणेंकरून तें. कृ. युधधा. संप्रहारअ. शस्त्र. अ. न.

**आयुधीयः** विग्रहादिसर्वआयुधिकशब्दाप्र.

**आयुधिकः** आयुधेनजीवतीतिआयुधिकः, आयुधस्य. शस्त्र त्यानें जगतो जो तो. त. शस्त्रोपजीवी, आयुधवृत्तीनें उपजीवन कर्ता. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आयुष्मान्** अतिशयेन आयुरस्यास्तीतिआयुष्मान्, अतिशयें करून आहे आयुष्यजास तो. त. पुष्कळ आयुष्याचा. वि. त्. पु. न. ई. स्त्री.

**आयुः** एतिगच्छतीत्यायुः, क्षणक्षणीं जातें जें तें. कृ. इणधा. गतिअ. आयुष्य. स्. न.

**आयोधनं** अतिशयेन योधनमायोधनं, अतिशयें करून जें योधन. स. प्रहार तें. स. युद्ध. अ. न.

**आरग्वधः** आरग्गंरोगशंलामपहंतीतिआरग्वधः, रोगातें नाश करितो जो तो. कृ. हनधा. हिंसाअ. बाहव्यारोग्यस. अ. पु.

**आरकूटः** आरंकूलयतेआरकूटः, गंत्यातें दाह करितो जो तो. कृ. कूटधा. दाहअ. पितळ. अ. पु. न.

**आरतिः** आरमणमारतिः, उपरमण जें तें. कृ. रमुधा. क्रीडाअ. उपरति. २ निवृत्ति, शांति. इ. स्त्री.

**आरनालकं** आर्च्छतीत्यारः, नलतीतिनालः आरोनालोस्यआरनालः सएवआरनालकः, गमनकरितो जो तो आर बंधन करितो तो नाल गमन करणारा आहे नाल जाचा तें. आरनाल तेंच आरनालक. त. कांजी. अ. न.

**आरंभः** आरंभणमारंभः, आरंभण जें तो. कृ. रभधा. राभस्यअ. प्रारंभ. अ. पु.

**आरवः आरावः** आरवीतीत्यारवः, उच्चारिला जातो जो तो. कृ. रुधा. शब्दअ. शब्द. अ. पु.

**आरा** आऋयतीतिआरा, चर्म भेदन करित्ये जी ती. कृ. ऋधा. गतिअ. चर्मतोचण्याचें शस्त्र. आ. स्त्री.

**आरात्** आरातीति आरात्, दूर आणि समीप या अर्थातें ग्रहण क

घितो जो तो. क्र. गधा. आदान अ. उ. आराच्छत्रोः सद्मावसत् २ सख्या गंस्थापयेदारात्. अव्य.

**आराधनं** आराधिराराध्यतेनेनवा आराधनं, साधन किंवा प्राप्ति करिजेत्ये जेणें करून तें. क्र. राधधा. संसिद्धिअ. सेवा. अ. न.

**आरामः** आरमंत्यत्रोति आरामः रमताहेत जाचेठायीं तो. क्र. रमुधा. क्रीडाअ. बाग. अ. पु.

**आरालिकः** आरालंचरती तिआरालिकः, कुटिलाचरण किंवा महानसाप्रतसंचार करितो जो तो. न. सूद, स्वयंपाकी. अ. पु.

**आरेवतः** आरेवयाति निःसारयतीति आरेवतः, मलानें निःसरण करितो जो तो. क्र. रेवृधा. प्लवगति अ. आरग्वधाचें झाड. अ. पु.

**आरोग्यं** अरोगस्यभावः आरोग्यं रोगाचाजो भाव ह्म. विद्यमानता तो. त. रोगाभाव. अ. न.

**आरोहः** आरुह्यतेनेन आरोहणं आरोहयतिवा आरोहः, आरोहण अथवा त्यातें करितो किंवा तें करिजेनें जेणें करून तो. क्र. रुहधा. बीजजन्मादि अर्थ. वस्त्रादिकांचा. १ लांबी. २ उंची. ३ सुंदर स्त्री. ४ कमर. ४ हत्तीवर चढणें. अ. पु.

**आरोहणं** आरुह्यतेनेनेतिआरोहणं, आरोहण करिजेतें जेणें तें. क्र. रुहधा. बीजजन्मादिअ. जिना, निसण. २ चढणें अ. न.

**आर्तगलः** गलतीतिगलः आर्तश्चासौगलश्च आर्तगलः, उदकादि विपुल भक्षण करितो जो तो गल आर्त ह्म. तृषित असा जो गल तो आर्तगल ह्म. निळा कोरंटा. अ. पु.

**आर्तवं** ऋतुरेवआर्तवं, ऋतूजो तेंच आर्तवं, किंवा ऋतुरस्यप्राप्तः आर्तवं, वसंतादि ऋतू आहे प्राप्त जास तें. न. स्त्रीरज. २ पुष्पादि अ. न.

**आर्तिः** आर्च्छतीतिआर्त्तिः, नमनोन्नमनरूपसर्वत्र गमन करित्ये जी ती. क्र. ऋधा. गतिअ. धनुष्याचें अग्र २ पीडा. इ. स्त्री.

**आर्द्र** आर्द्यतस्म आर्द्र क्लिन्न करिजेलें जें तें. क्र. अर्दधा. गतिअ. भिजलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आर्द्रकं** आर्द्रतिकफमार्द्रकं, कफा

तें लेश करितें जें तें. क्रु. अर्दधा. हिंसा अप्रलें. अ. न.

**आर्यः** अर्तुं योग्यः आर्यः, कर्तव्या कर्तव्य जाणण्यास जो योग्य तो. क्रु. ऋधा. गति अ. कुलीन. २ सज्जन. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आर्याणी** आर्याणां स्त्री आर्याणी, आर्य ह्म. श्रेष्ठ त्यांची जा स्त्री ती. स्त्रीप्र. श्रेष्ठपत्नी. २ वैश्यस्त्री ई. स्त्री.

**आर्यावर्तः** आर्याः श्रेष्ठाः आसमंतादूर्तंत इति आर्यावर्तः, श्रेष्ठ आसमंतात् भागीं राहतात जाच्या तो. क्रु. वृतुधा. वर्तन अ. विंध्याद्रि व हिमालय यांच्या मधला प्रदेश. अ. पुल्लिं.

**आर्षभ्यः** ऋषभाय हितो आर्षभ्यः ऋषभ ह्म. बैल त्यांकारणें जो हित ह्म. तदुत्पत्तीला योग्य तो. तरुणपणांत आलेला बैल. अ. पु.

**आलं** अलतीति आलं, चित्रपटादिकास भूषण करितें जें तें. क्रु. अलधा. भूषणादिक अ. हरताल. अ. न.

**आलंभः** आलंभनमालंभः, आलंभन ह्म. इंद्रादिदेवोद्देशानें पशुमारण जें तो. क्रु. डुलभषधा. प्राप्ति अ. देवतेच्या उद्देशानें बिलाअर्पण करण्याकरितां पशु मारणें. अ. पु.

**आलयः** आलीयंते अत्रेति आलयः, राहताहेत जाचेठायीं तो. क्रु. लीङ्धा. श्लेषण अ. घर. अ. पु.

**आलवालं** आसमंताल्लवं जलकणिका मालातीति आलवालं, आसमंताद्भागीं जलकण ग्रहण करितें जें तें. क्रु. लाधा. आदान अ. झाडाचें अळें. अ. न.

**आलसः** अलस एव आलसः, अलस जो तो. त. आळस. अ. पु.

**आलस्य** विग्रहादि पूर्वीच्याश. प्र.

**आलानं** आलीयते अत्र आलानं, बंधन करिजेतें जाचेठायीं तें. क्रु. लीङ्. धा. श्लेषण अ. हत्ती बांधण्याचा खांब. अ. न.

**आलापः** आलप्यते ने नेति आलापः, बोलिजे तोजो तो. क्रु. लपधा. व्यक्तवाणि अ. परस्पर संबोधन पूर्वक भाषण. अ. पु.

**आलाबुः आलाबूः** आसमंताल्लंबत इत्यलाबुः, आसमंताद्भागीं लंबायमान होत नाहीं ह्म. वर्तुलाकृती जो तो. क्रु. लबिधा. अवस्रंस

नअ. फाळा भोंपळा. उ. २ऊ. पु.

**आलिः आली** आअलतिअ ल्यतेवा आलिः, मंडनादिकेंक रून भूषित होत्ये. किंवा भूषित करिजेत्ये जी ती. कृ. अलधा. भूष णअ. सखी. २पंक्ति. ३स्वच्छअं तःकरण. ४सेतु. इ. २ई. स्त्री.

**आलिंदः** अलिंदएवआलिंदः, अ लिंद स्व. दाराच्या बाहेरचा चौक टीचा भाग जो तोच. न. दाराचा बा हेरचा एक प्रदेश. अ. पु.

**आलिंग्यः** आलिंग्यत इति आलिं ग्यः, आलिंगिजेतो जो तो. कृ. लि गिधा. गतिअ. मृदंग. अ. पु.

**आलीढं** आलेहनमालीढं, आले हन स्व. एकत्र जमून शहणें जें तें. कृ. लिहधा. आस्वादनअ. धनुर्ध रांचा स्थितिविशेष. अ. न.

**आलुः आलूः** आलुनातीत्यालुः उदकाचें छेदन स्व. निःसरण क रणारी जी ती. कृ. लुञ्धा. छेदन अ. तांदूळ धुण्याची गेवळी. उ. २ ऊ. स्त्री.

**आलोकः** आलोक्यत इति आलो कः, प्रकाश अथवा अवलोकन करिजेतो जो तो. कृ. लोकृधा. दर्श नअ. दर्शन. २प्रकाश. ३स्तुतिपाठ कांचें संभाषण. अ. पु.

**आलोकनं** आलोकः आलोकनं, आलोक स्व. अवलोकन जें तें. कृ. लोकृधा. दर्शनअ. अवलोकन. अ. न.

**आवपनं** आउप्यतेत्र आवपनं, घालताहेत जलादि ज्याचेठायीं तें. कृ. डुवपधा. बीजसंतानअ. क्षेत्र किंवा पात्रादिक. अ. न.

**आवर्तः** आवर्तनमावर्तः, आवर्त न स्व. भ्रमणजें तो. कृ. वृतुधा. व र्तनअ. उदकादिकांचा भोंवरा. अ. पु.

**आवलिः** आवलतीत्यावलिः, संव लन पावत्ये जी ती. कृ. वलधा. सं वलनअ. पंक्ति. इ. स्त्री.

**आवसितं** आवसीयतेस्मइत्याव सितं, अवसानातें प्राप्त स्व. सि द्ध झालें जें तें. कृ. षोधा. अंतकर्म अ. रास केलेलें धान्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आवालं** आवपंतिजलमत्रेत्याआवा लं, संसिक्त करिताहेत जल ज्याचेठा यीं तें. कृ. डुवपधा. बीजसंतानअ. अळें. अ. न.

**आवुकः** अवतीतिआवुकः, रक्षण करितो जो तो. कृ. अवधा. रक्षणअ. उ

स्थळक बाप नाटकांत त्याची प्रसि
द्धि. अे. पु.

**आवुत्तः** आपनमाप् आपमुत्तनोती
तिआवुत्तः, व्यापनातें विस्तृत करितो
जो तो. कृ. तनुधा. विस्तावअ. नाट्यप्र
करणांतील बाहिणीचा नवरा. अ. पु.

**आवृत्** आवर्तनमत्रेतिआवृत्, आ
वृत्ति होत्येजाचेठायीं ती. कृ. वृतुधा. व
र्तनअ. अनुक्रम. त्. स्त्री.

**आवृतः** आव्रियतेस्मइतिआवृतः,
आवृत्त करिजेलाजो तो. कृ. वृञ्धा. वर
णअ. वेष्टलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आवेगी** आवेगोस्त्यस्याइतिआवेगी,
आवेग ह्म. अतितीव्र आहे वेगजीसती.
त. वनोषधि वर्गांत जिलावरधाराअ
सें ह्मणतात ती. ई. स्त्री.

**आवेशनं** आविशंत्यत्रेतिआवेश
नं, प्रवेश करिताहेत जाचेठायीं तें. कृ.
विशधा. प्रवेशअ. शिल्पिलोकांचीशाला.
अ. न.

**आवेशिकः** अवेशेभवः आवेशिकः,
गृह भिन्नप्रदेशीं झाला जो तो. त. अति
थि वगैरे लांबून घरीं आलेला. वि. अ. पु.
न. आ. स्त्री.

**आशंसिता** विग्रहादिपुढच्याशा. प्र.
कृ. पु. न. ई. स्त्री.

**आशंसुः** आशंसतइतिआशंसुः,
इष्टार्थप्राप्तीच्छा करितो जी तो. कृ. शंसि
धा. इच्छाअ. स्पृहाशील जास फार इच्छा
असत्ये तो. वि. उ. पु. स्त्री. न.

**आशयः** आशयनमाशयः, आशयन
ह्म. जीवनादिकांस आश्रय अथवा अभि
प्राय जो तो. कृ. शीङ्धा. स्वप्नअ. जला
धार. २ आश्रय. ३ अभिप्राय. अ. पु.

**आशयाशः** आशेरते अत्रेति आशयः,
तमश्नातीतिआश्रयाशः, राहताहेत जा
चेठायीं तो आशय त्यातें भक्षण करितो
जो तो. कृ. अशधा. भोजनअ. अ. पु.

**आशारः** आशृणोतीतिआशारः, सर्वत्र
हिंसा करितो जो तो. कृ. शृधा. हिंसाअ. रा
क्षस. अ. पु.

**आशा** आअश्नुतइत्याशा, सर्वत्र व्याप्त
करित्ये जी ती. कृ. अशूङ्धा. व्याप्तिअ.
दिशा. २ फार इच्छा. आ. स्त्री.

**आशितं. आसितं** आशिताभोजि
ताआसितानिवासितावा गाव अत्रेतिआ
शितंआसितंवा, भोजित्त किंवा निवासित
आहे गाई जाचेठायीं तो. कृ. अशधा. भोज
नअ. २ वसधा. निवासअ. जाजागीं पूर्वीं गा
ई असतात ती जागा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आशितंगवीनं** आशितंचतेंद्गवीनंच आशितंगवीनं, भोजन करिजेलें असेंजें गोस्थान तें. भ. पूर्वी गाई चारित असत ती जागा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आशिरः** अश्नातीत्याशिरः, लोकोत्तर भक्षण करितो जो तो. कृ. अशधा. भोजनअ राक्षस. अ. पु.

**आशीः** आशास्ते आशासनमनयावाआशीः, भक्षणार्थ आशा करिस्ये अथवा ईप्सितार्थ इच्छिजे तो जीणें करून ती. कृ. आङः शासुधा. इच्छाअ. सर्पाचीदाढ. २ आशीर्वाद. स. स्त्री.

**आशीविषः आशीर्विषः** आशीस्तालुगतादंष्ट्रातत्रविषमस्यआशीविषः, दाढेचेठायीं आहे विष जाचें तो. स. सर्प. अ. पु.

**आशुः** अश्नुतइत्याशुः, व्यासव भक्षण करिजेते जें तें. कृ. अशू धा. व्याप्तिअ. शीघ्रत्वार्थी अव्य. २ व्रीहि, भात. अ. पु. न.

**आशुगः** आशुगच्छतीत्याशुगः, शीघ्र गमन करितो जो तो. कृ. गम्लृधा. गतिअ. वायु. २ बाण. अ. पु.

**आशुव्रीहिः** आशुश्चासौव्रीहिश्च आशुव्रीहिः, शीघ्र पिकणारा जो व्रीहि तो. स. लवकर पिकणारें भात. इ. स्त्री.

**आशुशुक्षणिः** आशोशुष्टुमिच्छतीत्याशुशुक्षणिः, सर्वत्र शोषण करावयाची इच्छा करितो जो तो. कृ. शुष्धा. शोषणअ. अग्नि. इ. पु.

**आश्चर्यं** आङितिचर्यते अभिनीयते आश्चर्यं, आश्चर्यप्रत नेइजे तो जी ती. कृ. चरधा. गतिअ. आनंदविशेष. अ. पु.

**आश्रमः** आश्रमंत्यत्रेतिआश्रमः, श्रम किंवा तप करितात जाचेठायीं ती. कृ. श्रमुधा. तपआणिखेदअ. ब्रह्मचारीआदिकरून चार आश्रम. अ. पु.

**आश्रयः** आश्रयणमाश्रयः, आश्रयण जें तो. कृ. श्रिञ्धा. सेवाअ. आधार. २ युद्धादिकांत जो सहाय्य होतो तो. अ. पु.

**आश्रयाशः** आश्रयमाधारमश्नातीत्याश्रयाशः, काष्ठादि आधारातें भक्षण करितो जो तो. कृ. अशधा. भोजनअ. विस्तव. अ. पु.

**आश्रुतं** आश्रूयतेस्म आश्रुतं, श्रवण करिजेतें अथवा प्रतिज्ञात किंवा स्वीकृत जें तें. कृ. श्रुधा. श्रवणअ. स्वीकारलेलें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आश्रवः** आश्रवणमाश्रवः, आश्रवणम्. स्वीकृति जी ती. कृ. श्रुधा. श्रवणअ. स्वीकार. अ. पु. २ वचनांत वागणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आश्वं** अश्वानांसमूहः आश्वं, अश्वां

र्थ:ओ समूह तें. त. घोड्यांचा समुदा य. अ. पु.

**आश्वीयं** विग्रहादि सर्व आश्वश. प्र.

**आश्वयुजः** अश्वयुजीअत्रास्तीत्याश्व युजः, अश्वयुजी पौर्णिमा आहे जाचे ठा यीं तो. त. आश्विन मास. अ. पु.

**आश्विनेयः** अश्विन्यामपत्यमाश्विनेयः, अश्विनीनें जें अपत्य तें. त. स्वर्गीचे वै द्य, अश्विनीकुमार. अ. पु.

**आश्वत्थं** अश्वत्थस्यफलमाश्वत्थं, अश्व त्थाचें जें फल तें. स. अश्वत्थाचें फल पुष्प अ. न.

**आश्विनः** अश्विन्यायुक्तापौर्णमासी यत्रास्तिस आश्विनः, अश्विनीनक्षत्र युक्त पौर्णिमा आहे जाचे ठायीं तो. त. आश्विन मास. अ. पु.

**आश्वीनं** अश्वस्यैकाहगमनमाश्वीनं, अश्वाचें एका दिवसाचें जें गमन तें. त. घो ड्याची एक मजल. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आषाढः** आषाढ्यायुक्ताआषाढी, साय त्रास्तिस आषाढः, आषाढी युक्त जी ती. आषाढी ती आहे जाचे ठायीं तो. त. आषा ढ मास. २ ब्रह्मचर्य व्रत कालीं जो दंड धार ण करितात तो. अ. पु.

**आसक्तः** आसंजि आसक्तः, आसक्त हो इजेला जो तो. कृ. षंज धा. संगम अ. त सर्व. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आसनं** आस्यतेत्रआसनं, राहिजेतें जाचे ठायीं तें. कृ. आस धा. उपवेशन अ. बसण्याचें आसन. अ. न. २ असणाचें झा ड. अ. पु. ३ कोणेका कार्याविषयीं शक्ति कुंठित झाली तरीं धैर्यानें प्रतीक्षा पाहा त राहणें. अ. न. ४ हत्तीचा खांदा. अ. पु.

**आसनपर्णी** आसमंतादसनइव पर्णान्यस्याइति आसनपर्णी, आसमंता द्भागीं असनवृक्षा सारखीं आहेत पानें जीस ती. स. गोकर्णीची वेल. ई. स्त्री.

**आसना** आसनमासना, उपवेशन जें ती. कृ. आस धा. उपवेशन अ. स्थानसं ध्यादिकालीं बसण्यास घेतात तें आसन. आ.

**आसन्नः** आसीदतिस्मआसन्नः, समीप प्राप्त झाला जो तो. कृ. षद्लृ धा. विशरणादि अ. समीप, जवळचा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आसवः** आसूयतइतिआसवः, पीड न करिजे तो जो तो. कृ. षुञ् धा. पीडना दि अ. उसाच्या रसापासून होणारें मद्य. अ. पु.

**आसादितं** आसाद्यतेस्मआसादि तं, प्राप्त करिजेलें जें तें. कृ. षद्लृ धा. विश रणादि अ. संपादिलेलें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आसारः** आसरणमासारः, सर्वत्र व्या प्त जें तें. कृ. सृ धा. गति अ. सैन्याचा स्थि

तिविशेषः २ जी निरंतर पर्जन्यधाराप डत्ये ती. अ. पु.

**आस्कर**: अस्करएवास्करः, अस्करजो तोच आस्कर. त. दैत्य. अ. पु.

**आस्करी** अस्करस्येयमास्करी, अस्कर संबंधीं जी ती. त. काळी मोहरी. ई. स्त्री.

**आसेचनकं** आसिच्यतेमनोत्रआ सेचनकं, मनः क्षरण होत नाहीं ज्याचेग यींतें. कृ. षिचधा. क्षरणअ. जें वस्तु पा हतां पाहतां अधिकच पाहावें असें वा टतें तें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आस्कंदनं** अतिशयेनस्कंद्यतेतदास्कं दनं, परस्परांनें अतिशयेंकरून गतिशो षण करिजेतें जें तें. कृ. स्कंदिर्‌धा. गति शोषणअ. युद्ध. अ. पु.

**आस्कंदितं** आस्कंदनमास्कंदितं, उ डुानकरून जें गमन तें. कृ. स्कंदिर्‌धा. गतिशोषणअ. घोडा मोठ्या वेगानें धाव त असतां पाहात नाहीं अशी जी त्यांची चाल ती. अ. न.

**आस्तरणं** आस्तीर्यतेअनेनआस्त रणं, आच्छादन होतें जेणें तें. कृ. स्तृ ञ्धा. आच्छादनअ. हत्तीचे पाठीवर चें आस्तरण. अ. न.

**आस्था. आस्थानं** आतिष्ठंत्य स्यामस्मिन्वाआस्थाआस्थानंवा, राह ताहेत जीचे किंवा ज्याचेठायीं ती किंवा तें. कृ. ष्ठाधा. गतिनिवृत्तिअ. सभा. २ प्रयत्न. आ. स्त्री. २ अ. न.

**आस्थानी** आतिष्ठंत्यत्रेतिआस्थानी, उत्तम रीतीनें राहतात जीचेठायीं ती. कृ. ष्ठाधा. गतिनिवर्तनअ. सभा. ई. स्त्री.

**आस्पदं** आपद्यतेस्मिन्नास्पदं, प्रति ष्ठित होतो किंवा विपत्ति पावतो ज्याचेग यींतें. कृ. पद्धा. गतिअ. कार्य. २ स्थान. अ. न.

**आस्फोटः आस्फोतः** आस्फोट यतीत्यास्फोटः, विशरण पावतो झा. वि शीर्ण होतो जो तो. कृ. स्फुटिरधा. विश रणअ. रुईचें झाड. अ. पु.

**आस्फोटनी** आस्फोट्यतेनयाआ स्फोटनी, विवर करिजेतें जीणें ती. कृ. स्फुटिर्‌धा. विशरणअ. सामता वगैरे छिद्र पाडण्याचें शस्त्र. ई. स्त्री.

**आस्फोटा** आस्फोटयतीतिआस्फोटा, विशरण पावत्से जी ती. कृ. स्फुटिर्‌धा. वि शरणअ. रान मोगरी. २ विष्णुक्रांता नावाची वनस्पति, आ. स्त्री.

**आस्फोता** विग्रहादिसर्वआस्फोटा शब्दाप्रमाणें.

**आस्यं** आस्वाद्यतेअनेनेतिआस्यं,

अन्नादिक आस्वात करिजेतें जेणें तें कृ. स्वद्.धा. आस्वादनअ. मुख. अ. न.

**आस्या** आसनमास्या, उपवेशनजीती कृ. आसधा. उपवेशनअ. बसण्याचें आसन. आ. स्त्री.

**आस्रव:** आस्रवणमास्रव:, आस्रवणक्ष. पीडा पावणें जें तो. कृ. स्रुधा. स्रवणअ. क्लेश. अ. पु.

**आहतं** आहन्यतेस्म इति आहतं, आहत स. निरर्थक अथवा गुणित जें तें. कृ. हनधा. हिंसाअ. गुणलेलें व कधीं न होण्याजोगी गोष्ट बोलणें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आहतलक्षण:** आहतमभ्यस्तंलक्षणंयस्यस आहतलक्षण:, अभ्यस्त आहे नाम ज्याचें तो. स. शौर्यादिगुणांनीं जो प्रख्यात तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आहव:** आह्वानमाहव:, परस्परांचा निष्ठुर शब्द जो तो. कृ. ह्वेञ्धा. स्पर्धाअ. युद्ध. अ. पु.

**आहवनीय:** आहूयतेप्रक्षिप्यतेहविरत्रेति आहवनीय:, प्रक्षिप्त करिताहेत हवि ज्याचेठायीं तो. कृ. हुधा. दानादिअ. अग्नीचाभेद. अ. पु.

**आहार:** आहरणमाहार:, भक्षण जें तो. कृ. हृञ्धा. हरणअ. भोजन. अ. पु.

**आहाव:** आहूयतेअत्रेति आहाव:, आह्वान करितात तृषार्त ज्याचेठायीं तो. कृ. ह्वेञ्धा. स्पर्धादिकअ. विहिरीजवळ पाणी ठेवण्या करितां स्थापन केलेलें टांकें वगैरे. अ. पु.

**आहितलक्षण:** विग्रहादिसर्वआहतलक्षणशब्दाप्र.

**आहितुंडिक:** अहेस्तुंडं मुखंतेनदीव्यतीति आहितुंडिक:, सर्पाच्या तोंडानें खेळतो जो तो. त. गारुडी. अ. पु.

**आहेयं** अहौभवंआहेयं, अहीच्याठायीं जें उत्पन्न तें. सर्पाचें विष किंवा अस्थ्यादिक. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**आहो** आहंतीति आहो, एकरूप ज्ञानाचा नाश करितो जो तो. कृ. हनधा. हिंसादिअ. विकल्परूपार्थक अव्य. उ. देव आहो गंधर्व.

**आहोपुरुषिका** अहोअहंपुरुष: तस्यभाव: आहोपुरुषिका, आपल्याठायीं मी पुरुष अशी जी शक्ति संभावना ती. त. मी पराक्रमी मी पुरुष अशा गर्वानें आपलें सामर्थ्य प्रगट करणें ती. आ. स्त्रीलिं.

**आह्वय:** आह्वानमाहू: नस्याअयं आह्वय:, आह्वान जें ती आहू तत्संबंधीं जो तो आह्वय. त. नाम. अ. पु.

अ. निंदा. २ करुणा. आ. स्त्री.

**ऋतु:** इयर्तीतिऋतुः, सदोदित गम न करितो व वयोवस्थाविशेषीं प्राप्त जो तो. कृ. ऋधा. गतिअ. स्त्रीरज २ दोन महिनेचा एक वसंतादिक. उ. पुल्लिंगीं.

**ऋतुमती** ऋतुरस्त्यस्याइतिऋतुमती, ऋतु ह्म. रजजें तें आहे जीस ती. त. विटाळशी स्त्री. ई. स्त्री.

**ऋते** ऋतीयतइतिऋते, वर्जन करितो जो तो. कृ. ऋतिधा. जुगुप्सा अ. विना. २ वांचून. अव्य. उ. ऋते पुण्यात् स्वर्गतिर्न

**ऋत्विक्** ऋतौयजतीति ऋत्विक्, ऋतूंचेठायीं यजन करितोजो तो. कृ. यजधा. देवपूजादिकअ. यजमानानें सांगितल्यावरून यज्ञकर्मांत कर्मकरणारे आग्नीध्र इत्यादि १६ त्या प्रत्येकाचें नाव. ज्. पु.

**ऋद्धं** ऋध्यतेस्मऋद्धं, वृद्धिंगतहोतें जें तें. कृ. ऋधुधा. वृद्धिअ. तृण घालून रास केलेलें धान्य. अ. न.

**ऋद्धि:** ऋध्नोतीतिऋद्धिः, वृद्धिंगत होत्येजी ती. कृ. ऋधुधा. वृद्धिअ. समृद्धि. २ गुरुडशेंग. इ. स्त्री.

**ऋभु:** उरादितेर्भवतीतिऋभुः, अदितीपासून जो उत्पन्न होतो तो. कृ. भूधा. सत्ताअ. देव. उ. पु.

**ऋभुक्षा** ऋभवः क्षीयंत्यत्रेतिऋभुक्षः स्वर्गः सास्यास्तीति ऋभुक्षाः, देव अल्प होतात ज्यांचेठायीं असा स्वर्ग आहे ज्यास तो. त. इंद्र. न्. पु.

**ऋश्य:** ऋच्छतीतिऋश्यः, शीघ्र गमन करितो जो तो. कृ. ऋच्छधा. गतिअ. जलद चालणारा मृग. अ. पु

**ऋषभ:** ऋषति बलीवर्दस्वरसादृश्यंगच्छतीतिऋषभः, बैल स्वराचा सादृश्याप्रत जातो जो तो. कृ. ऋषीधा. गतिअ. गायनाच्या स्वरांतील एक भेद. २ बैल. ३ बैलघारी नावाची वनस्पति. अ. पु.

**ऋषि:** ऋषतिजानातीतिऋषिः, त्रिकालज्ञ जो तो. कृ. ऋषीधा. गतिअ. मुनि. २ सत्यवक्ता. इ. पु.

**ऋष्टि:** ऋषतीतिऋष्टिः, शत्रूवर टाकिलाजातो जो तो. कृ. ऋषीधा. गमनअ. खड्ग. इ. पु.

**ऋष्य:** ऋषतीतिऋष्यः, अर्थादि ऋश्यशब्दाप्र. ऋषीधा. गतिअर्थ

**ऋष्यगंधा** ऋष्योऋष्यसदृशोगंधो यस्याः साऋष्यगंधा, ऋष्य म्ह. आस्वल त्या सारखा आहे गंध जासती स. वरधारानावाची औषधि. आकां स्त्रीलिंगीं.

**ऋष्यप्रोक्ता** ऋषिभिरप्रोक्ता ऋष्यैः मृगैः प्रोक्तावेतिऋष्यप्रोक्ता, ऋषीनीं नसांगितली जी ती. अथवा मृगानीं भक्षित जी ती. स. कुहरी नावाची वनस्पति. २ शतावरी. आ. स्त्रीलिंगीं.

**ऋष्यकेतुः ऋश्यकेतुः** ऋश्योमृगविशेषः केतुर्यस्यस ऋष्यकेतुः, मृगविशेषआहे ध्वजाचिन्ह ज्याचें तो. स. अनिरुद्ध. उ. पु.

**एकः** एतीत्येकः, असहायगमन करितो अथवा मुख्यत्व पावतो जो तो. कृ. इण्धा. गतिअ. एकटा २ मुख्य. ३ निराळा. ४ केवळ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**एककः** एकएवएककः, एकजो तोच एकक. त. एकटा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**एकतरः** अनयोरेकः एकतरः, दोहोंमध्यें जो एक तो. त. निराळा वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**एकतानः** एकं तानयतीति एकतानः, अनन्यवृत्तिक जो तो. कृ. तनुधा. श्रद्धोपकरणादिक अ. एकाग्रचित्त. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**एकतालः** एकस्तालोमानमस्येत्येकतालः, एक आहे ताल म्ह. मान जें तें ज्याचें तो. स. गायनाचें सर्वसाहित्य असून जें गाणें तें. अ. पु.

**एकदंतः** एकः दंतोयस्यसः एकदंतः, एक आहे दंत जास तो. स. गणपति. अ. पु.

**एकदा** एकस्मिन्कालेएकदा, एककालीं त. एककालीं ह्याअर्थीं अव्य. उ. गवांशतमेकदादत्तं.

**एकधुरः** एकांधुरंवहतीतिएकधुरः मुख्यकार्यभारानें वाहतोजोतो. त.ए. एककार्योपयोगीअसाकार्यभार वाहणारा. वि.अ.पु.न.आ.स्त्री.

**एकधुरावहः** एकधुरायावहः एकधुरावहः, एकधूरजी तीचा वाहक. स. अर्थादिसर्व एकधुर शब्दाप्रमाणें.

**एकधुरीणः** विग्रहादिसर्वएकधुर शब्दाप्रमाणें.

**एकपदी** एकःपादोस्यामित्येकपदी, एकपादचालतांना राहतो जीचेठायीं ती. स. लहानवाट. ई. स्त्री.

**एकपिंगः** एकपिंगंचक्षुर्यस्यसएकपिंगः, एकआहे पिंग ह्म. पिंगटवर्णचक्षु जाचें तो. स. कुबेर. अ.पु.

**एकसर्गः** एकस्मिन्सर्गोनिश्चयोयस्य सएकसर्गः, एकाच्याठायींआहे निश्चय जाचा तो. स. अर्थादिसर्व एकतान शब्दाप्रमाणें.

**एकहायनी** एकंहायनोस्याएकहायनी; एकआहे वर्ष जीस ती. स. एकवर्षाचीगाई. ई. स्त्री.

**एकाकी** विग्रहादिसर्वएककशब्दाप्र. वि. इन्प्रत्य. ई. स्त्री.

**एकाग्रः** एकस्मिन्नग्रमस्यएकमेवाग्रमस्यवाएकाग्रः, एकाच्याठायींआहे अग्र ह्म. प्रधानत्वावलोकन अथवा आग्रजाचा तो. स. अनाकुल. २एकाग्रचित्त. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**एकाग्र्यः** एकंअग्र्यंज्ञेयंयस्यसएकाग्र्यः, एकआहे ज्ञेयजाचें तो. स. अर्थादिसर्व एकाग्रशब्दाप्र.

**एकांतं** एकःअंतोनिश्चयोयत्रेतिएकांतं, एकआहे निश्चय जाचेठायीं तें. स. अतिशय. अ. न.

**एकाब्दा** एकमब्दमस्याएकाब्दा, एकआहे वर्ष जीस ती. स. अर्थ एकहायनीशब्दाचा. आ. स्त्री.

**एकायनः** एकंअयनंयस्यएकायनः, एकआहे अयन ह्म. आश्रयजास तो. स. अर्थादि एकाग्रशब्दाप्रमाणें.

**एकायनगतः** एकायतनंगतः एकायतनगतः, मुख्यस्थानाप्रत प्राप्त होता झाला जो तो. स. अर्थादि एकाग्रश. प्र.

**एकाष्ठीलः** एकमस्थिलातीतिएकाष्ठीलः, एकास्थीतें ग्रहण करितो ह्म. केवल एक काष्ठाधारप्राधान्येंकरून राहतो जो तो. रू. लाधा. आदान अ. रुई चें व मांदारच्चें झाड. कोणी बकुळीचें असेंहि ह्मणतात. अ. पु.

**एकाष्ठीला** विग्रहादिपूर्वोक्याशाप्र माणें. पाहाडमूळ नामक वनस्पति आ वंत. स्त्रीलिं.

**एडः** आसमंतात्ईड्यतइतिएडः, ब धिरत्वामुळेंसर्वत्र स्तविजेतो म्ह. वि शेषतः उद्घोषित करिजे तो जो तो. क्र. ईडधा. स्तुतिअ. बधिर म्ह. बेहरा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**एडकः** एलतीतिएडकः, गमनक रितो जो तो. क्र. इलधा. गमनअ. एडका म्ह. मेंढा. अ. पु.

**एडगजः** एलनंएडः एडेगजतीति एडगजः, पोषणाजें तो एड त्याविष यीं मदोन्मत्त होतो जो तो. क्र. गजधा. मदअ. टाकळ्याचें झाड. अ. पु.

**एडमूकः** एडोबधिरश्चासौमूकश्च एडमूकः, बेहरा असा जो मूक तो. स. बेहरा असून जो मुका तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**एडूकं** ईड्यतेतदेडूकं, उत्तमरस्तविजे तें जें तें. क्र. ईडधा. स्तुतिअ. ज्या भिंतींत काठिण्या करितां कठिण पदा र्थ घालून बांधितात ती भिंत. अ. न.

**एणः** एतीतिएणः, सुंदर गमन क रितो जो तो. क्र. इणधा. गतिअ. चं चळ व पाणीदार अशा नेत्रांचा हरिण. अ. पुल्लिंगीं.

**एतः** इतिवर्णानितिएतः, वर्णाप्रत गमन करितो म्ह. वर्णरूपानें राहतो - जो तो. क्र. इणधा. गतिअ. चित्रवर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**एतर्हि** एतस्मिन्कालेएतर्हि. या काला चेठायीं. त. सांप्रतकालार्थी. अव्य. उ. एतर्हिक्रियतेकार्यं.

**एधः एधः** एधतेऽग्निरनेनएधः, अग्नि वृद्धिंगत होतो जेणें तो व तें. क्र. एधधा. वृद्धिअ. शुष्ककाष्ठ. अ. पु. स. न.

**एधा** एधनमेधा. वृद्धीजी ती. क्र. एध धा. वृद्धिअ. समृद्धि. आ. स्त्री.

**एधितं** एधतेस्मएधितं, वृद्धि पाव तें झालें जें तें. क्र. एधधा. वृद्धिअ. वृ द्धिंगत. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**एनः** नरकंएत्यनेनचएनः, नरकाप्रत प्राणी गमन करितो जेणें करून तें. क्र. इणधा. गतिअ. पातक. स. न.

**एरंडः** आईरयतीतिएरंडः, आसमं तात्लक्षिजेतो जो तो. क्र. ईरधा. प्रेक्षण अ. एरंडाचें झाड. अ. पु.

**एलवालुकं** एलयतीतिएला एला इववालु एलावालुतदेवएलवालुकं,

मस्तणा विषयीं प्रेरणा करिती जीती एला, एलेचे परीजें प्राणन त्स. संतोष तें एलवालु तेंच एलवालुक कांकडी अ.

**एला** एलयतीति एला, प्रेरणा करिते जीती. कृ. इलधा. प्रेरणअ. इलाची चें झाड. आ. स्त्री.

**एलापर्णी** एलायाइव पर्णान्यस्या एलापर्णी, एला त्स. वेलदोड्याचें झाड त्याच्या पाना सारखीं आहेत पानें जीची ती. स. कोलिंदण नावाची वनस्पति. ई. स्त्री.

**एवं** अयनंऐतीतिवा एवं, समानार्था विषयीं जें गमन तो. किंवा त्याअर्था प्रत गमन करितो जो तो. कृ. इणधा. गतिअ. सादृश्य २ निश्चय. ३ प्रकार ४ अंगीकार त्याअर्थीं. अव्य. उ. अग्निरेवंद्विजः इत्यादि.

**एव** अयनमेव. निश्चयार्थाप्रत गमन करितो जो तो. कृ. इणधा. गतिअ. निश्चयार्थीं. अव्य. उ. एवमेव ननु.

**एषणिका** इष्यतेनयाएषणिका, सुवर्णादि तोलिजे तें जीणें ती. कृ. इष्धा. गतिअ. कांटा त्स. ताजवा आ. स्त्री.

**ऐकागारिकः** एकमसहायमगारंप्रयोजन मस्यैकागारिकः. असहाय गृह आहे त्स. प्रयोजन ज्यास तो त. चोरी करणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्रीलिंगीं.

**ऐंगुदं** इंगुदेःफलंऐंगुदं. इंगुदीचें जें फल तें. त. हिंगणबेटाच्या झाडाचें फळ. अ. न.

**ऐडविलः** इडविलायाअपत्यमैडविलः, इडविलेचें जें अपत्य तो. त. कुबेर. अ. पु.

**ऐणं** एणस्यविकारावयवोवाऐणं. मृगाचा जो विकार अथवा अवयव तें. हरिणाचें कातडें केश वगैरे. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**ऐणेयं** एण्याविकारोवयवोवाऐणेयं, मृगीचें चर्मादिक जें तें. त. हरिणीचें कातडें वगैरे. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**ऐतिह्यं** इतिहएवऐतिह्यं, पारंपर्योपदेश जो तो. त. लोकपरंपराप्राप्त उपदेश व शाब्दप्रमाण. अ. न.

**ऐंद्रियकं** इंद्रियेणानुभूयतइतिऐंद्रियकं, इंद्रियानें अनुभविजेलें जें तें. त. इंद्रियानें घेतलेलें सुखादि

क. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**ऐरावणं** इरासुरावनमुदकंयस्मि न्नतत् इरावणं तत्रभवो ऐरावणः, संशरूप आहे उदक जाचेठायीं तें इरावण त्याचेठायीं जो उत्पन्न तो. त. इंद्राचाहत्ती ह्म. ऐरावत. - अ. नपुंसक.

**ऐरावतः** इराउदकानिसंत्यस्यामि तिइरावती तत्रभवः ऐरावतः, उदकें आहेत जीचाठायीं ती इरावती तीच्येठायीं जोउत्पन्न तो. इंद्राचाहत्ती २ पूर्वदिशेचा हत्ती ३ नारिंगाचें झाड. अ. पु.

**ऐरावती** इराआमः संत्यस्येतिइरावान् मेघस्तस्येयं ऐरावती, उदकें ह्मणजे. जलें आहेत जासअसा जो मेघ तत्संबंधी जी ती. त. विद्युल्लता. ई. स्त्री.

**ऐलविलः ऐडविडः** इडविलो पत्यमिडविडोपत्यमितिवा ऐलविलऐडविडोवा, इडविडेचें जें अपत्य तो. त. कुबेर. अ. पु.

**ऐलेयं** इलायाः कर्कटीवल्या अपत्यमैलेयं, इलेचें जें अपत्य तें. त. कांकडी. अ. न.

**ऐश्वर्यं** ईश्वरस्यभावः ऐश्वर्यं, ईश्वराचा जो भाव ह्म. निग्रहानुग्रहसामर्थ्य तें. त. प्रभुत्व. अ. न.

**ऐषमः** एतस्मिन्वर्षे ऐषमः, वर्तमानवर्षीं ह्म. चालत्यासालीं. अव्य. उ. ऐषमोपिकांतोनागतः.

**ओं** अवतीतिओं, उपासकांचें र क्षण करितो जो तो. क्र. अवधा. रक्षणादिकअ. अंगीकार याअर्थी. अव्य. को. प्रणव. किंवा अनुमोदन

**ओकः ओकः** वसत्यस्मिन्सम वैत्यत्रेतिवाओकः, वास करितोज्या चेठायीं अथवा संघीभूत होऊन रा हतात ज्याचेठायीं तो वतें. क्र. वसधा. निवासअ. २ इण्धा. गतिअ. गृह. अ. पु. २ स. न.

**ओघः** आजत्यतेअनेनेतिवहती- तिवाओघः, मोहित होतो जेणें अ थवा वाहतो जो तो. क्र. ओहाक्धा. त्यागअ. २ वहधा. प्रापनअ. नृत्य विशेष. अ. न. २ पाण्याचा प्रवाह ३ समुदाय ४ परंपरा. अ. पु.

**ओंकार:** अवतीतिओंकारः, संर क्षण करितो जो तो. क्र. अवधा. र क्षणादिकअ. वेदाचा आदिभूत जो ओंकार ह्म. प्रणव तो. अ. पु.

**ओजः** उब्जत्यनेनओजः, बलिष्ठ कांतिमान् होतो जेणें करून तें. क्र. उब्जधा. आर्जवअ. बल २ कांति की. प्रकाश. धातूचें तेज. मनिबं ध. स. न.

**ओड्रपुष्पं** आईबदुनत्तीतिओड्रं ओड्रंचतत्पुष्पंचओड्रपुष्पं, ईषत् जें क्लिन्न तें ओड्र ओड्र असें जें पु ष्प तें. स. जास्वंदीचें पुष्प. अ. न.

**ओतुः** अवतिआखुभ्योगृहमिति ओतुः उंदरांपासून गृह रक्षण क रितो जो तो. क्र. अवधा. रक्षणअ. माजर. उ. पु.

**ओदनं** उनत्तीत्योदनं, क्लेदन पाव तो जो तो. क्र. उंदीधा. क्लेदनअ. भा त. अ. न.

**ओषः** ओषणमोषः, दहन जें तें. क्र. उषधा. दहनअ. दाह, जळणें. अ. पुल्लि.

**ओषधिः** ओषोदीप्तिर्धीयतेऽ त्रेतिओषधिः, दीप्ति ह्म. रोगादिद हनशक्ति जी ती राहत्ये जीचेठायीं ती. क्र. उषधा. दाहअ. फळ पिकल्या वर निर्जीव होणारी जी ती. इ. स्त्री.

**ओषधी** विग्रहादिसर्वओषधि श- ब्दाप्रमाणें. ई. स्त्री.

**ओषधीशः** ओषधीनामीशःओ षधीशः, ओषधींचा जो स्वामी तो. स. चंद्र. अ. पु.

**ओष्ठः** ऊष्यतेऽऽमाहारेणेतिओ

ष:, उंबा आहारानें दाह पावतोजो तो. न. उषधा. दाहअ. ओष्ठ. अ. पु.

**औक्षकं** उक्ष्णांसमूहोऔक्षकं, उक्ष जे त्यांचा जो समूह तें. न. बैलांचा समुदाय. अ. न.

**औदनिक:** ओदनंशिल्पमस्यौदनिक:, ओदन आहे शिल्प म्ह. कौशल्य ज्याचें तो. न. सैपाकी. अ. पु.

**औदुंबरं** उंशंभुंवृणोतीतिउदुंबर उदुंबरएवऔदुंबरंउदुंबरस्येदमिति वा. शंकरानें वरण करितो जो तो उदुंबर तोच औदुंबर किंवा उदुंबर संबंधी जें तें. न. तांबें २उंबराचें फळ व वृक्ष. अ. न.

**औदरिक:** उदरेप्रसितऔदरिक: उदर पोषणाविषयीं जो तत्पर तो. त. भुकेनें फार पिडलेला. वि. अ. पु. न. ई. स्त्री.

**औपयिकं** उपायएवौपयिकं. उपायजो तेंच औपयिक. त. नीतीनेंमिळण्यास योग्य जें द्रव्यादि तें. वि. अ. पु. न. ई. स्त्रीलिंगीं.

**औपवस्तं** उपवसतीतिउपवस्ता उपवस्तुरिदमौपवस्तं, उपास करितो जो त्याचें जें कर्म तें. न. उपवास करणें. अ. न.

**औपवस्त्रं** उपवस्त्रेतदुपवस्त्रं, मदेवऔपवस्त्रं, पांघरुणजें तें. न. अंगावरील वस्त्र. अ. न.

**औमीनं** विग्रहादिसर्वउम्यश. प्र.

**औरभ्रकं** उरभ्राणांसमूह: औरभ्रकं, उरभ्र म्ह. मेंढे त्यांचा जो समूह तें. न. मेंढरांचा कळप. अ. न.

**औरस:** उरसानिर्मित: औरस:, हृदयानें म्ह. हृदयरूपसाहित्यानें उत्पन्न केला जो तो. त. सजातीयविवाहितस्त्रीचेठायीं उत्पन्न केलेलें अपत्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**औरस्य:** उरसानिर्मित: औरस्य:, वक्षस्थलानें उत्पन्न केला जो तो. त. अर्थादिवरच्या शब्दाप्रमाणें. अ. पु. ई. स्त्री.

**और्ध्वदेहिकं** देहादूर्ध्व: ऊर्ध्वदेहस्तस्मिन्भवमौर्ध्वदेहिकं, ऊर्ध्वदेहाविषयीं झालें जें तें. न. मरणादिवसापासून दाहादिवसपर्यंत जें पिंडदानादिकर्म तें. वि. अ. पु. न. ई. स्त्री

**और्व:** उर्वस्यमुनेरपत्यमौर्व:, उर्वमुनीचा जो पुत्र तो. त. वडवाग्नि. अ. पुल्लिंगीं.

**औशीरः** उश्यतइतिउशीरः उशीर स्यायंऔशीरः शोभनत्वें करून राह णाऱ्या संबंधीं जोंतें चवरीचादांडा मतांतरीं शयन व आसन. अ. पु.

**औषधं** ओषधेरिदमौषधं, ओष धिसंबधीं जें तें. त. रोगादिकांचें ह रण करणारें औषध. अ. न.

**औष्ट्रकं** उष्ट्राणांसमूहः औष्ट्रकं, उंटांचा जो समुदाय तो त. उंटांचा कळप. अ. न.

**कः** कायतिकम्यतेकचतिवाकः श ब्दकरितो इच्छिजेतो अथवा दीप्ति मानजो तो. कृ. कैधा. शब्द अ. २ क मुधा. कांतिअ. ३ कचधा. दीप्तिबंध नअ. वायु २ आत्मा ३ सूर्य ४ ब्रह्म देव ५ सूर्य ६ यम ७ दंक्ष ८ मोर ९ अग्नि. अ. पु. १० सुख ११ मस्त क. अ. न.

**ककुदः ककुत्** कसुखंकौति ककुदः, सुखदेतें जें तें. कृ. कु धा. शब्द अ. प्राधान्य २ छत्रचाम रादिराजचिन्ह ३ बैलाचें कोळें अ. पु. न. २ त. स्त्री.

**ककुद्मती** अतिशयिताककुदस्ती तिककुद्मती, कोळ्यासारखाआहे प्र देश जीचा ती. त. कमर. ई. स्त्री.

**ककुंदरं** स्कद्यतेकामिनाइतिककुं दरं, कामी पुरुषानें अधरीभूत करि जेतो जो तो. कृ. स्कंदिरधा. गतिशो षणाअ. पाटीचे हाडाचे खालचे बा जूस दोन खळगे असतात ते प्रत्ये क. अ. न.

**ककुप्** कसुदकंकुभ्नातीतिककुप्, उदकाप्रत विस्तृत करितें जी ती. कृ. कुभधा. विस्तृत अ. दिशा. भ. स्त्री.

**ककुभः** ककुभोदिशःसंत्यस्येति ककुभः, बहुविस्तारामुळें दिशा आहेत जास तो. त. अर्जुनवृक्ष. २दी णेचा खालचा भोंपळा. अ. पु.

**कक्कोलकं** ककतेइतिकक्ककं च, तत्कोलंचकक्कोलं तदेव कक्कोलकं. चंचलकारिजें कोल तें कक्कोल तेंच कक्कोलक. त. कंकोळ. अ. न.

**कक्खटं** कक्खतीतिकक्खटं, दृढ ह्म. घनीभूत होतो जो तो. कृ. कक्खधा. हसनअ. कठीणाह्म. घट्ट. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कक्षः** कक्ष्यतेइतिकक्षः, हिंसाकरिजेतो जो तो. कृ. कषधा. हिंसाअ. छेदनअ. कांख २ शुष्कगवत ३ वेल. अ. पु.

**कक्ष्या** कक्षेभवाकक्ष्या, बाहुमूळाचेठायीं राहणारी जीती. त. हत्तीचा मध्यभागीं बांधण्यास उपयोगींचामड्याची वादी किंवा दोरी ती. २ कांची, मेखळा, कमरपट्टा ३ राजगृहादिकांचा आंतील कोठा, मध्यगृह. आ. स्त्री.

**कंकः** कंकतेइतिकंकः, गमनकरितो जो तो. कृ. ककिधा. गतिअ. कंकपक्षी, ज्याचींपिसें बाणासउपयोगीं पडतात तो. अ. पु.

**कंकटकः** कंसुखंकटतीतिकंकटकः, सुखवृष्टि करितो जो तो. कृ. कटेधा. वर्षावरणादिअ. कवच, चिलखात. अ. पु.

**कंकणं** कंशुभंकणतीतिकंकणं, शुभशब्दि जें तें. कृ. कणधा. शब्दअ. मणकटाचें भूषण. कांकण कंकण्या इत्यादि. अ. पु. न.

**कंकणी** कंकंगमनंतस्मिन्कणतीतिकंकणी, गमनकालीं शब्द करित्येजी ती. कृ. अणधा. शब्दअ. क्षुद्रघंटिका, घागरी, घुंगर इत्यादि. इ. स्त्रीलिंगीं

**कंकतिका** कंकस्यांकाःकंकाःकेशास्तेषुअततीतिकंकतिका, केशमार्जन करणारी जीती. कृ. अतधा. सातत्यगमनअ. फणी. आ. स्त्री.

**कंकालः** कंकालयतीतिकंकालः, मस्तकातें क्षेपण करितो ह्म. धारण करितो जो तो. कृ. कलधा. क्षेपअ. शरीरांतील अस्थिपंजर, हाडांचा सांगाडा. अ. पु.

**कंगुः** कंगच्छतीतिकंगुः, सुखातें

तें देतो जो तो. क्र. गम्लृधा. गतिअ. कांग, राळा. उ. पु.

**कंगूः** विग्रहादिसर्वकंगुश. प्र.

**कचः** कच्यतेइतिकचः, बंधन करिजेतो जो तो. क्र. कचधा. बंधनअ. मस्तकांचो केंस. अ. पु.

**कच्चरं** कुत्सितंचरतीतिकच्चरं, कुत्सित होतें जें तें. क्र. चरधा. गतिअ. मळकट, मलीन. वि. अ. पु. न. आबंत. स्त्रीलिंगी.

**कच्चित्** कत्चचित्च अनयोः समाहारः कच्चित्, कच्चिदांचा जो समाहार तो. स. अभीप्सितार्थाचा प्रश्न. अव्य. उ. कच्चिज्जीवतिमेमाता.

**कच्छः** कंजलंछ्यतिकचतीतिवा कच्छः, जलातें निर्मल करितो किंवा दीप्तिमान होतो जो तो. क्र. छोधा. छेदनअ. २ कचधा. दीप्त्यादिअ. पावर्णाचा पदर. २ नौकांग, नाव. ३ नदी, ओढा इत्यादिकांचे समीप जो जलप्राय प्रदेश तो. ४ नांदरुखीचें झाड. अ. पु.

**कच्छपः** कच्छेनपिबतीतिकच्छपः, कच्छामें प्राशन करितो जो तो. क्र. पाधा. पानअ. कांसव. अ. पु.

**कच्छपी** कच्छेनपिबतीतिकच्छपी, कच्छें करून पान करते जी ती. क्र. पाधा. पानअ. सारस्वती वीणा. २ लहान एक रोग. ई. स्त्री.

**कच्छुरः** कच्छूरस्त्यस्यकच्छुरः, खरूज आहे जास तो. स. ज्यास ओली खरूज झाली आहे तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कच्छुरा** कच्छुंरातीतिकच्छुरा. कंडूतें देते जी ती. क्र. राधा. दानअ. ज्यास धमासा असें ह्मणतात ती. आबं. स्त्री.

**कच्छूः** कषतीतिकच्छूः, अंगाचा नाश करणारी जी ती. क्र. कषधा. हिंसाअ. ओलीखरूज. ऊ. स्त्री.

**कंचुकः** कंच्यतेनेन कंचुकः, बंधन स्ल. वेष्टित होतें जेणें तो. क्र. कचधा. दीप्तिबंधनअ. चोलक, चोळी, आंगरखाइत्यादि. २ सर्पाची मेंग ३ दाण्यावरचें सालपट. अ. पु.

**कंचुकी** कंचुकश्चोलकोस्त्यस्यकंचुकी, चिलखत आहे जास तो. त. भालदार. इन्. पु.

**कटः** कष्यते कटतीतिवा कटः, आवरण करिजेतो अथवा मदस्राव करितो जो तो अथवा धान्यग्रहण करणाराजो तो. कृ. कटेधा. वर्षाव घ्रर्थ- हत्तीनें गंडस्थल. २ कटिफलक, कमरेचें फळें ३ वेळू माणगे इत्यादिकांचें बेळानीं केलेले पदार्थ तव्ह, करंडा इत्यादि. को. कालिंगण. अतिशय. प्रेत. समय. क्रियाकार. कमर. अ. पु.

**कटकः** कटयतेइतिकटकः, आवृत्त करिजेतो जो तो. कृ. कटेधां. वर्षावरणार्थ. सैन्य. अ. न. २ प्रकोष्ठाभरण, पोची. ३ पर्वताचा नितंब प्रदेश, पर्वताचा मध्यभाग. ४ चक्र, चाक. अ. पु.

**कटभी** कटवद्भातीतिकटभी, कटासारखी शोभत्येजीती. कृ. भाधा. दीप्तिअ. ज्योतिष्मती ह्म. मालकांगोणी असें ह्मणतात ती. ई. स्त्री.

**कटंबरा** कटं वृणोतीतिकटंबरा, प्रदेशावरण करित्ये जी ती. कृ. वृञ्धा. वरणअ. केदार ह्म. कुटकी असें ह्मणतात ती. २ जीसं कुब्जप्रसारिणी, चांद्वेल ह्मणतात ती. आ. स्त्री.

**कटंभरा** कटंबिभर्तीतिकटंभरा, कटातें धारण करित्ये जी ती. कृ. डुभृञ्धा. धारणपोषणअ. अर्थ कटंबराश. प्र. आ. स्त्री.

**कटाक्षः** कटंगंडं अक्ष्णोतीतिकटाक्षः, गंडाला व्याप्त करणारा जो तो. कृ. अक्षूधा. व्याप्तिअ. अपांगदर्शक ह्म. नेत्रप्रांत भागानें पाहणें. अ. पुल्लिंगीं

**कटाहः** कटेन अतिशयेन आहन्यतइतिकटाहः, अतिशयें करून ताडिजेतो जो तो. कृ. हनधा. हिंसाअ. वडे घारगे इत्यादि तळण्याचें पात्र, कढई ह्म. काईल. को. कृपाळ. कांसवाची पाठ. वरण. महिषीचें अपत्य. अ. पु.

**कटिः** कटतेइतिकटिः, आच्छादन करित्येजी ती. कृ. कटेधा. आवरणअ. कमर. इ. स्त्री.

**कटिप्रोथः** प्रोथतीतिप्रोथः, कट्याः प्रोथः कटिप्रोथः, कटिसंबंधीं मांसाचा गोळा जो तो. कृ. प्रोथृधा. पर्याप्तिअ. कटिस्थ मांस पिंड, कुला. अ. पु.

**कटिल्लुकः कठिल्लुकः** कटतीति कटिल्लुः कठिल्लोवा स एव कठिल्लकः, आ

वरण करितो किंवा भक्षणद्वारा दुःख दायक जो तो. काटि. कुथितो च काञ्चक. न. शाकविशेष, ज्यास कारली, कारती असें ह्मणतात ती. अ. पु.

**कटी** विग्रहादिक कट शब्दाप्रमाणें. अर्थ कटि. २ पिप्पली, पिंपळी. ई. स्त्रीलिंगीं.

**कटुः** कटतीति कटुः, तीक्ष्णतेनें मुखावरण करितो जो तो. कृ. कटेधा. वर्षावरणअ. कटंबरा शब्दाचा पहिलाअ. उ. स्त्री. २ रसविशेष, तिखटरस. उ. पु. ३ करण्यास अयोग्य उ. न. ५ तीक्ष्ण. वि. उ. पु. न. ई. स्त्री.

**कटुतुंबी** कटुश्चासौ तुंबीच कटुतुंबी, कडु अशी जी तुंबी ती. स. दुध्याभोंपळा. ई. स्त्री.

**कटुरोहिणी** रोहतीति रोहिणी कटुश्चासौ रोहिणीच कटुरोहिणी. मादुर्भूत होत्ये जी ती रोहिणी कडु अशी जी रोहिणी ती कटुरोहिणी स. कटंबरा शब्दाचा पहिला अर्थ. ई. स्त्री.

**कटूफलः** कटतीति कटु कटूफलं यस्य सः कटूफलः, वर्षाकाळी सम्भ जें तें कटु कटु आहे फल ज्याचें तो. स. कुंभ्याचें झाड. अ. पु.

**कटुंगः** कटून्यंगान्यस्य कटुंगः, कटु आहेत अंगें ज्याचीं तो. स. टेंट्याचें झाड. अ. पु.

**कठिंजरः** कठिनं जरयतीति कठिंजरः, कठिनातें मृदु करितो जो तो. कृ. जृधा. वयोहानिअ. ज्यास आजवेल बावरी असें ह्मणतात तो. अ. पु.

**कठिनं** कठतीति कठिनं, संकटानें जीवन पावतें जें तें. कृ. कठधा. कृच्छ्रजीवनअ. कठिण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कठोरं** विग्रहादि सर्व कठिन श. प्र.

**कडंकरः** कडं करोतीति कडंकरः, काठिन्य ग्रहण करितो जो तो. कृ. डुकृञ्धा. करणअ. सरम, कडबा इत्यादिकांचें भूस. अ. पु.

**कडंगरः** गृणातिगिरतिवा गरः, कडस्य गरः कडंगरः. ग्रहण अथवा भक्षित होतो जो तो गर कडह्म. कडबा यांचा जो गर ह्म. भक्षण तो. अर्थादि पूर्वीच्या श. प्र.

**कडंब**: कडतीति कडंबः, मदकारी तो जो तो कडकड शब्द होऊन मोडतो जो तो. क्र. कडधा. मदअ. देट. अकारांत. पुल्लिं.

**कडार**: कडनंकडः कडमारातीति कडारः, शृंगार रसाच्या मदातें देतो जो तो. क्र. राधा-दानअ. पिंगट वर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कण**: कणतीति कणः, संकुचित होतो जो तो. क्र. कणधा. निमीलन अ. सूक्ष्म, बारीक. वि. अ. पु. न. आ. स्त्री. धान्यांश, कणी. अ. पु.

**कणा** कणतीति कणा, शब्द करितें जी ती. अथवा करवितें जी ती. क्र. कणधा. शब्द अ. पिंपळी. २ जिरें. आबंत. स्त्री.

**कणिका** कणाः संत्यस्याइति कणिका, कण आहेत जीस ती. त. नस वेलाचें झाड. २ परमाणु. आ. स्त्री.

**कणिशं** कणयः कणाः संत्यस्य कणिशं, कण आहे जास तें. त. धान्याचें लोंगर ह्म. कणिस. अ. पु. न.

**कण्वं** विग्रहादि न्विण्व शब्दाप्रमाणें. तंडुलादिद्रव्यकृत मद्य राबीज. अकारांत. न.

**कंटक**: कंट्यतेनेनेतिकंटकः, व्यथित करितें जेणें तो. क्र. कदिधा. गतिअ. कांटा. अ. पु. न. २ सुईचें अग्र ३ लहान शत्रु ४ रोमांच अ. पु.

**कंटकफल**: कंटकाः फलेयस्य सः कंटकफलः, कंटक आहेत फलाचे ठायीं ज्याचे तो. फणसाचें झाड. अ. पु.

**कंटकारिका** कंटकानियर्तीतिकंटकारा सैव कंटकारिका, कंटकाप्रत स्वीकारितें जी ती कंटकारा तीच कंटकारिका. क्र. ऋधा. गतिअ. रिंगणीचें झाड. आ. स्त्री.

**कंटकिफल**: कंटकाः संत्यस्येति कंटकि कंटकि फलं यस्य सः कंटकिफलः, कंटकयुक्त आहे फल ज्याचें तो. स. फणसाचा वृक्ष. अ. पु.

**कंटोलवीणा** कंटोलस्य वीणा कंटोलवीणा, चांडालाची जी वीणा ती. स. अंत्यजाची वीणा, किंनरी. आ. स्त्रीलिंगी.

**कंठ**: कणतीति कंठः, शब्द कर्ता जो तो. क्र. कणधा. शब्द अ. ग्रीवाग्र भाग, नरडी. अ. पु.

**कंठभूषा** कंठस्य भूषा कंठभूषा, कंठाचा जो अलंकार ती. स. ग्रीवा

भरण, गळ्याचें भूषण. आ. स्त्री.

**कंडुः** कंडूयतीति कंडूः, अंग घर्षण करणारा जी ती. कृ. कंडूञ्धा. गात्र विघर्षणअ. खरवी खरूज ऊ. स्त्री.

**कंडूया** विग्रहादि सर्व कंडूश प्रमाणें. आबं. स्त्री.

**कंडूरा** कंडूं रातीति कंडूरा, कंडूतें देत्ये जी ती. कृ. राधा. दानअ. ज्यास कुवली कुहिरी असें ह्मणतात ती. आबं. स्त्री.

**कंडोलः** कंड्यते इति कंडोलः, भेदन पावतो अथवा विणला जातो जो तो. कृ. कडिधा. भेदनअ. वेळू मामा यांच्या बेळानीं केलेलें पात्र. ह्म. पांटी, कणिंग इत्यादि. अ. पु.

**कंडोलवीणा** विग्रहादि सर्व कंडोल वीणा शब्दा प्र.

**कत्तृणं** कुत्सितं तृणं कत्तृणं, कुत्सित असें जें तृण तें. स. तृणविशेष ज्यास गंजाण, रोहिस गवत असें ह्मणतात तें. अ. न.

**कथा** कथयति काव्यमिति कथा, काव्यातें कथन करित्ये जी ती. कृ. कथधा. वाक्यप्रबंधअ. कादंबर्यादि ग्रंथ. आ. स्त्री.

**कंथा** कम्यत इति कंथा, हिमकालीं इच्छिजेत्ये जी ती. कृ. कमुधा. कांतिअ. प्रावरणविशेष, गोदडी २ मातीची भिंत. आबं. स्त्री.

**कदध्वा** कुत्सितोध्वा कदध्वा, कुत्सित जो मार्ग तो. स. दुर्मार्ग ह्म. वाईट रस्ता. न. पु.

**कदंबः** कंदत इति कदंबः, व्यथित करितो जो तो. कृ. कदिधा. वैक्लव्यअ. कळंबाचें झाड. अ. पु.

**कदंबकः** कुत्सितं अंबते कदंबः, कंदयतीति वा कंदंबः स एव कदंबकः, कुत्सित ह्म. वाईट शब्द करितो अथवा भक्षण द्वारा रडवितो जो तो. कृ. अबिधा. शब्दअ. कदिधा. रोदनअ. समूह. अ. न. २ शिरस नावाचें धान्य. अ. पु.

**कदरः** दृणातीति दरः, कस्य जलस्य दरः कदरः, विदारण करितो जो तो दर जलाचा जो दर ह्म. विदारक तो. स. पांढऱ्या खैराचें झाड अका. पु.

**कदर्यः** कुत्सितार्यः स्वामी कदर्यः, कुत्सित जो स्वामी तो ह्म. धर्म न करितां व आपण न भोगितां पुत्र स्त्रि

या इत्यादि कुटुंबाचें यथास्थित पोषण न करितां जो लोभानें द्रव्यसंचय करितो तो. कृपण वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कदल**: कंदते कंद्यते वा कदलः, सौंदर्यादि गुणानें अवलोकन करणारांस आव्हान करितो अथवा करिजे त्येजीती. कृ. कदिधा. आव्हानादि अ. कदली झा. केळ. आंबं. स्त्री.

**कदली** कंदलतीति कदली, उदकाचा गर्भी पुष्ट होत्येजी ती. कृ. दलधा. विशरण अ. केळ. २ हरिणविशेष. ई. स्त्री.

**कदाचित्** कदा च चिञ्च अनयोः समाहारः कदाचित्, कदार्थ व चिदर्थांचा जो समाहार तो. स. कोणेक काळीं, केव्हांतरीं त्या अर्थी अव्य. उ. स्मृतिः कदाचिद्भवति

**कदुष्णं** ईषदुष्णं कदुष्णं, किंचित् उष्ण जें तें. स. किंचित् उष्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कद्रु**: कदतीति कद्रुः, शोभनत्वें करून आव्हान करितो स. लोकांची चित्तवृत्ति आकर्षण करितो — अथवा करित्ये जीती. कृ. कदिधा. आव्हान रोदन अ. पिंगटवर्ण, पिंगट रंगाचा. उ. पु. स्त्री. न. को. देवमाता. उ. स्त्री.

**कद्वद**: कुत्सितं वदतीति कद्वदः, कुत्सित बोलतो जो तो. कृ. वदधा. व्यक्त वाणी अ. कुत्सित भाषण करणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कनकं** कनतीति कनकं, दीप्तिमत् होतें जें तें. कृ. कनीधा. दीप्ति अ. सुवर्ण झा. सोनें. अ. न.

**कनकाध्यक्षः** कनकस्य अध्यक्षः, सुवर्णाचा जो अध्यक्ष झा. स्वामी तो. स. सुवर्णाचा मालक. अ. पु.

**कनकाव्हयः** कनकस्य आव्हयो यस्य स कनकाव्हयः, सुवर्णाचें आव्हे नाम जास तो. स. धुतऱ्याचें झाड. अ. पुल्लिंगीं.

**कनकालुका** कनकस्य आलुः कनकालुः सैव कनकालुका, सुवर्णाची जी झारी ती. त. सुवर्णपात्रविशेष. आ. स्त्री.

**कनिष्ठः** अतिशयेन कनीयान् अल्पः कनिष्ठः अतिशयेन युवा अल्पः कनिष्ठो वा, अतिशयें करून जो लहान

अथवा अतिशयेंकरून जो तरुण तो. त. अ. पु. २ वि. अ. पु. न. आ. स्त्रीलिंगीं.

**कनिष्ठा** अस्यल्पाकनिष्ठा, अत्यंतजी अल्पा ह्म. लहान ती. त. कनिष्ठांगुली. आ. स्त्री.

**कनीनिका** कनतीतिकनीनिका, देदीप्यमान होणारी जी ती. कृ. कनीधा. दीप्तिअ. नेत्रमध्यगत कृष्णामंडल ह्म. डोळ्यांतील बाहुली. आ. स्त्री.

**कनीयः** विग्रहादिसर्व अल्पिष्ठशब्दाप्रमाणें. वि. स. पु. न. ई. स्त्री.

**कंदः** कंदतिकंद्यतेवाकंदः, रोदन किंवा पुष्टि अथवा आव्हान करितो जो तो. कृ. कदिधा. आव्हानअ. स्मरण. २ कमळिणीचा कांदा. अ. पु. न. ३ मेघ. अ. पु.

**कंदरः** कंजलंतेनदीर्यतइतिकंदरः, जलानें विदीर्ण होते जी ती. कृ. दृधा. विदारणअ. कृत्रिमगुहा पर्वताचे ठायीं केलेली गुहा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कंदराल:** कंदरांलातीतिकंदरालः गुहेतें ग्रहण करितो जो तो. कृ. लाधा. आदानअ. पर्वतावर झालेला अक्रोड वृक्ष, डोंगरी अक्रोडाचें झाड. गजहंड ह्म. लारवी पिंपरी. अ. पु.

**कंदर्पः** कुत्सितोदर्पोयस्यसः कंदर्पः, कुत्सित आहे गर्व ज्याचा तो. स. काम ह्म. मदन. अ. पु.

**कंदली** कंदतेइतिकंदली, उत्कृष्ट शब्द करित्ये जी ती. कृ. कदिधा. आव्हानअ. हरिणविशेष. ई. स्त्री.

**कंदुः** स्कंदतीतिकंदुः, शोषण करित्ये जी ती. कृ. स्कंदिर्धा. गतिशोषणअ. मद्य निर्माण करण्यास उपयोगी पात्र ज्यास भाटी असें ह्मणतात ती. उ. पु. स्त्री.

**कंदुकः** कंददातीतिकंदुकः, स्मरदेणारा जो तो. कृ. डुदाञ्धा. दानअ. खेळण्याचा चेंडु गिरदी ह्या अर्थी कोणी ह्मणतात. अ. पु.

**कंधरा** कंधारयतीतिकंधरा, मस्तकातें धारण करणारी जी ती. कृ. धृञ्धा. धारणअ. ग्रीवा, मान. आ. स्त्री.

**कन्या** कनतीतिकन्या, दीप्तिमती जी ती. कृ. कनीधा. दीप्तिअ. कन्याराशि. २ कुमारिका ह्म. आठ वर्षांचे आंतील मुलगी. आ. स्त्री.

**कपर्दः** केमूर्ध्नि परइव आच्छादकः

कपटः, अस्तकाचे आच्छादक वस्त्रा प्रमाणें जो तो. स. कृत्रिम. अ. पु. न.

**कपर्दः** केनसुखेनपरंप्रति अभिमतं ददातीतिकपर्दः, सुखानें अन्याप्रत इच्छित देतो जो तो. कृ. डुदाञ्धा. दान अ. सांबाचा जटाजूट. अ. पु.

**कपर्दी** कपर्दोस्यास्तीतिकपर्दी, जटाजूट आहे जास तो. त. महादेव. इन्. पु.

**कपाटं** कंवातंशिरोवापाटयति तत्कपाटं, वायूप्रति अथवा मस्तकाप्रत गमन करितें ह्म. अवरोध आणिभेदन करितें जें तें. कृ. पटधा. गति अ. कवाड, दार. अ. न.

**कपालः** कंपतेइतिकपालः, चंचल होणारा जो तो. कृ. कपिधा. चलन अ. कपाळ. अ. पु. न.

**कपालभृत्** कपालंबिभर्तीतिकपालभृत्, नरकपालधारण करितो जो तो. कृ. डुभृञ्धा. धारणादि अ. महादेव. त्. पु.

**कपिः** कंपतेइतिकपिः, आपल्यानें गमन करितो जो तो. कृ. कपिधा. चलन अ. इ. पु.

**कपिकच्छुः** कपीनांकच्छुः कपिकच्छुः, वानरांची जी कच्छु ह्म. त्यांस कंडू देणारी. स. अर्थ कंडु शब्दाप्रमाणें. उ. स्त्री.

**कपित्थः** कपयस्तिष्ठंत्यत्र कपित्थः, वानर राहातात हे त ज्याचे ठायीं तो. कृ. ष्ठाधा. गतिनिवर्तन अ. कवठीचें झाड. अ. पु.

**कपिलः** कपिसदृशंवर्णंलातीतिकपिलः, कपि ह्म. वानर तत्तुल्य वर्णातें ग्रहण करितो जो तो. कृ. लाधा. आदान अ. पिंगट वर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कपिला** काम्यतइतिकपिला, कपिवर्णोस्यस्याः कपिला, इच्छिजेते जीती अथवा कपिल आहे वर्ण जीचा ती. कृ. कमुधा. कांति अ. आग्नेयदिशेचा पुंडूक नामक गजाची स्त्री २ सुवासिक द्रव्य विशेष. जास रेणुकबीज असें ह्मणतात ती. ३ शिसव्याचा वृक्ष. आ. स्त्री.

**कपिवल्ली** कपिरिव वल्ली कपिवल्ली, कपीवर्ण जी वल्ली ती. स. गजपिंपळी. ई. स्त्री.

**कपिशः** कपिवर्णोस्यास्तीतिकपिशः, वानरासारखा आहे वर्ण जास

तो. त. कृष्णामिश्रितलोहितवर्ण; कांहीं काळा व तांबडा. वि. आ. पु. न. आबंत. स्त्रीलिंगीं.

**कपीतनः** तनोतीतितननः कपीनांई तनः कपेर्वर्णोस्यवाईतननः कपीतनः, विस्तार करितो जो तो तन वानरांचा किंवा वानर वर्णाची जी शोभा ह्मणवि स्तार तो. आंब्याचें झाड २ लाखी पिंपरी ३ शिसव्याचें झाड. अ. पु.

**कपूयः** विग्रहादिसर्व कुपूयश. प.

**कपोतः** कः वायुः पोतो नौरिव यस्य कपोतः, वायू आहे नौके सारिखा ज्या स तो. स. पारवा २ खबुतर पक्षी. अ. पु.

**कपोतपालिका** पालयतीतिपा लिका कपोतानांपालिका कपोतपा लिका, पालन करित्ये जी पालिका कपोतपक्ष्यांची जी पालिका ती. स. पक्षि पाळण्या करितां केलेलें घर. आबं. स्त्री.

**कपोतांघ्रिः** कपोतस्यअंघ्रिरिव कपोतांघ्रिः, कपोत ह्म. कवडाल्या चे अंघ्रि प्रमाणें दिसत्ये जी ती. स. सुवासिक द्रव्य विशेष ज्यास पवारी असें ह्मणतात ती. इ. स्त्री.

**कपोलः** कंपतेइतिकपोलः, कंपाय मान होतो जो तो. कृ. कपिधा. चलन अ. गाल. अ. पु.

**कफः** केनजलेनफलतिकफः, उद कानें उत्पन्न होणारा जो तो. कृ. फल धा. निष्पत्ति अ. रक्तविकार विशेष कफ. अ. पु.

**कफणिः** केनसुखेनफणातीतिकफ णिः, सुखानें राहतो जो तो. कृ. फ णधा. गति अ. कोंपर. इ. पु.

**कफी** कफोस्त्यस्यकफी, कफ आहे जास तो. स. ज्यास कफ झाला तो. वि. इन्. पु. न. ई. स्त्री.

**कफोणिः** कंसुखंस्फोरयतीति क फोणिः, सुखानें स्फुरद्रूप करणारा जो तो. कृ. स्फुरधा. स्फुरणअ. अ र्थ कफणिशब्दाचा. इ. पु.

**कबंधः** कंमुखंबध्नातिबध्यतेस्मात् इतिवा कबंधं, सुखातें बंधन करितें अथवा मस्तक छेदन होतें जा पासू न तो. कृ. बधधा. बंधन अ. जल. पाणी. अ. न. २ मस्तकहीन व क्रि यायुक्त शरीर ज्यास धड असें ह्म पातात तें. अ. पु. न.

**कबरी** कूयतेइतिकबरी. कुरकुरश

द्ध करणारीजीती. कृ.डुकृञ्.धा.
शब्दअ. केशबंधरचना, कुचडा.
२शाक विशेषज्यास कानफोडी,
तिळवणी असें ह्मणतात ती. ई.स्त्री

**कमठः** केजलेमठतीतिकमठः, ज-
लामध्यें वास करितोजो तो. कृ.म
ठधा. निवासअ. कांसव. २पात्रवि
शेष, तंबूइत्यादि. अ.पु.

**कमठी** कमठस्यस्त्रीकमठी, कमठा
चीजीस्त्री. स्त्रीप्र. कांसवीण.ई.स्त्री

**कमंडलुः** कस्यजलस्यमंडंसारंल
भतेइतिकमंडलुः, जलाचा सारांश
पावणारा जो तो. कृ.डुलभष्धा.
प्राप्तिअ. बैरागी, सन्याशी इत्या
दिक व्रतीजे त्यांचें पात्र.उ.पु.

**कमनः** विग्रहादिसर्वकामुकश.प्र.

**कमलः** काम्यतेइतिकंजलमलति
वाकमलं, इच्छिजेतें जें तें. किंवा
जलातें भूषित करितें जें तें. कृ.
कमुधा. कांतिअ. २अलधा. भूष
णअ. कमळ. अ.पु.न.

**कमला** कमलमस्याअस्तीतिकम
ला, कमल आहे भूषणार्थ हातींजी
स्या ती. त. लक्ष्मी. आ.स्त्री.

**कमलोद्भवः** कमलादुद्भवोयस्यसः
कमलोद्भवः, कमलापासून आहेउ
त्पत्तिजीची जाची तो. स. ब्रह्मदेव.अ.पु.

**कमलासनः** कमलमासनंयस्यसः
कमलासनः, कमल आहे आसनजा
चें तो.स. ब्रह्मदेव. २आसनविशेष.
अकारां.पु.

**कमलोत्तरं** कमलादुत्तरंकमलोत्त
रं, कमलाहून जें श्रेष्ठ तें. स. कुसुंबा.
अका. नपुं.

**कमिता** विग्रहादिसर्व कामुकशब्दा
प्रमाणें. वि.ऋ.पु.न.ई.स्त्री.

**कंपः** कंपनंकंपः, कांपणें जें तो. कृ.
कपिधा.चलनअ. कांपणारा.अ.पु.

**कंपनं** कंपनशीलंकंपनं, कंपनशील
जें तें. कृ.कपिधा.चलनअ. कांपणें.
अ.न. २कांपणारा.वि.अ.पु.न.आ.स्त्री.

**कंप्रं** विग्रहादिसर्व कंपनश.प्र.

**कंबलः** कम्यतेइतिकंबलः, इच्छि
जेतोजो तो. कृ. कमुधा. कांतिअ. कां
बळें. २पांघुरण्याचें वस्त्र ३ रास्ना
गजराज. अ.पु.

**कंबिः कंबी** इत्यादिकंबलशब्दा
प्रमाणें. पळी. इ.स्त्री. २ई.स्त्री.

**कंबुः** काम्यतेइतिकंबुः, इच्छितोजो
तो. कृ. कमुधा. कांतिअ. शंख.उ.पु.

न २ प्रकोष्ठभूषण, कांकण, पोंची इत्यादि ३ ग्रीवा स्त्र. मान. उ. पु.

**कंबुग्रीवा** कंबुःशंखइवग्रीवाकंबु ग्रीवा, शंखासारखी जी ग्रीवा स्त्र. मा न ती. स. तीनरेषाज्या मानेवर आहे त ती मान. आ. स्त्री.

**कर्म्म:** विग्रहादिकामुक श. प्र.

**कर:** कीर्यतेइतिकरः, देइ जेतोकिं वा प्रसार पावतोजोतो. क्रु. कुधा. वि क्षेपअ. किरण २ हात ३ राजग्राह्य भाग, हस्त. अ. पु.

**करक:** करोतीतिकरकः करोतिदोषा भावमितिवा, कठिन किंवा दोष ना शक जो तो. क्रु. कृञ्धा. करणअ. कठिनोदक, गार. अ. पु. आ. स्त्री. २ कमंडलु ३ डाळिंबीचें झाड. अ. पु.

**करकट:** कृणातीतिकरः कटतीति कटः करश्चासौकटश्च करकटः, हिं सक असा जो अंगावरण कर्ता तो. क्रु. कटेधा. आवरणादिकअ. कुर ली. अ. पु.

**करज:** करजमिवनखमिवकर जः कंसुखंजलंवारंजयतीति करजः नखाप्रमाणें जें तें. किंवा स्वमिअणा नें उदकानें किंवा सुखानें रंजितस्त्र. सुशोभित करितोजो. क्रु. रंजधा. रागअ. वाघनख २ करवंजाचें झा ड. अ. पु.

**करंजक:** करंजयतीतिकरंजः, स एव करंजकः, हस्तातें रंजवितोजो तो. इत्यादिकरंजश. प. करवंजा चें झाड. अ. पु.

**करट:** काकाइतिरटति करोतिशकु नमितिवा करटः, काकाया प्रका रें करून शब्द करितो अथवा शकु न करणाराजोतो. क्रु. डुकृञ्धा. क रणअ. काकपक्षि स्त्र. कावळा २ हत्तीचें गंडस्थळ. को. कुसंबा. लिं ग्य जीवन. अकरावेचें श्राद्ध. वाद्य विशेष. अ. पु.

**करटु:** केरेटयतीतिकरटुः, सुखा विषयीं शब्द करितो जो तो. क्रु. र टृधा. परिभाषणअ. कंकरेटपक्षि. उका. पु.

**करणं:** क्रियतेअनेनेतिकिरतीति वाकरणं:, कार्योत्पत्ति करिजेत्येजे णें अथवा टाकिजेतें जें तें. क्रु. कर णअविक्षेपअ. साधकतम, कार्य सिद्धि सउत्कृष्ट हेतु २ शेत ३ शरी र ४ इंद्रिय. अ. न. शूद्रजातीयस्त्री

चेठाचीं वेश्यापासून उत्पन्न जो पुत्र तो. याची वृत्तिलेखनपु कोऽकारण. अंत बंध. नर्तनविशेष. कायस्थ वानर. अ.न.

**करंडः** क्रियतइतिकरंडः. करिजे तो जो तो. कृ. डुकृञ्धा. करणअ. पात्रविशेष. अ. पु.

**करतोया** करस्यशंकरस्यहस्तस्य तोयंनदत्स्यस्याइतिकरतोया, शंकर हस्त संबंधी आहे उदक जीचें ती. न. नदीविशेष. ही नदी पार्वतीच्या विवाहामध्यें जें कन्यादानोदक हातावर घातलें त्यापासून झाली असें पुराणांत आहे. आ. स्त्री.

**करपत्रं** करेणपततीतिकरपत्रं, हस्तें करून काष्ठाचे ठायीं पडतें जें तें. कृ. पत्लृधा. गतिअ. लांकूड चिरण्याचें एक शस्त्र ज्यास करवत असें ह्मणतात तें. अ. न.

**करपालः** करंपालयतीतिकरपालः, हस्तरक्षण करणारा जो तो. कृ. पाधा. रक्षणअ. खड्ग, तरवार. अ. पु.

**करपालिका** करंपालयतीतिकरपालिका, हस्तरक्षण करणारी जी ती. कृ. पाधा. रक्षणअ. तरवारी सारिखें शस्त्र. खंडा, गुप्ती इत्यादि. आ. स्त्री.

**करवालः** करेणवलतेकरवालः, हस्तानें जीवन पावणारा जो तो. कृ. वलधा. संवरणअ. अर्थादिकरपाल शब्दा प्रमाणें.

**करवालिका** करंवलतेकरवालिका, हस्तानें पीडा करणारी जी ती. कृ. वलधा. संवरणअ. अर्थादिकरपालिका श. प्र.

**करभः** किरत्यनेनकरभः, ज्याचा योगानें विक्षेप करितो जो तो. हत्तीचा छावा २ उंटाचा छावा ३ मणकटापासून कनिष्ठिके पर्यंत हाताचा मांसल भाग. अ. पु.

**करभूषणं** करंभूषयतीतिकरभूषणं, हस्तातें अलंकृत करणारें जें तें. कृ. भूषधा. अलंकारअ. कांकण. अ. न.

**करमर्दकः** करःशाखामर्दकोयस्यसकरमर्दकः, कर आहे मर्दक ज्याचा तो. स. करवंदाचें झाड. अ. पु.

**करंबः** केनजलेनरंबतेइतिकरंबः, जलें करून शब्द करणारा जो

तो. कृ. रबिधा. शब्दअ. दधियुक्त भ्रष्टयवचूर्ण ह्म. दधिपीठ. अ. पु.

**करंभः** केनरभ्यतेमिश्रीक्रियतेइतिकरंभः, जलेंकरून मिश्र करिजे तो जो तो. कृ. रभधा. राभस्यअ. अर्थादि करंबकशब्दाप्रमाणें.

**कररुहः** करेरोहतीतिकररुहः, हस्ताचेठायीं उत्पन्न होणारा जो तो. कृ. रुहधा. प्रादुर्भावादिअ. नख. अकारांत. पुल्लिं.

**करवीरः** करंवीरयतीतिकरवीरः हस्तातें वीरकरितोजो तो. कृ. वीरधा. विक्रांतिअ. कण्हेरीचें झाड. अकां. पु.

**करशाखा** करस्यशाखेवशाखा करशाखा, हस्ताला शाखे सारखी जी ती. स. अंगुली ह्म. बोट. आ. स्त्रीलिंगी.

**करशीकरः** करस्यशीकरः करशीकरः, कर ह्म. शुंडादंड तत्संबंधीं जो तुषार तो. हत्तीच्या सोंडेंतून निघालेला तुषार. अ. पु.

**करहाटः** करंहाटयतीतिकरहाटः हस्तातें देदीप्यमान करितो-जोतो. कृ. हटधा. दीप्तिअ. कमलिनीचा कांदा. अ. पु.

**करहाटकः** करंहाटयतीतिकरहाटः सएवकरहाटकः, हस्तातें दीप्तिमान करितो जो तो. करहाट तोच करहाटक. त. गेळ्याचें झाड. अ. पु.

**करालः** करेणालातिकरमलतिवा करालः, करानें ग्रहण करितो किंवा करातें भूषित करितोजो तो. कृ. लाधा. आदानअ. २ अलधा. भूषणादिअ. भयंकर २ दंताळ ३ उंच वि. अ. पु. न. आ. स्त्री. को. सायल्याचें तेल. अ. पु. काळी बाभुळ. अ. न.

**करिणी** करोस्यस्याः करिणी, शुंडा आहे जीस ती. त. हत्तीण ई. स्त्री.

**करिन्** करोस्यास्तीतिकरी, शुंडादंड आहे ज्यास तो. त. हत्ती. इ. पु.

**करिगर्जितं** करीणांगर्जितंकरिगर्जितं, हत्तीचें जें गर्जन तें. स. हत्तीचा शब्द. अ. न.

**करिपिप्पली** करीवबृहत्वात्पिप्पलीकरिपिप्पली, विशालत्वास्तव करीसारखी जी पिप्पली ती. स. गजपिंपळी. ई. स्त्री.

**करिशावकः** करिणः शावकः क

रिशावकः, हस्तीचा जो छावा तो. स. हत्तीचा छावा ह्म. बालक. अ. पु

**करीरः** कृणाति किरति कीर्यते वा करिणं इरयतीति वा करीरः पीडा करितो विक्षेप करितो अथवा करिजे तो किंवा गजाप्रत प्रेरित करितो जो तो. कृ. कृधा. हिंसादि अ. २ ई रधा. गति. अ. कारदाचें झाड. अ. पु २ वेळूचा कोंब. अ. न. ३ घट. अ. पु.

**करीषः** कीर्यते इति करीषः, टाकिजें तो जो तो. कृ. कृधा. विक्षेप अ. सुकलेलें शेण ह्म. गोंवरी अ. पु. न.

**करुणः** करुणावान् करुणा अस्य स्येति करुणः, करुणा आहे ज्यास तो. त. रसांतील एक भेद. अ. पु.

**करुणा** करुणं करुणा, कारुण्य करणें जें तें. कृ. कृञ्धा. करणअ. कृपा २ करुणा रस. आ. स्त्री.

**करेटुः** केरेटतीति करेटुः, जलाचे ठायीं शब्द करणारा जो तो. कृ. रेट् आ. परिभाषण अ. कं करेट पक्षि ह्म. करढोक पक्षि. उ. पु.

**करोटिः** कं वायुं रोटतीति करोटिः, वायूचा प्रतीघात करणारी जी ती. कृ. रुटधा. प्रतीघात अ. मस्तकांतील हाड. इ. स्त्री.

**कर्कटः कर्कडः** कर्कं श्वेतवर्णं टलतीति कर्कटः डः, श्वेतवर्णातें ह्म. शुभ्रवर्ण जो त्यातें धारण करितो जो तो. कृ. टलधा. गति अ. कर्कराशि २ कुरलें. अ. पु.

**कर्कटकः** कृणातीति कर् कटतीति कटः कर् चासौ कटश्च कर्कटः स एव कर्कटकः, हिंसा करणारा असा जो लपून राहणारा तो कर्कट तोच कर्कटक. स. कुरलें. अ. पु.

**कर्कटी** करं कटतीति कर्कटी, भेदन काली करकर अशा शब्दातें करित्ये जी ती. कृ. कटेधा. वर्षावरणादि अ. कांकडी. ई. स्त्री.

**कर्कंधुः कर्कंधूः** कंटकं दधातीति कर्कंधुः कर्कंधूः, कंटक समुदायातें धारण करित्ये जी ती. कृ. डुधाञ्धा. धारणादिक अ. बोरीचें झाड. उ. २ ऊ. स्त्री.

**कर्करी** कर्कनं कर्कः कर्कं रातीति कर्करी, तंदुलादिकांस शुभ्र वर्णातें देत्ये जी ती. कृ. राधा. दान अ. तांदूळ धुण्याची रोवळी. ई. स्त्री.

**कर्करेटुः** कर्कं रेटतीति कर्करेटुः,

कर्कराशिप्रत सूर्य गेला ह्म. उत्साह्यानें भाषण करणारा जो तो. कृ. रेट्धा. परिभाषणअ. करदोकपक्षि. उ. पु.

**कर्कशं** कृणातीतिकर् कशतीतिकशः करश्चासौकशश्च कर्कशः, हिंसक असा जो हिंसा करणारा ह्म. वारंवार हिंसा करणारा तो. स. कठिण. अ. पु. न. आ. स्त्री. शुंडारोचनीवनौषधि अ. पु.

**कर्कारुः** कर्कंशुक्लवर्णंऋच्छतीति कर्कारुः, शुक्लवर्णातें धारण करितो जो तो. कृ. ऋच्छधा. गतिअ. कोहळा. उ. पु.

**कर्चूरः** कर्वतीतिकर्चूरः, दर्पितः जो तो अथवा दर्पित करितें जें तें. कृ. कर्वधा. दर्पादिअ. आंबेहळद ह्म. कापूरकाचरी. अ. पु. २सोनें. पु. न.

**कर्चूरकः** कर्जतीतिकर्चूरः कर्चूरएवकर्चूरकः, पीडा करितो जो तो कर्चूर तोचकर्चूरक त. कचरनावाची वनौषधि. अ. पु.

**कर्णः** कीर्यतेशब्दग्रहणायक्षिप्यतेइतिकर्णः, शब्दग्रहणार्थ योजिजेतो जो तो. कृ. कृधा. विक्षेपअ. कान. २सूर्याचा पुत्र. अ. पु.

**कर्णजलौकाः** कर्णजलौकाः कर्णस्यजलूकेवकर्णजलौकाः, कर्णाला जी जळू सारखी ती. स. घोण गम वळाजी. स. पु. २आ. स्त्री.

**कर्णधारः** कर्णमरित्रंधरतीति कर्णधारः, अरित्र ह्म. सुकाणू जें त्यातें धारण करितो जो तो. कृ. धृञ्धा. धारणअ. सुकाणू धरणारा नावाडी. अ. पु.

**कर्णवेष्टनं** वेष्ट्यतेनेनवेष्टनं कर्णस्यवेष्टनं कर्णवेष्टनं, वेष्टितं होतो जेणें असें कर्णाचें वेष्टन ह्म. कर्णभूषण ह्म. कुंडल. अ. न.

**कर्णिका** कर्णस्य अलंकरणं कर्णिका, कर्णाचें जें भूषण ती. स. कर्णाचें भूषण ह्म. तानवड २हत्तीच्या सोंडेचा अग्रभाग ३कमलांतील कोश. आ. स्त्री.

**कर्णिकारः** कर्णिकामिच्छतिकर्णिकारः, कर्णिकेप्रत स्वीकार करितो जो तो. कृ. ऋधा. पांगाऱ्याचावृक्ष. अ. पु.

**कर्णीरथः** कर्णीचासौरथश्चकर्णीरथः उक्ष्ण तान्ह जो रथ तो स. स्त्रियांस बसण्या करितां वस्त्रा

दिकानें आच्छादित केलेला रथ अका. पु.

**कर्णेजपः** कर्णेजपतीतिकर्णेजपः, कर्णांचेठायीं बोलणाराजो तो. कृ. जपधा. व्यक्तवाणीअ. कानांत दुसऱ्याची निंदा करणारा अथवा विसरलेली गोष्ट कानांत सूचविणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कर्तरी** कृंततीतिकर्तरी, छेदन कर्त्येंजीती. कृ. कृतीधा. छेदन अ. कातर. ई. स्त्री.

**कर्दमः** कर्दयतीतिकर्दमः, कुत्सित शब्दास जो करितोतो कृ. कर्दधा. कुत्सित शब्द अ. चिखल. अ. पु.

**कर्पटः** कृणातीतिकर् कर्चासोपटश्चकर्पटः, प्रस्वेदादि मार्जन करणाराजो पट तो. स. फडकें २स्थान. अ. पु.

**कर्परः** कल्पतेइतिकर्परः, सामर्थ्यकरणाराजो तो. कृ. कृपूधा. सामर्थ्य अ. शिरोगत अस्थिखंड, कपाळ. अ. पु.

**कर्परी** कल्पतेइतिकर्परी, सामर्थ्यविशिष्टजी ती. कृ. कृपूधा. सामर्थ्य अ. अपकारशक्ति देणारें असें मोरचूत. ई. स्त्री.

**कर्पूरं** किरतीतिकर्पूर्यतइति पूरः करूचासोपूरश्चकर्पूरः, कर् ह्म. धात्यानें प्रसार पावणारा असा जो पूर ह्म. घट्ट झालेली किंवा जमलेली वटिका ती. स. कापूर. अ. पु. न.

**कर्बरः** कर्बतीतिकर्बरः, हिंसा करितो जो तो. कृ. कर्बधा. हिंसादि अ. राक्षस. अ. पु.

**कर्बुरः** विग्रहादिसर्व कर्बर शब्दाप्रमाणें. राक्षस. अ. पु. २चित्रवर्ण वि. अ. पु. न. आ. स्त्री. ३ आंबेहळद. अ. पु. ४ सोनें. अ. न.

**कर्बूरं** कर्बत्यनेनकर्बूरं, गर्व करितो जेणें करून तें. कृ. कर्बधा. दर्प अ. आंबेहळद. २ सोनें. अ. पु.

**कर्बूरकः** कर्बत्यनेनकर्बूरः सएव कर्बूरकः, मद युक्त होतो जेणें तो कर्बूर तोच कर्बूरक. त. ज्यास कचूर असें ह्मणतात तो वनस्पतिविशेष. अ. पु.

**कर्मकरः** कर्मकरोतीतिकर्मकरः, कर्मकार जो तो. कृञ् करणें. वेतनोपजीवी चाकर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कर्मकारः** कर्मकरोतीतिकर्म-

कार:, वेतन नयेतां कर्म करितो जो तो. इत्यादिपूर्वींचा शब्दाप्रमाणें. वेतन घेतल्या वांचून चाकरी करणा रा. वि. अ. पु. न. ई. स्त्री.

**कर्मक्षम:** कर्मसुक्षमः कर्मक्षम:, कर्म करण्याविषयीं जो क्षम तो. स. काम करण्यास जो समर्थ तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कर्मठ:** कर्मणिघटतेइति कर्मठ:, कर्माविषयीं व्यापार करितो जो तो. न. कर्मशूर ह्म. आरंभिलेलें काम सिद्धीस नेणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कर्मण्यभुक्** कर्मण्यंभुंक्ते कर्मणि भुक्, चाकरीचा पैशानें उपजीव न करणारा. क्र. भुजधा. पालनादिअ. न. पु.

**कर्मण्या** कर्मणासंपद्यत कर्मण्या, क्रियें करून संपादिजेत्ये जी नी. त. चाकरीचा पैसा. आ. स्त्री.

**कर्मंदी** कर्मंदेन प्रोक्तं भिक्षुसूत्र मधीते कर्मंदी, कर्मंदऋषीनें प्रो क्त भिक्षुसूत्रातें अध्ययन करणा रा जो तो. त. सन्याशी. इ. पु.

**कर्मशील:** विग्रहादि सर्व कार्म शब्दाप्रमाणें.

**कर्मशूर:** कर्मणिशूरः कर्मशूर:, कर्माविषयीं जो शूर तो. स. अर्थादि सर्व कर्मठ शब्दाप्र.

**कर्मवृत्तं** कर्मणिवृत्तं कर्मवृत्तं, क र्माविषयीं जें वृत्त तें. स. अपादान ह्म. कर्मसंबंधीं जें बंद्यादिकांचें गायन तें. अ. न.

**कर्मसचिव:** कर्मसुसचिवः क र्मसचिव:, कर्माचेठायीं जो सचि व ह्म. सहाय तो. स. बुद्धिसचिवा हून निराळा कर्मोपयुक्त सचीव जो तो. अ. पु.

**कर्मार:** कर्मक्रियामृच्छतीतिक र्मार:, नानाविध क्रियेप्रत गम न करितो ह्म. तदुपयोगी जो तो. क्र. ऋच्छधा. गमनअ. वेळ. अ. पु.

**कर्मीर:** किरतीतिकर्मीर:, शो भातिशयाचा प्रक्षेप करितो ह्म. देतो जो तो. क्र. कृधा. विक्षेपअ. चित्रवर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कर्मेंद्रियं** कर्मसाधकमिंद्रियंक र्मेंद्रियं, कर्माचें साधक ह्म. संपा दक जें इंद्रिय तें. स. हात पाय गु द उपस्थ वाणी त्या प्रत्येकाचें ना व. अ. न.

**कर्ष:** कर्षतीतिकर्ष:, उन्मानोप योगी जो तो. क्र. कृषिधा. विलेख

नअ. पांच गुंजांचा एक मासा अशा सोळा माशांचा जो तो यास तोळा असें हि ह्मणतात. अ. पु. न

**कर्षकः** कर्षतीतिकर्षकः, भूमि विलेखन करणारा जो तो. इत्यादिपूर्वीचा श. प्र. कृषिकर्मकरणारा. अ. पु.

**कर्षणिः** कर्षतिमनः कर्षणिः, पुरुषाच्या मनाचें कर्षण ह्म. आकर्षण करित्ये जी ती. कृ. कृषधा. विलेखन अ. व्यभिचारिणी स्त्री. ईका. स्त्री.

**कर्षफलं** कर्षतीतिकर्षः, कर्षफलंयस्यसः कर्षफलः, कफादिकांचें नाशक आहे फल ज्याचें तें. स. बेहडयाचा वृक्ष याच्या फळाचा त्रिफलाचूर्णांत उपयोग करितात. अ. पु.

**कर्षूः** कर्षणं कृष्यते कर्षतिवा कर्षूः कर्षण जें तें किंवा कर्षिजे तें जे अथवा विलेखन करित्ये जी ती. कृ. कृषधा. विलेखन अ. केलेली लहान नदी २ जीविका. ऊ. स्त्री. शेणीचा विस्तव. ऊ. पु.

**कलः** कडतिमाद्यत्यनेनेतिकल मंद युक्त होतो जेणेंकरून तो. कृ. कडधा. मदअ. अस्पष्टाक्षर असा मधुरशब्द. अ. पु.

**कलकलः** कलनेकलतीतिवा कलः कलादपिकलः कलकलः, शब्द करितो जो तो कल अतिशयें करून जो शब्द तो कलकल. समास हांत. कोलाहल शब्द. अ. पु.

**कलंकः** कलयतिकल, कलचासा वंकश्चकलंकः, आक्षेपकारी जें लांछन तें. स. चिन्ह २ दोषारोप ३ लोहमल ह्म. कीट अ. पुल्लिं.

**कलत्रं** गडयतिगड्यतेवा कलत्रं, निबद्ध किंवा सिक्त होतें जें तें. कृ. गडिधा. सेचनादि अ. कमर. २ विवाहित स्त्री. अ. न.

**कलधौतं** कलोमलः धौतोस्यकलधौतं, मल आहे धौत ह्म. धुतलेला ज्याचा तें. स. सोनें. २ रुपें. अ. न.

**कलंबः** कल्यतेइतिकलंबः, शत्रूवर टाकिजेतो जो तो. कृ. कलधा. क्षेपअ. बाण २ देंठ. अ. पु.

**कलभः** कलतेइतिकलभः, सुशोभित मंद गमन करितो जो तो.

कृ. कलधा. गतिअ. हत्तीचा छावा. अका. पु.

**कलंबी** केनकेलंबतेइतिकलंबी. वायूनें ध्वंस होणारी जी ती. उदकाचेठायीं स्रंसन पावत्ये जी ती. कृ. लबिधा. अवस्रंसनअ. शाकविशेष जिला कळंवी असें ह्मणतात ती. ई. स्त्रीलिं.

**कलरवः** कलः रवोयस्यकलरवः, अव्यक्त मधुर आहे शब्द जाचा तो. स. पारवा या नावाचा पक्षि. अ. पु.

**कललः** कलतेइतिकललः, शुक्रशोणितमिश्रत्वानें बुडुदाचे पूर्ववर्ति राहतें जें तें. कृ. कलधा. गत्यादि अ. शुक्र शोणिताचें मिश्री भवन. अ. पु. न.

**कलविंकः** कलंविंदतिकलविंकः अव्यक्त शब्द करितो जो तो. कृ. विदिधा. अवयव अ. चिमणी नावाचा पक्षि. अ. पु.

**कलशः** कलंश्यतीतिकलशः अव्यक्त जेसें होय तेसें शोभतो जो तो. कृ. शोधा. तनूकर अ. तांब्या. अ. पु. न

**कलशिः कलशी** कलंश्यतीतिकलशिः, कल ह्म. अजीर्ण किंवा शुक्र यातें कृश करित्ये जी ती. किंवा कल ह्म. अव्यक्तशब्द उदकपूरण समयीं करित्ये जी ती. कृ. शोधा. तनूकरणअ. डवलापिठवण यानावाची वनोषधि २ ककशी ह्म. घागर. इ. २ ई. स्त्री.

**कलसः कलसी** केनजलेनलसतीति कलसः, जलानें शोभतो तोव ती. कृ. लसधा. संश्लेषादि अ. अर्थादि कलश शब्दा प्रमाणें.

**कलहंसः** कलोमधुरवाक् हंसः कलहंसः, मधुरवाक् ह्म. सुस्वर अव्यक्त शब्द करणारा जो हंस तो. स. बदक नावाचा हंस पक्षिविशेष. अ. पु

**कलहः** कलस्यहननंकलहः, मधुरध्वनीचा जो नाशक तो. कृ. हनधा. हिंसाअ. भांडण. अ. पु.

**कला** काष्ठान्कलयतीतिकला, काष्ठांतें कलव करित्ये जी ती. कृ. कलधा. संख्यानअ. चंद्र मंडलाचा षोडशांश. २ तीस काष्ठात्मक जो काल ती एक कला ३ गीत वाद्यांतील प्रवीणता ४ अंश ५ वृद्धि. आ. स्त्री. कलनें कलतिवा कला शब्द सुख ग्रहण करवें तिलाहि कला हे नाम.

**कलाद:** कलामादत्तेइति कलाद:, स्रवर्णादिकांपासून अंशग्रहण करितो जो तो. क्रु. डुदाञ्धा. दानअ. सोनार. अ. पु.

**कलानिधि:** कलानिधीयते अत्रे तिकलानिधि:, कला ह्म. षोडश कला जात्या राहाताहेत ज्याचेठायीं तो. क्रु. धाञ्धा. धारणपोषणअ. चंद्र. इ. पु.

**कलाप:** कलामाप्नोतिआ यनेनेन वा कलाप:, कला ह्म. शोभादिप्र वीणता जी तीतें पावतो किंवा ती प्राप्त होइजेतो जेणें तो. क्रु. आप्लृ धा. व्याप्तिअ. भूषण २ मयूर पिच्छ ३ बाणाचा भाता ४ समुदाय ५ मेखला. अ. पु.

**कलाय:** कं वायुंलातीति कलाय:, वायूग्रहण ह्म. वायूचें उत्पादन करणारा जो तो. क्रु. लाधा. आदानअ. वाटाणा. अ. पु.

**कलि:** कलनंकलयतिवाकलि: क्षेपणअथवा संख्यानजें तो. किंवा दु:खानें घालविजेतो जो तो. कलयति कल्यतेवाकलि: दु:खानें पराक्रांतजो तो. क्रु. कलधा. क्षपणअ. संख्यानवा ति अ. कलह २ कलियुग. ३ युद्ध ४ शूर. अ. पु. ५ कलिका. इ. स्त्री.

**कलिका** कलयतीति कलिका, मनाचें आकलन करित्ये जी ती. क्रु. कलधा. संख्यानअ. फुलांची कळी. आ. स्त्री.

**कलिकारक:** कलिंकरोतीति कलिकार: सएव कलिकारक:, कलीतें ह्म. दु:खातें करितो जो तो कलिकार तोच कलिकारक. तरकाटेकरंजाचें झाड. अ. पु.

**कलिंग:** केमूर्ध्नि लिंगंचूडायस्य स कलिंग: कल्छतीतिवा कलिंग: मस्तकीं आहे चूडारूप चिन्ह ज्याचा तो अथवा रोग नाशाप्रत जातो ह्म. तन्निवारक जो तो. स. क्रु. गम्लृ धा. गतिअ. कुड्याची शेंग. २ मस्तकचूड यानावाचा पक्षि. अ. पु.

**कलिद्रुम:** कलेर्द्रुम: कलिद्रुम: कलि संबंधीं जो द्रुम ह्म. कलियुगींहि स्वकार्य संपादनींजोउत्तमवृक्ष तो. स. धाटिंगीचें झाड. २ बेहड्याचें झाड. अ. पु.

**कलिमारक:** कलिंमारयतीति कलिमार: सएव कलिमारक:,

कलीतें ह्म. दुःखातें पुष्ट करितो जो तो. अर्थादि कलिकारक श ब्दाप्रमाणें.

**कलिलं** कल्यतेइतिकलिलं, दुः खानें गणिजेतें ह्म. कष्टानें परि हृत करिजेतें जें तें. क्र. कलधा. श ब्दसंख्यान अ. दुरधिगम ह्म. दुःप्र वेश. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कलुषं** कल्यतेचित्रगुप्तेनगण्यते इतिकलुषं, लुषतीतिलुषं कस्यज लस्यलुषंकलुषंवा, चित्रगुप्तानें ग णिजेतें जें तें. किंवा जलनाशक जें तें. क्र. कलधा. संख्यान अ. २स पाप. अ. न. २गढूळ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कलेवरं** कलेअव्यक्तध्वनौवरंक लेवरं, अव्यक्तध्वनीविषयीं ह्म. तो करण्याविषयीं जें श्रेष्ठ तें. स. श रीर. अ. न.

**कल्कः** कल्यतेइतिकल्कः, नीच त्वें करून बोलिजेतोजो तो. क्र. क लधा. शब्दसंख्यानअ. पुरीष. २ पाप. को. तेल.तूप.कानातील मल पापाशय. अ. पु.

**कल्पः** कल्प्यंतेविरुद्धलक्षणयाक्षी यंतेअत्रेतिकल्पः, कलासुसाधुः कल्पोवा, विरुद्धलक्षणानें नाश पावतात आचेगयीं तो. अथवा क लांविषयीं जो निपुण तो. क्र. कल धा. क्षेपअ. ब्रह्मदेवाचा एक दि वस. २ विधि. ३ नीति ४ प्रलय. ५ रोगरहित. अ. पु. ६ सदृश. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कल्पना** कल्पनंकल्पना, पल्या णाद्यारोपणेंकरून हत्ती तयार क रणें किंवा वितर्क करणें जें तें. क्र. कृपूधा. सामर्थ्यअ. हत्तीवर ब सण्या करितां हत्ती सज्ज करणें. २ तर्क. आ. स्त्री.

**कल्पवृक्षः** कल्पस्यवृक्षः कल्पवृ क्षः, इच्छित पदार्थांचा देणारा जो वृक्ष तो. स. कल्पतरु. अ. पु.

**कल्पांतः** कल्पस्यअंतः कल्पांतः कल्पाचा जो अंत तो. स. प्रलय काल. अ. पु.

**कल्मषं** शुभंकर्मस्यतिसमाप्तं करोतीतिकल्मषं, शुभ कर्म न ष्ट करितें जें तें. क्र. षोधा. अंतक र्मअ. पाप. अ. न.

**कल्माषः** कलश्चासौमाषश्चक

ल्माषः, कंदरअसा जो माषव र्णतो. स. चित्रवर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कल्यं** कलयतिमंगलमितिकल्यं, मंगल देतो जो तो. कृ. कलधा. सं ख्यानअ. प्रातःकाल. अ. न. २द क्षस्य. कुशल. ३ सिद्ध ४ निरो गी. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कल्या** कलासुसाधुः कल्या, क लेचा ठायीं जी साधु ती. त. शुभ वाणी. आ. स्त्री.

**कल्याणं** कल्यंनीरुजत्वंप्रणती तिकल्याणं, नीरुजत्वातें करितें जें तें. कृ. अणधा. प्राणनअ. सु खरूपता. अ. न.

**कल्लोलः** कल्लंतेनद्यःअनेनेति कल्लोलः, अव्यक्त शब्द करिताहे त नदी जेणेंकरून तो. कृ. कल्ल धा. अव्यक्तशब्दअ. मोठीलाट. अ. पु.

**कल्हारं** कस्यजलस्यहारइवक ल्हारं जलास जें हाराप्रमाणें शो भा देणारें तें. स. कमलविशेष. अ. न.

**कवचः** कंवातंवंचयतीतिकव चः, वायु निवारण करणारा जो तो. कृ. वंचुधा. प्रलंभनअ. चिल खत. अ. पु. न.

**कवरी** वृणोतीतिवरी, कस्यसु खस्यवरी, आच्छादन करितेजी तीवरी सुखाची जी नाश कर्त्री ती. स. कानफोडी या नावाची भाजी. ई. स्त्रीलिं.

**कवलः** केनवलतेइतिकवलः, मुखानें ग्रहण केला जातो जो तो. कृ. वलधा. संवरणअ. ग्रास. अ. पु.

**कवाटं** कंवटतीतिकवाटं, वायू प्रत स्तब्ध अथवा मस्तकातें वेष्टि त स्य. स्खलित करितें जें तें. कृ. व टधा. वेष्टनअ. कपाटस्य. दार. अ. न. ई. स्त्री.

**कविः** कवतेइतिकविः, पाविप त्य करितो जो तो. कृ. कुङ्धा. श ब्दअ. पंडित. २शुक्राचार्य. इ. पु.

**कविका** कवतेइतिकाविका, कट् कट् शब्द करणारी जी ती. कृ. कु ङ्धा. शब्दअ. काडयाळी स्य. ल गाम. आ. स्त्री.

**कवियं** कवतेइतिकवियं, शब्द करितें जें तें. कृ. कुङ्धा. शब्दअ.

घोड्याच्या मुखवास बांधण्याचें सा धनजास सरोसर असें ह्मणतात तें. अ. न.

**कवोष्णं** ईषदुष्णं कवोष्णं, किंचि त् उष्ण जें तें. स. यत्किंचित् ऊन. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कव्यं** कूयते पितृभ्य इति कव्यं, पि तरांकारणें देइजे तें जें तें. क्रू. कु धा. शब्द अ. पितरांच्या तृप्त्यर्थ दिलेलें अन्नादिक. अ. न.

**कशा** कशतीति कशा, हिंसन क रिते जी ती. क्रू. कशधा. हिंसा अ. घोडे वगैरे जनावरास मारण्या ची रज्जु जिला चाबूक असें ह्म णतात ती. आ. स्त्री.

**कशार्हः** कशामर्हतीति कशार्हः, कशाघाताप्रत योग्य होतो जो तो. क्रू. अर्हधा. पूजा अ. चाबूक मा रण्यास जो योग्य तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कशिपुः** कशतीति कशिपुः, पोष ण व शीतादि निवारण करितो जो तो. क्रू. कशधा. हिंसा अ. अन्न. २ वस्त्र. उ. पु. न.

**कशेरुका** कं वायुं शृणातीति कशे रूः, कशेरु र्वासैव कशेरुका, वायू चा नाश करणारी जी ती कशेरु ती च कशेरुका. त. पाठीचा कणा. आ. स्त्रीलिं.

**कश्मलं** कशानं कश्मलं, मूर्छनजें तें. क्रू. कशधा. हिंसा अ. मूर्च्छा. अ. न.

**कश्यं** कशामर्हति कश्यते ऽनेन वा कश्यं, चाबुकास जें योग्य अथ वा ताडन करिजे तें जेणें तें. त. २ क्रू. कशधा. हिंसा अ. अश्वाचा मध्य. २ मद्य. अ. न. ३ काठीनें मारण्या स योग्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कषः** कषतीति कषः, स्वर्णादिकी णा करितो जो तो. क्रू. कषधा. हिंसा अ. कसोटीचा दगड. अ. पु.

**कषायः** कषति कंठं कषायः, कंठविकार नाश करितो जो तो. र. पू. श. प्र. तु रटरस. अ. पु. २ सुगंधि. वि. अ. पु. न. आ. स्त्री. ३ बुक्का वगैरे अंगरा ग. ४ उटणें. अ. पु. न.

**कष्टं** कष्यते ऽस्मिन् कष्टं, पीडा करिजे ली जी ती. क्रू. कषधा. हिंसा अ. श रीरपीडा. २ दुःख. अ. न. ३ दुराधि गम. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**कस्तूरी** कसति गंधो ऽस्याः कस्तू

शी, उत्तम गंध उत्पन्न होतो जी पा
सून ती. क्नू. क्नसधा. गत्यादि अनु
गमद. ई. स्त्री.

**कंसः** कम्यतइतिकंसः, इच्छिजेतो
जो तो. क्रू. कमुधा. कांतिअ. दुग्धा
दिप्राशन करण्याचें पात्र. अ. पु. न.
२दैत्य. अ. पु.

**कंसारातिः** कंसस्य अरातिः कंसा
रातिः, कंसाचा जो अराति ह्म. श
त्रु तो. स. विष्णु. इ. पु.

**कह्वः** कइतिशब्दं केजलेवाह्वयती
तिकह्वः, कयाप्रकारें करून अथवा
जलाचे ठायीं शब्द करितो जो तो. क्रू.
ह्वेञ्धा. शब्दादि अ. पक्षिविशेष अ. पु.

**काकः** कायतीतिकाकः, काकाया
प्रकारें कठोर शब्द करणारा जो तो.
क्रू. कैधा. शब्द अ. कावळा. अ. पु.

**काकचिंचा. काकचिंचिः काक**
**चिंची** काकवर्णाचिंचाकाकचिंचा,
कृष्णवर्ण अशीजी चिंच ती. स.
गुंजा. आ. २इ. ३ई. स्त्री.

**काकतिंदुकः** काकानांतिंदुकइव
काकतिंदुकः, काकांला जो तिंदुक
वृक्षासारखा प्रिय तो. स. काजरा.
जास कुचला ह्मणतात तो. अ. पु.

**काकनासिका** काकस्येवनासिका
यस्याःसा काकनासिका; काकासारि
खी आहे नासिका जीची ती. स. का
कजंघायानांवाची औषधि. जिला
कावळी ह्मणतात ती. आ. स्त्री.

**काकपक्षः** काकस्य पक्षइवकाक
पक्षः, कावळ्याचा पक्षा सारिखा
जो तो. स. लहान मुलाची शेंडी. अ. पु.

**काकपीलुकः** काकानांपीलुरिवका
कपीलुकः, काकैः पील्यतेवा, का
कांला जो पीलु फला सारिखा ह्म. अ
क्रोडतुल्य अथवा काकांनीं जो प्र
तिष्टंभित ह्म. वेष्टित तो. स. क्रू. पी
लधा. प्रतिष्टंभ अ. काजरा. अ. पु.

**काकमाची** काकान्मंचतइतिका
कमाची, काकांतें धारण करित्ये जी
ती. क्रू. मचिधा. धारणादि अ. अ
र्थ काकनासिकाश. प्र. ई. स्त्री.

**काकमुद्गा** काकेनेषज्जलेनमुदंग
च्छतीतिकाकमुद्गा, यत्किंचिज्जला
नें हर्ष पावत्ये जी ती. क्रू. गम्लृधा. ग
तिअ. रानमूग. आ. स्त्री.

**काकली** ईषत्कालःकाकली, यत्किंचि
त् जो अव्यक्त ध्वनि तो. अव्यक्त आ
णि मधुर असा शब्द. ई. स्त्री.

नौः नुद्यतेप्रेर्यतेइतिनौः, कैवर्तकानें प्रेरित जी ती. कृ. नुदधा. प्रेरण अ. नौका. औ: स्त्री.

नौकादंडः नौकायाः दंडः नौकादंडः, नौकेचा जो दंड तो. स. वल्हे. अ. पु.

न्यक् न्यंचतीतिन्यक्, नीचीकृत करितें जें तें. कृ. अंचुधा. गत्याक्षि धिक्कारार्थी अव्य.

न्यक्षं नियतानि निवृत्तानि निकृत्तानि वाअक्षाण्यस्मिन्न्यक्षम्, निवृत्त आहेत किंवा निकृत्त आहेत इंद्रियें ज्याचेठायीं तें. त. परशुराम. अ. पु. २ साकल्य. अ. न. ३ अधम. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

न्यग्रोधः न्यक्रुणद्धिन्यग्रोधः, अधोभाग आवरण करितो जो तो. कृ. रुधिर्धा. आवरणअ. वडाचें झाड. २ व्याम ह्म. वांव. अ. पु.

न्यग्रोधी न्यक्रुणद्धीतिन्यग्रोधी, अधोभाग आवरण करिते जी ती. कृ. रुधिर्धा. आवरणअ. उंदिर कानी औषधि. ई. स्त्री.

न्यङ्. नितरांअंचतीतिन्यङ्, उत्कृष्ट गमन करितो जो तो. कृ. अंचुधा. गतिअ. ठेंगणा. वि. च्. पु. ई. स्त्री. च्. न.

न्यंकुः नितरांअंचतीतिन्यंकुः, उत्कृष्ट गमन करितो जो तो. कृ. अंचुधा. गतिअ. मृगविशेष. उ. पु.

न्यस्तं न्यस्यतेस्मन्यस्तं, क्षिप्त करि जेलें जें तें. कृ. असुधा. क्षेपणअ. निघालेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

न्यादः न्यदनंन्यादः, भक्षण जें तो. कृ. अदधा. भक्षणअ. भोजन. अ. पुल्लिंगी.

न्यायः न्ययनंन्यायः, नीती जी तो. कृ. इणधा. गतिअ. नीती. अ. पु.

न्यासः न्यस्यतेइतिन्यासः, स्थापन करिजेतो जो तो. कृ. असुधा. क्षेपणअ. पुरलेलें द्रव्य, अ. पु.

न्युंखः न्यूंखः नुंख्यतेइतिन्युंखः यज्ञादिकाचेठायीं प्रशस्त उच्चारिजे तो जो तो. कृ. उखिधा. गतिअ. ओंकार विशेष. अ. पु. २ सुंदर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

न्युब्जः न्युब्जनंन्युब्जः, पृष्ठवक्रत्वं यस्यास्तीतिन्युब्जः, रोगानें वांकडी पाठ ज्याची तो. त. कुबडा. २ रोगानें ज्याची पाठ किंवा तोंड वांकडें झालें तो. अ. पु.

न्यूनः न्यूनयतिन्यूनयतेस्म वान्यूनः,

निंदा करितो किंवा करिजेतो जी तो. कृ. ऊनधा. परिद्वाणअ. निंद्य. २ कमी. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पक्कणः** पच्चंतीतिपचः कणंतीति कणाः पचः कणाः यत्रपक्कणः, पाचक आहेत कलहकारी ज्याचेठायीं तो. स. भिल्लांचा गांव. अ. पु.

**पक्वं** पच्यतिस्मइतिपक्वं. परिपक्व अवस्था प्राप्त जें तें. कृ. डुपचव्रधा. पाकअ. पिकलेला. २ ज्याचा नाश जवळ आला तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पक्षः** पचतिभूतानीतिपक्षः, भूतें व्यक्त करितोजी तो. कृ. पचधा. व्यक्तीकरणअ. पंधरा अहोरात्रें. २ पिच्छ ह्म. पीस. ३ सहाय. ४ कंकादि बाणोपयोगी पक्ष. केशवाचक शब्दापुढें हा असलातर समूहवाचक. अ. पु. उ. केशपक्षः कचपक्षः इत्यादि.

**पक्षकः** पक्षइवपक्षकः, पार्श्वद्वारा चेपरी जो तो. त. घराचें मागील दार. अ. पु.

**पक्षतिः पक्षती** पक्षस्यमूलंपक्षतिः, पक्षांचें जें मूल ती. त. शुक्लकृष्णपक्षांचेंमूल २ पक्ष्याच्या पिसांचेंमूळ. इ. २ ई. स्त्री.

**पक्षद्वारं** पक्षेपार्श्वेद्वारंपक्षद्वारं, पार्श्वभागाचेठायीं जें दार तें. स. घराचें मागील दार. अ. न.

**पक्षभागः** पक्षत्यनेनपक्षः, पक्षस्यभागः पक्षभागः, परिगृहीत हत्तीचा पार्श्वभाग जोतो. स. हत्तीचा पार्श्वभाग. अ. पु.

**पक्षांतः** पक्षस्य अंतः पक्षांतः, पक्षाचा जो अंत ह्म. समाप्ति तो. स. पूर्णिमा अमावास्या. अ. पु.

**पक्षिणी** पूर्वापरदिनेपक्षाविवस्तो यस्यामितिपक्षिणी, पूर्वापरदिवस आहेत पक्षांप्रारखे जीचाठायीं ती. त. पूर्वापरदिनयुक्त रात्रि ह्म. दोन दिवसांमधील रात्र. ई. स्त्री.

**पक्षी** पक्षाः संत्यस्यपक्षी, पक्ष आहेत जास तो. त. पक्षी. इन्. पु.

**पक्ष्म** पक्ष्यतेऽनेनपक्ष्म, परिग्रह करिजेतो जेणें करून तो. कृ. पक्षधा. परिग्रहअ. नेत्र संबंधि जे केश ते. प्रत्येक. २ पुष्पांतील पराग. ३ फार सूक्ष्म जो तंतूचा वगैरे अंश तो. अ. नपुंस.

**पंकः** पंकजते दुःखमनेनेति पंकः, लिप्त होतें हे दुःख जेणें करून तो. त. पातक. २ चिखल. अ. पु. न.

**पंकिलः** पंकः अस्तिअस्मिनइ तिपंकिलः, कर्दम आहे ज्याचेठा यीं तो. त. कर्दमयुक्त. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पंकेरुहं** पंकेरुहतीतिपंकेरुहं, क र्दमाचेठायीं उत्पन्न होणारें जें तें. कृ. रुहधा. प्रादुर्भावअ. कमळ. अ. न.

**पंगुः** पनतीतिपंगुः, स्तुति करणा रा जो तो. कृ. पनधा. स्तुतिअ. पां गुळा. उ. पु.

**पंक्तिः** पचनंपंक्तिः, विस्तार जोती कृ. पचिधा. विस्तारकरणअ. पंगत २ छंदोविशेष ज्या वृत्ताचा दहा अक्षराचा चरण असतो तें वृत्त. ३ दहा संख्या. इ. स्त्री.

**पक्तिः** पचनंपक्तिः, पाक जो ती. कृ. डुपचषधा. पाकअ. परिपक्क ता. इ. स्त्री.

**पचंपचा** पचतीतिपचंपचा, पा क करविते जी ती. कृ. डुपचष् धा. पाकअ. दारुहळद. आ. स्त्री.

**पचा** पचनंपचा, पाक जो ती. कृ. डुपचषधा. पाकअ. पचन. आ. स्त्री.

**पंचजनः** पंचभिर्भूतैर्जन्यंतेइ तिपंचजनः, पांच भूतांचीउत्पन्न होइजेती जो तो. कृ. जनीधा. प्रा दुर्भावअ. मनुष्य. २ पुरुष. अ. पु.

**पंचता. पंचत्वं** पंचानांभावः पं चता, पांचांचा जो भावती. त. म रण. आ. स्त्री. २ अ. न.

**पंचदशी** पंचदशसंख्याथाःपू रणीपंचदशी, पंचदश संख्येची जी पूरण कर्त्री ती. पूर्णिमा. २ अ मावास्या. ई. स्त्री.

**पंचमः** पंचसुस्थानेषुमातीतिपंच मः, पंचम स्थानाचेठायीं राहतो जो तो. कृ. माधा. मानअ. गा यनाचे स्वरांतील एकभेद. अ. पु.

**पंचरात्रं** पंचानांरात्रीणांसमाहारः पंचरात्रं, पंचरात्रींचा जो समुदा यतें. स. पांच रात्री. अ. न.

**पंचलक्षणं** पंचलक्षणानियस्य पंचलक्षणं, पांच आहेत लक्षणें ज्याचीं तें. स. पुराण. अ. न.

**पंचशरः** पंचशरायस्यसपंचश रः, पांच आहेत बाण ज्याचे तो. स. मदन. अ. पु.

**पंचशाखः** पंचशाखाइवअंगुल

योयस्यसः पंचशाखः, पांच आ हेत शाखा साखिख्या अंगुली जास तो. स. हात. अ. पु.

**पंचांगुलः** पंचांगुलयोयस्य पंचांगुलः, पांच आहेतअंगुलिस तुल्यपर्णेजासतो. स. एरंडाचें झाड अ. पु.

**पंचास्यः** पञ्च्यतइतिपंचं पंचं विस्तृतं आस्यंयस्यसः पंचास्यः पसरलेलें आहे मुख ज्याचें तो. स. सिंह. अ. पु.

**पंजरः** पिंजतेइतिपंजरः, पक्षादि संबद्ध होइजेतो जो तो. कृ. पिजिधा. संपर्कअ. पिंजरा. अ. पु.

**पंजिका** पिज्यते अर्थः अस्यां इतिपिंजा पिंजेवपंजिका, बोधिजेतो अर्थ जीच्याठायीं ती पिंजा तीच पंजिका. त. निःशेषपदव्याख्या. आ. स्त्री.

**पटच्चरं** पटतीतिपटत् भूतपूर्वं पटत्पटच्चरं, जुना जो पट ह्म. वस्त्र तें. त. जीर्णवस्त्र. अ. न. २ चोर. अ. पु.

**पटलं** पटंविस्तारंलातीतिपटलं, विस्तार ग्रहण करितें जें तें. कृ. लाधा. आदानअ. घराचा शाकार २ नेत्ररोग. ३ समूह. अ. न.

**पटलप्रांतः** पटलस्यप्रांतः पटलप्रांतः, गृहसंबंधी कवलादिकांचा पुढिल भाग ह्म. वळचणी. स. वळचण ह्म. पडवी. अ. पु.

**पटला** विग्रहादिपटलशब्दाप्रमाणें. समूह. आ. स्त्री.

**पटवासकः** पटंवासयतीतिपटवासकः, वस्त्रास सुगंधयुक्त करणारा जो तो. कृ. वासधा. उपसेवाअ. सुवासिकचूर्णविशेषबुका. अ. पु.

**पटहः** पटंहंतीतिपटहः, गमनातें कुंटित करितो जो तो. कृ. हनधा. हिंसागतिअ. वाद्यध्वनि. २ संग्रामध्वनि. अ. पु.

**पटी** पटतीतिपटी, देदीप्यमान होत्ये जी ती. कृ. पटधा. गतिअ. लहान वस्त्र. ई. स्त्री.

**पटुः** पाटयतीतिपटुः, उत्तमभाषण करितो जो तो. कृ. पटधा. भाषार्थअ. शाकविशेष. पडवळ. उ. पु. २ चतुर. ३ तीक्ष्ण. ४ रोगरहित. वि. उ. पु. स्त्री. न.

**पटुपर्णी** पटूनिपर्णान्यस्यापटुप र्णी, सुंदर आहेत पर्णे जीचीं ती. स. स्वर्णक्षीरी. ई. स्त्री.

**पटः** पटतीतिपटः, दैदीप्यमान कारितो जो तो. कृ. पटधा. भासन. अ. चांगलें वस्त्र. अ. पु. न.

**पटोलः** पटतीतिपटोलः, सरळ गामी जो तो. कृ. पटधा. गतिअ. शाकविशेष, पडवळी. अ. पु.

**पटोलिका** पटतीतिपटोला सैव पटोलिका, गमन करिते जी ती प टोला तीच पटोलिका. त. पडवळी. आ. स्त्री.

**पट्टः** पटतिपट्यतेवापट्टः, शब्द करितो किंवा करिजेतो जो तो. कृ. प टधा. शब्दअ. बसावयाचा लां कडी पाट. अ. पु.

**पट्टिका** पटतीतिपट्टिका, ऊर्ध्व गमन करितो जो तो. कृ. पटधा. गतिअ. तांबडा लोध्रवृक्ष. आ. स्त्री.

**पट्टिशः** पट्टिंश्यतीतिपट्टिशः, कु मविशेषादिकांतें खंडन करितो जो तो. कृ. शोधा. तनूकरणअ. आयुधविशेष. अ. पु.

**पट्टी** पट्टोस्यास्तीतिपट्टी, प क्ष. अलक्त कोपशुक्त आहे चू र्ण ज्याचें तो. त. तांबडा लोध्रवृक्ष. इन्. पु.

**पणः** पण्यतेऽनेनपणः, व्यवहा र करिजेतो जेणें करून तो. कृ. प णधा. व्यवहारअ. तांब्याचें तोळा भार नाणें. २ द्यूत. ३ द्यूतांत वगै रे जय जाहला असतां प्रतिज्ञा - बांधिल्या प्रमाणें जें घेतात तो. ४ वेतन. ५ मूल्य, विकलेल्या वस्तू चें मोल. ६ चार दमड्या. अ. पु.

**पणवः** पण्यतेस्तूयतेइतिपणवः, स्तुति करिजेतो जो तो. कृ. पणधा. स्तुतिअ. वाद्यविशेष. अ. पु.

**पणायितं** पणाय्यतेस्मपणायि तं, स्तवन करिजेलें जें तें. कृ. प णधा. स्तुतिअ. स्तवलेलें - वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पणितं** पण्यतेस्मपणितं, अर्था दि सर्वपूर्वी. श. प्र.

**पणितव्यं** पण्यतेइतिपणितव्यं, विक्रय करण्यास जें योग्य तें. कृ. पणधा. व्यवहारअ. विकावयाची वस्तु. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पंडः** पंड्यतेइतिपंडः, पुंस्त्वहीन

असतो जो तो. कृ. पडिधा. नाश नअ. नपुंसक. अ. पु.

**पंडित:** पंडासंजातास्यपंडितः, बुद्धि संजात ह्म. आहे जास तो. त. विद्वान्. अ. पु.

**पण्यं** विग्रहादिसर्वपणितव्यशब्दाप्रमाणें.

**पण्यवीथिका** पण्यानांवीथीपण्यवीथी पण्यवीथ्येवपण्यवीथिका, क्रयविक्रयादि द्रव्यानें जें स्थान ती पण्यवीथी तीच पण्यवीथिका, त. बाजार. आ. स्त्री.

**पण्या** पण्यतइतिपण्या, विशेष रोग निरासार्थ स्तुत्य जी ती. कृ. पणधा. स्तुतिअ. मालकांगोणी. आ. स्त्री.

**पण्याजीव:** पण्यमाजीवोयस्य पण्याजीवः, विक्रय आहे वृत्ति ह्म. जीविका ज्याची तो. स. क्रयविक्रय करून उपजीवन करणारा वाणी. अ. पु.

**पत्** विग्रहादिपादशब्दाप्रमाणें. दू. पु. न.

**पतग:** पतेनपक्षेणगच्छतीतिपतगः, पक्षें करून गमन करितो जो तो. कृ. गम्लृधा. गतिअ. पक्षी अ. पु.

**पतंग:** पततीतिपतंगः, पक्षादिकानें गमन करितो जो तो. कृ. पत्लृधा. गतिअ. दीपपतंग. २ पक्षि. ३ सूर्य. ४ शालिविशेष भातांतील एक भेद. अ. पु.

**पतंगिका** पततीतिपतंगी सैवपतंगिका, गमन करणारी जी ती पतंगी तीच पतंगिका. त. पांढरा मध उत्पन्न करणारी माशी. आ. स्त्री.

**पतत्रं** पतंतं त्रायतेइति पतत्रं, गमनकरणाऱ्याचें रक्षण करणारें जें तें. कृ. त्रैङ्धा. पालनअ. पक्ष, ह्म. पिस. अ. न.

**पतत्रि:** पततीतिपतत्रिः, गमन करणारा जो तो. कृ. पत्लृधा. गतिअ. पक्षि. इ. पु.

**पतद्ग्रह:** पततोगृह्णातीतिपतद्ग्रहः, पडणाऱ्या श्लेष्यादिकांप्रत ग्रहण करितो जो तो. कृ. ग्रहधा. उपादानअ. पिकदाणी. २ सैन्याचा मागचा भाग. अ. पु.

**पतयालु:** पतनशीलः पततीतिपतयालुः, पतनशील जो तो. कृ. पत्लृधा. ग

तिअ. पडणारा. वि. उ. पु. स्त्री. नपुंस.

**पताका** पततीतिपताका, ऐश्वर्यादि प्रगटनार्थ अग्रभागीं गमन करणारी जी ती. कृ. पत्लृधा. गतिअ. ध्वज. आ. स्त्री.

**पताकी** पताकास्यास्तीतिपताकी, ध्वज आहे जास तो. त. जरी पटके वाला पताकाधारण करणारा. इन्. पु.

**पतिः** पातीतिपतिः, स्त्रियादिकांचें रक्षण करणाराजो तो. कृ. पा धा. रक्षणअ. नवरा. इ. पु.

**पतिंवरा** पतिंवृणोतीतिपतिंवरा, पतिवरणारी जी ती. कृ. वृञ्धा. वरणअ. आपले इच्छेस येईल त्यास वरणारी स्त्री. आ. स्त्री.

**पतिवत्नी** पतिरस्यस्याः पतिवत्नी पति आहे जीस ती. त. जीचा नवरा जीवंत आहे ती बायको. ई. स्त्री.

**पतिव्रता** पत्योव्रतंयस्याः सापतिव्रता, पति सेवे विषयीं आहे नियम जीस ती. स. पतीच्या सेवे विषयीं जी तत्पर ती. आ. स्त्री.

**पत्तनं** पतंतिजनाः यत्रइतिपत्तनं, गमन करितात जन जाचेठायीं तें कृ. पत्लृधा. गतिअ. शहर. अ. न.

**पत्तिः** पद्यतेइतिपत्तिः, चरणांनीं गमन करणारा जो तो. कृ. पदधा. गतिअ. पायांनें चालणारा. इ. पु.

**पत्तिसंहतिः** पत्तीनांसंहतिःपत्तिसंहतिः, पत्तींचा जो समुदाय ती. स. पादगाम्यांचा समूह ह्म. पायदळ. इ. स्त्री.

**पतत्री** पतत्रंअस्तियस्यइतिपतत्री, पतत्र ह्म. पक्ष आहे जास तो. पक्षि. इन्. पु.

**पत्रं** पतत्यनेनपततिवापत्रं, गमन होतें जेणेंकरून तें. किंवा पतन पावतें जें तें. कृ. पत्लृधा. गतिअ. पत्र. २ पक्ष ३ हत्ती घोडे इत्यादि वाहन अ. न.

**पत्रपरशुः** पत्रमिवपरशुः पत्रपरशुः, पत्रासारिखा जो परशु तो. स. कानस. उ. पु.

**पत्रपाश्या** पत्रमिवपाश्यापत्रपाश्या, पर्णासारिखी जी पाश्या ह्मः मस्तकीं केशादिबद्ध भूषण तीक्ष. ललाटाचें भूषण. आ. स्त्री.

**पत्ररथः** पत्रंरथइवयस्यसपत्ररथः, पत्र आहे गमनाविषयीं रथ तुल्य जास ता. त. पक्षी. अ. पु.

**पत्रलेखा** पत्राकारालेखायस्याःसा पत्रलेखा, पर्णाचा आकारा सारिखी आहे रेषा जीची ती. स. कस्तूरी केशर इत्यादिकांनीं गालावर पानाची आकृति काढितात ती. आ. स्त्रीलिं.

**पत्रांगं** पत्रमेवांगमस्यपत्रांगं, पत्र ह्म पत्रतुल्यआहे अंग जाचें तो. स. रक्तचंदन. २ पतंग. अ. न.

**पत्रांगुलिः** पत्रार्थेऽगुलिर्यस्याः सापत्रांगुलिः, पत्ररचनेविषयीं उपयुक्त आहे अंगुलिव्यापार जीस ती. स. अर्थ पत्रलेखाश. प्र. इ. स्त्री.

**पत्री** प्रशस्तानिपत्राणिसंत्यस्यपत्री, प्रशस्त आहेत पक्ष जाचे तो. स. पक्षी, ससाणा. २ बाण. इन्. पु.

**पत्रोर्णः** पत्रेषुऊर्णायस्यसः पत्रोर्णः, पत्राच्याठायीं आहे ऊर्णा ह्म. लोमवैशिष्ट्य जास तो. स. दिंड्याचें झाड. अ. पु. २ रेशमीवस्त्रविशेष. अ. न.

**पथः पंथाः** पथंति अनेनइतिपंथा, गमन करितात जन जेणें करून तो. कृ. पथेधा. गति अ. मार्ग. अ. पु. २इन्. पु.

**पथ्या** पथोऽनपेतापथ्या, रोगनिवर्तन मर्यादा न सोडणारी जी ती. त. हिरड्याचें झाड. आ. स्त्री.

**पदं** पद्यतेनेनपदं, गमन करिजेतें जेणेंकरून तें. कृ. पदधा. गतिअ. व्यवसाय. २ रक्षण. ३ स्थान. ४ चिन्ह. ५ पाय. ६ वस्तु. अ. नपुं.

**पदगः** पादाभ्यांगच्छतीतिपदगः, पायांनीं गमन करणारा जो तो. कृ. गम्लृधा. गतिअ. पादगामी. अ. पु.

**पदवी** पद्यतेऽनयापदवी, गमन करितो जीणें ती. कृ. पदधा. गतिअ. मार्ग. ई. स्त्री.

**पदाजिः** पादाभ्यामजतीतिपादाजिः, पायांनीं गमन करणारा जो तो. कृ. अजधा. गतिअ. पादगामी. इ. पु.

**पदातिः** पादाभ्यामततीतिपदातिः, पायांनीं चालणारा जो तो.

कृ. अनधा. सातत्यगमनअ. पाद गामी. इ. पु.

**पदातिकः** पदातिरेवपदातिकः, पदाती जो तोच पदातिक. त. पायांनीं चालणारा. अ. पु.

**पदिकः** पादाभ्यांचरतीतिपदिकः, पायांनीं संचार करितो जो तो. त. पादगामी. अ. पु.

**पद्गः** पद्भ्यांगच्छतीतिपद्गः, पायांनीं गमन करणारा जो तो. कृ. गम्लृधा. गतिअ. पायानें चालणारा. अ. पुल्लिं.

**पद्धतिः पद्धती** पादाभ्यांहन्यतेइतिपद्धतिः, पायांनीं ताडण करिजेत्ये जी ती. कृ. हनधा. हिंसाअ. मार्ग. इ. २ ई. स्त्री.

**पद्मं** पद्यतेनसद्मं, जलामध्येंविकासगामी जें तें. कृ. पदधा. गतिअ. कमळ. अ. पु. न.

**पद्मकं** पद्ममिवप्रतिकृतिः पद्मकं, पद्मासारिखी जी प्रतिकृति ह्म. प्रतिमा तें. त. हत्तीच्या शरीरावर जो बिंदु असतो तो. अ. न.

**पद्मचारिणी** पद्मेचरितुंशीलमस्याः पद्मचारिणी, पद्मव्यवहाराचरण करण्याचा आहे स्वभाव जीचा ती. कृ. चरधा. गतिअ. स्थलकमलिनी. ई. स्त्री.

**पद्मनाभः** पद्मंनाभौयस्यसपद्मनाभः, पद्म आहे नाभीचा गर्यी ज्याच्या तो. स. विष्णु. अ. पु.

**पद्मपत्रं** पद्मस्येवपत्रमस्यपद्मपत्रं, पद्मा सारिखें आहे पत्र ह्म. चिन्ह ज्याचें तो. स. कमळाची पाकळी. २ पुष्कर नामक औषधीचें मूळ. अ. न.

**पद्मरागः** पद्ममिवरागोऽस्यपद्मरागः, पद्मासारिखा आहे रक्तिमा ज्यास तो. स. माणिक. अ. पु.

**पद्मा** पद्ममस्याअस्तीतिपद्मा, कमल आहे लीलार्थ जीस ती. न. लक्ष्मी. २ वनौषधींत भारंग ह्मणतात ती. ३ स्थलकमलिनीआ. स्त्री.

**पद्माकरः** पद्मानांआकरः पद्माकरः, पद्मांचा जी आकर ह्म. खाण तो. स. तळें. अ. पु.

**पद्माटः** पद्ममिवपद्मंतद्वदटतीतिपद्माटः, पद्मासारिखा विस्तार करितो जो तो. कृ. अटधा. गतिअ. टाकळा. अ. पु.

**पद्मालया** पद्मंआलयोयस्याः सापद्मालया, पद्म आहे आलय ह्म· स्थान जीचें ती· स· लक्ष्मी· आ· स्त्री·

**पद्मिनी** विग्रहादिकुमुदिनीशब्दा प्रमाणें· कमलिनी· ई· स्त्री·

**पद्मी** पद्ममस्यास्तीतिपद्मी, पद्म सदृश बिंदुजालक आहेजासतोग हत्ती· इन्· पु·

**पद्यं** पादाः संतिअस्येतिपद्यं, चर ण आहेत जास तें· त· श्लोक· अ· न२शूद्र· अ·पु·

**पद्या** पादाः संतिअस्यामितिपद्या, पाद ह्म· पादप्रतिमा सदोदितआ हेत जीचेठायीं ती· त· मार्ग· आ·स्त्री·

**पनसः** पनाय्यतेस्तूयतेइतिपनसः सर्वांनीं स्तविजेला जो तो· कृ· पन धा· स्तुतिअ· फणसाचें झाड·अ·पु·

**पनायितं** पनाय्यतेस्मपनायितं, स्तुति करिजेलें जें तें· कृ· पनधा· स्तुतिअ· स्तुत,स्तवलेला· वि· अ· पु· न· आ· स्त्री·

**पनितं** विग्रहादिसर्वपूर्वीच्याश ब्दाप्रमाणें·

**पन्नं** पद्यतेस्मपन्नं, पतन पावलें जें तें· कृ· पद्धा· गतिअ· गलि त· वि·अ·पु·न· आ· स्त्री·

**पन्नगः** पद्भ्यांनगच्छतीतिपन्नगः, पायांनीं नाहीं गमन करितो जो तो· कृ· गम्लृधा· गतिअ· सर्प· अ·पु·

**पन्नगाशनः** पन्नगाअशनंयस्यस पन्नगाशनः, पन्नग आहेत भक्षण ज्याचें तो· स· गरुड पक्षी· अ· पु·

**पयः** पीयतेइतिपयः, पान करिजेतें जें तें· कृ· पीङ्धा· पानअ· उदक· २ दूध· स्· न·

**पयस्यं** पयसोविकारः पयस्यं, दुग्धा चो जो विकार ह्म· आज्यादि तें· दु धाचा विकार, दहींतूपइत्यादि अ·पु· न· आ· स्त्री·

**पयोधरः** धरतीतिधरः, पयसांधरः पयोधरः, जलातें किंवा दुग्धातें धा रण करितो तो धरजलदुग्धांचाजो धरतो· कृ· धृञ्धा· धारणअ· स्त्रियांचा स्तन· २मेघ·अ·पु·को· नारिकेल· पाडीवारुणा

**परः** पूर्यतेऽनेनपरः, पूरण करितो जेणें करून तो· कृ· पृधा· पूरणअ· शत्रु· अ· पु· २ दूर· ३ आत्मभिन्न· ४ उत्तम· वि· अ·पु·न· आ· स्त्री·

**परजातः** परस्मात्जातः परजातः,

परपोष्यत्वात् परापासून जो वाढ
ला तो. स. दुसऱ्यानें वाढविलेला.
वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परतंत्रः** परस्तंत्रमस्यपरतन्त्रः, पर
आहे प्रधान जास तो. स. पराधीन
वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परपिंडादः** परस्यपिंडमत्तीति
परपिंडादः, परान्न भक्षण करि
तो जो तो. कृ. अद्धा. भक्षण
अ. परान्नोपजीवी. वि. अ. पु. न.
आ. स्त्री.

**परभृतः** परेणकाकेनभृतः परभृ
तः, कावळ्यानें जो पोषित तो. स.
कोकिळपक्षी. अ. पु.

**परभृत्** परंबिभर्तीतिपरभृत्,
दुसऱ्याचें पोषण करणारा जोतो.
कृ. डुभृञ्धा. पोषणअ. कावळा.
त्. पु.

**परमं** परंमिमीतेइतिपरमं, अंगी
कारत्या अर्था विषयीं उत्कृष्ट प्रमाण
झ. बोधकरितें जें तें. कृ. माङ्धा.
मानअ. अंगीकारार्थी अव्य.

**परमान्नं** परमंचतदन्नंचपरमा
न्नं, उत्कृष्ट जें अन्न तें. स. पाय
स झ. खीर. अ. न.

**परमेष्ठी** परमेव्योम्निचिदाकाशे
तिष्ठतीतिपरमेष्ठी, चिदाकाशीं झ.
चैतन्यरूपीं राहजो जो तो. कृ. ष्ठाधा.
गतिनिवृत्तिअ. ब्रह्मदेव. इन्. पु.

**परंपराकं** परंपरायाअकनंपरंप
राकं, परंपरेची जी कुटिल गती
झ. अनुसरणतें. स. यज्ञांतील पशु
हनन. अ. न.

**पर[illegible]वान्** परःस्वाम्यस्ति यस्यपर वा
न्, स्वामी आहे जास तो. त. परतं
त्र. वि. त्. पु. ई. स्त्री. त्. न.

**परशुः** परंशृणातीतिपरशुः, शत्रूतें
नाश करणारा जोतो. कृ. शृधा. हिं
साअ. कुऱ्हाड. उ. पु.

**परश्वधः** परस्यशयनंपरश्वं परश्वं
धयतीति परश्वधः, वृक्ष हननातें
करणारा जो तो. कृ. धेट्धा. पानअ.
कुऱ्हाड. अ. पु.

**परःशतं** शतात्परंपरः शतं, शता
हून जें परतें. स. शंभरांहून अधि
क. अ. न.

**परःसहस्रं** सहस्रात्परंपरःस
हस्रं, सहस्राहून जें पर तें. स. स
हस्राहून अधिक. अ. न.

**परश्वः** श्वःपरंपरश्वः, उद्यांहून

जें पर तें. स. परवां या अर्थीं अ
व्यय.

**पराक्रमः** पराक्रम्यतेऽनेनपरा
क्रमः, गमन करिजेतो जेणें करू
न तो. क्रु. क्रमुधा. पादविक्षेपअ.
शौर्य. २ सामर्थ्य. ३ उद्योग. अ. पु.

**परागः** परागच्छतीतिपरागः, स
र्वत्र गमन करितो जो तो. कृ. गम्लृ
धा. गतिअ. पुष्पांतील रेणु. २ धू
ळी. ३ सुवासिक चूर्णविशेष. ४
चंद्रसूर्य ग्रहण. ५ कर्पूर चूर्ण. अ.
पुल्लिं.

**पराङ्मुखः** परांच त्यनभिमुखी
भवतीतिपराङ् पराङ्मुखमस्य
पराङ्मुखः, अनभिमुख आहे मु
खजाचें तो. स. विमुख. वि. अ.
पु. न. आ. स्त्री.

**पराचितः** परेण आचितः पराचि
तः, अन्याचें जो वर्धित तो. स.
दुसन्यानें वाढविलेला. वि. अ. पु.
न. आ. स्त्री.

**पराचीनः** परागेव पराचीनः, वि
मुख जो तोचत. पराङ्मुख. वि.
अ. पु. न. आ. स्त्री.

**पराजयः** पराजयनंपराजयः, यु
द्धाचेठायीं जो पराभव तो. कृ. जि
धा. अभिभवअ. पराभव. अ. पु.

**पराजितः** परैराजीयतेस्मपरा
जितः, शत्रूंनीं पराभूत करि
तो जो तो. कृ. जिधा. अभिभवा
दिअ. पराजय पावलेला. २ दुसन्यानें
वाढविलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पराधीनः** परस्मिन्नधीनः परा
धीनः, पराच्याठायीं जो अधीन
तो. स. परतंत्र. वि. अ. पु. न.
आ. स्त्री.

**परान्नः** परान्नंनित्यमस्त्यस्यपरा
न्नः, नित्य आहे परान्न जास तो.
त. परान्नोपजीवी. वि. अ. पु. न.
आ. स्त्री.

**पराभूतः** पराभूयतेस्मपराभूतः,
अभिभूत करिजेला जो तो. कृ. भू
धा. सत्ताअ. पराजय पावलेला.
वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परायणं** परेयतेइतिपरायणं.
तदेकचित्तानें ग्रहणें जें तें. कृ. इं
धा. गत्यादि अ. आसक्तीनें बोल
णें. अ. न.

**परारि** पूर्वतरे वर्षेपरारि, पूर्वी
च्या मागलें जें वर्ष त्याचेठायीं

न. तिद्धस्तां त्या अर्थी अव्यय.

**परार्ध्यः** परस्मिन् अर्धेभवः परार्ध्यः उत्कृष्ट पूज्यता जी तीन्हेगर्थी गाह नो जो तो. त. प्रमुख. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परासनं** परास्यतेपरासनं, विदार णजें तें. कृ. अस्क धा. क्षेपणअ. व ध. अ. न.

**परासुः** परागता असवोयस्मात्सप रासुः, परागत आहेत प्राण जा पा सून तो. स. मेलेला. वि. उ. पु. स्त्री नपुं.

**परास्कंदी** परानास्कंदितुंशीलम स्यपरास्कंदी, लोकनाशकस्वभावजो तो. कृ. स्कंदिर्धा. गत्यादिअ. चोर. इन्. पु.

**परिकरः** परिकीर्यतेपरिक्रिय तेनेनवापरिकरः, टाकिजेतो किं वा परिवार करिजेतो जेणें करून तो. कृ. कृधा. विक्षेपअ. २ डुकी ञ्था. करणअ. पलंग. २ परिवार अ. पु.

**परिकर्म** परिकर्मक्रियायस्मात्तत् परिकर्म, मल नाशन करणारी आहे क्रिया ज्या. कर्म जा पासून तें मलवर्जनार्थ कर्म. २ शरीरावर शरादिकांची उटी करणें. न्. न.

**परिक्रमः** परिक्रमणंपरिक्रमः, चरणांनीं जें गमन ती. कृ. क्रमुधा. पादविक्षेपअ. पायांनीं जाणें. अ. पु.

**परिक्रिया** परिकरणंपरिक्रिया, परिजनादिकांचें वेष्टन जी ती. कृ. कृ ञ्था. करणअ. चाकर लोकांचा वे ढा. आ. स्त्री.

**परिक्षिप्तः** परितः क्षिप्यतेस्मप रिक्षिप्तः, आसमंतात् वेष्टित क रिजेला जो तो. कृ. क्षिपधा. प्रेर णअ. चहूंकडून वेढलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परिखा** परितः खन्यतेइतिपरिखा आसमंतात् खणिजे से जी ती. कृ. खनुधा. विदारणअ. खंदक. ड. चर. आ. स्त्री.

**परिग्रहः** परिगृह्यतेपरिग्रहः, परिग्रहण करिजेती जो तो. कृ. ग्र हधा. उपादान अ. विवाहितस्त्री २ स्वीकार. ३ मूळ. ४ चाकर लो क. ५ सभेचें मागचा भाग. अ. पुल्लिंगीं.

**परिघः** परितः हन्यतेअनेनपरि

घः, आसमंतात् भागानेठायीं ह नन करिजेतें जेणेंकरून तो. क्रु. हनधा. हिंसाअ. परिघनामा योग. अ. पु.

**परिघातनः** परितः घातयतीति परिघातनः, आसमंतात् नाश करणारा जो तो. कृ. धा. पूर्वींच्याश. प्र. अ. पु.

**परिचयः** परिसमंताच्चयनंपरिचयः, परिचिती जी तो. कृ. चिञ्‌धा. चयनअ. अभ्यास. अ. पु.

**परिचरः** परितश्चरतीतिपरिचरः आसमंताद्भागानेठायीं गमन करणारा जो तो. कृ. चरधा. गतिअ. सेनापति जवळ राहणारा जन. अ. पु.

**परिचर्या** परिचरणंपरिचर्या, परिचरण स्म. शुश्रूषण जें ती. कृ. चरधा. गतिअ. उपासना. आ. स्त्री

**परिचाय्यः** परिचीयतेइतिपरिचाय्यः, स्थितिविशिष्टजो तो. कृ. चिञ्‌धा. चयनअ. अग्निविशेष. अ. पु.

**परिचारकः** परिचरतीतिपरिचारकः, संचार करितो जो तो. कृ. चरधा. गतिअ. चाकर. अ. पु.

**परिणतं** परिणमतिस्मपरिणतं, परिणाम पावतेंझालें जें तें. कृ. णमधा. प्रह्वत्वअ. पक्क. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परिणयः** परितः नयनंपरिणयः, अग्नीच्याआसमंतात्जें नेणेंतें.कृ. णीञ्‌धा. प्रापणअ. विवाह. अ. पु.

**परिणामः** परिणमनंपरिणामः, विकार जो तो. कृ. णमुधा. प्रह्वत्वादिअ. प्रकृतीचा अन्यभाव. अ. पु.

**परिणायः** विग्रहादिपरिणयशब्द प्र इतस्ततः शारी नयन जें तो.खेळांत सोंकट्या हिकडे तिकडे फिरवणें. अ. पु.

**परिणाहः** परिणह्यतेऽनेनपरिणाहः, परितः बंधन करिजेतें जेणें करून तो. कृ. णहधा. बंधनअ. विस्तार. अ. पु.

**परितः** आसमंतात्‌इतिपरितः, आसमंतात् जें तें. न. सर्वतः. आसमंतात् त्या अर्थी अव्य.

**परित्राणं** परित्रातिः परित्राणं, पालन जें तें. कृ. त्रैङ्‌धा. पालनअ. मारण्यास उद्युक्त झाला त्यांचें

निवारण. अ. न.

**परिदानं** परित्यक्तदानंपरिदानं, अन्यापासून घेऊन पुन्हा देणें जें तें. कृ. दाधा. दानअ. मोबदला. अ. न.

**परिदेवनं** परिदीव्यतेइतिपरिदेवनं, रोदनकरिजेतें जें तें. कृ. दिवुधा. गत्यादिअ. रोदनपूर्वक भाषण. अ. न.

**परिधानं** परिधीयतेइतिपरिधानं, परिधान करिजेतें जें तें. कृ. डुधाञ्धा. धारणअ. नेसावयाचें वस्त्र. अ. न.

**परिधिः** परिधीयतेइतिपरिधिः, आसमंतात् धारण करिजेतो जो तो. धा. पूर्वी. श. प्र. सूर्याचे सभोंवार. कदाचित् मंडलाकार जो तेजोविशेष दिसतो तो. २ समिध. ३ वस्तूचा वाटोळा घेर. इ. पुल्लिं.

**परिधिस्थः** परिधौतिष्ठतीतिपरिधिस्थः, परिधीचेठायीं राहणारा जो तो. कृ. ष्ठाधा. गतिनिवृत्तिअ. सेनापति जवळ राहणारा जन. अ. पु.

**परिपणः** परिपण्यतेव्यवहार्थेप्रयुज्यते इतिपरिपणः, वृद्धी करितां देयिजेतो जो तो. कृ. पणधा. व्यवहारअ. मूलधन. अ. पु.

**परिपंथी** परिदोषाख्यानंपथयितुंशीलमस्यपरिपंथी, दोषाख्यानातें बोलणारा जो तो. कृ. पथिधा. शब्दअ. शत्रु. इन्. पु.

**परिपाटिः** परिपाटनंपरिपाटिः, क्रमशः करण जें ती. कृ. पटधा. गतिअ. अनुक्रम. इ. पु.

**परिपूर्णता** परितःपूर्यतेस्मपरिपूर्णः, परिपूर्णस्यभावः परिपूर्णता, आसमंतात् भागीं पूर्ण झाला जो तो परिपूर्ण त्याचा जो भाव ती. त. परिपूर्णपणा. आ. स्त्री.

**परिपेलवं** परितःपेलवंपरिपेलवं, आसमंतात् भागीं जें मृदु तें. स. क्षुद्रमोथा. अ. न.

**परिप्लवः** परिप्लवतेइतिपरिप्लवः, त्वरनें गमन करितो जो तो. कृ. प्लुङ्धा. गतिअ. चंचल. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परिबर्हः** परिबर्हतेइतिपरिबर्हः, प्राधान्य पावतो जो तो. कृ. बर्हधा.

प्राधान्य अ. राजास योग्य जें वस्तु तो. २ परिछद. ३ परिवार. अ. पु.

**परिभवः** परिभूयतेइतिपरिभवः अनादर जो तो. कृ. भूधा. सत्ताअ. अनादर. अ. पु.

**परिभाषणं** परितः भाष्यतेइति परिभाषणं, आसमंतात् भाषण जें तें. कृ. भाषधा. व्यक्तवाणिअ. निंदायुक्त जो उपालंभ तो. अ. न.

**परिभूतं** परिभूयतेस्मपरिभूतं पराभवे करिजेलें जें तें. कृ. भूधा. सत्ता अ. अवमानित. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परिमलः** परिमलनंपरिमलः, कुंकुमादि क्षोद जो तो. कृ. मलधा. रणअ. संघर्षणापासून उत्पन्नजो मनोहर गंध तो, कृ.गंधविशेष. अ.पु.

**परिरंभः** परिरंभणंपरिरंभः, आलिंगन जें तो. कृ. रभधा. राभस्यअ. आलिंगन. अ. पु.

**परिवर्जनं** परिहृज्यतेइतिपरि वर्जनं, हिंसन जें तें. कृ. वृजिधा. वर्जनअ. सर्वथा वर्जन. २ वध. अ. न.

**परिवर्तः** परिवर्तनंपरिवर्तः, परिवर्तन जें तो. कृ. वृतुधा. वर्तनअ. मोबदला. अ. पु.

**परिवादः** परितः वादः परिवादः, आसमतात् भागाच्याठायीं जो वाद तो. कृ. वदधा. व्यक्तवाणिअ. निंदा. अ. पु.

**परिष्कन्नः** विग्रहादिसर्वपरिस्कं दश. प्र.

**परिष्कंदः** विग्रहादिसर्वपरिस्कं दश. प्र.

**परिष्कारः** परिष्क्रियतेनेनपरिष्कारः, भूषित होइजेतोंजेणें करून तो. कृ. डुकृञ्धा. करणअ. अलंकार. अ. पुल्लिंगीं.

**परिष्कृतः** परिष्क्रियतइतिपरिष्कृतः, अलंकार युक्त जो तो. कृ. डुकृञ्धा. करणअ. अलंकारयुक्त. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परिष्वंगः** परिष्वंजनंपरिष्वंगः, आलिंगन जें तो. कृ. ष्वंजधा. परिष्वंगअ. आलिंगन. अ. पु.

**परिसरः** परितः सरंतिअत्रइति परिसरः, आसमंतात् गमन करितात ज्याच्येठायीं तो. कृ. सृधा. गतिअ. नदीपर्वत इत्यादिकांचे जव

ऊंची भूमी. अ. पु.

**परिसर्पः** परिसर्पणंपरिसर्पः, आसमंतात वेष्टन जें तो. कृ. सृ धा. गतिअ. जनाचें वेष्टन. अ. पु.

**परिसर्या** परिसरणंपरिसर्या, सर्वतो गमन जें ती. कृ. धा. पूर्वीच्या श. प्र. सभोंवार किंवा चहूंकडे सरणें. आ. स्त्री.

**परिसारः** विग्रहादिसर्वपूर्वीच्या श. प्रमाणें.

**परिस्कंदः** परिस्कंदतीतिपरिस्कंदः, परितः गमन करितो जो तो. कृ. स्कंदिर्धा. गत्याद्यर्थ. दुसऱ्यानें वाढविलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परिस्कंनः** विग्रहादिसर्वपूर्वीच्या श. प्रमाणें.

**परिस्तोमः** परितस्तूयतेपरिस्तोमः, स्तुत करिजेतो जो तो. कृ. ष्टुञ्धा. स्तुतिअ. हत्तीच्या पाठीवरचें आस्तरण. अ. पु.

**परिस्पंदः** परिस्पंदनंपरिस्पंदः, परिस्पंदन जें तो. कृ. स्पदिधा. किंचिच्चलनअ. रचना. २ क्रिया विशेष. अ. पु.

**परिस्रुत्** परितः स्रवतीतिपरिस्रुत्, आसमंतात् प्रसृत होत्येजी ती. कृ. स्रुधा. स्रवणअ. मद्य. त. स्त्री.

**परिस्रुता** विग्रहादिसर्वपूर्वीच्या श. प्रमाणें. आ. स्त्री.

**परीक्षकः** परीक्षतेइतिपरीक्षकः परीक्षा करितो जो तो. कृ. ईक्षधा. दर्शनअ. परीक्षा करणारा. अ. पु.

**परीभावः** परिभूयतेइतिपरिभावः, तिरस्कार जो तो. कृ. भूधा. सत्ताअ. अनादर. अ. पु.

**परीरंभः** विग्रहादिपरिरंभशब्दाप्रमाणें. आलिंगन. अ. पु.

**परीवर्तः** विग्रहादिसर्वपरिवर्तशब्दाप्रमाणें.

**परीवापः** परिवपनंपर्युप्यतेनेनावापरीवापः, पर्युप्ति किंवा परिवपन करिजेतें जेणेंकरून किंवा ज्याचेठायीं तो. कृ. डुवपधा. बीजसंतान. अ. निंदा. अ. पु.

**परिवारः परीवारः** परिवार्यतेनेनपरिवारः, परितः आच्छादन करिजेतो जेणेंकरून तो. कृ. वृञ

धा. आवरणअ. चाकर लोक. २ तरवारीचें मेण. ३ शवटीचें साहित्य. अ. पु.

**परिवाह: परीवाह:** परित:अलंवहतीतिपरीवाह:, आसमंताद्भागीं जलातें वाहणारा जो तो. कृ. वहधा. प्रापणअ. तळ्यांतून वगैरे बाहेर पाणी जाण्याची मूस. अ. पु.

**परीष्टि:** विग्रहादिपर्येषणशब्दाप्रमाणें. श्राद्धाचेठायीं भक्तिपुर:सर ब्राह्मणाची शुश्रूषाजीती. इ. स्त्री.

**परीसर्या** परिसरणंपरिसर्या, सर्वत: गमनजें ती. कृ. सृधा. गतिअ. सर्पाकार. आ. स्त्री.

**परीसार:** विग्रहादिपरिसर्याशब्दाप्रमाणें. अ. पु.

**परीहास:** परिहसनंपरिहास:, आसमंतात जें हास्य तो. कृ. हसेधा. हसनअ. क्रीडा. अ. पु.

**परु:** पिपर्तीतिपरु:, वृद्धीतें पूरण करितो जो तो. कृ. पृधा. पूरणअ. उसाचें वगैरे पेर. उ. पु.

**परुत्** पूर्वेवर्षेपरुत्, पूर्ववर्षाचेठायीं जें तें. त. गतवर्षी त्या अर्थी अव्य.

**परुषं** पिपर्तीतिपरुषं, अलंबुद्धीतें ह्म. वैमनस्यकारितें जें तें. कृ. पृधा. पूरणअ. निष्ठुर भाषण वगैरे. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परेत:** परमित: परेत:, परलोकाप्रत प्राप्त झाला जो तो. स. मेलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**परेद्यवि** परस्मिन् अहनिपरेद्यवि, परदिवसाचेठायीं जें तें. त. दुसरे दिवसीं त्या अर्थी अव्य.

**परेतराट्** परेतेषुमृतेषुराजतइतिपरेतराट्, प्रेतांचेठायीं शोभतो जो तो. कृ. राजृधा. दीप्तिअ. यम. ज्. पु.

**परेष्टुका** परमिच्छतिपरेष्टु:, सैवपरेष्टुका, अन्यातें इच्छा करणारी जी ती. परेष्टु तीच परेष्टुका. बहुत वेळ प्रसवलेली. आ. स्त्री.

**परेधित:** परैरेधित: परैधित:, परांनीं जो संवर्धित तो. स. दुसऱ्यानें वाढविलेला. अ. पु.

**परोष्णी** परंशत्रु: उष्णांअस्या: परोष्णी, शत्रु सारखें आहे उष्ण जीस ती. स. वागुळ पक्षि. ईका. स्त्री.

**पर्कटी** पृच्यतेसापर्कटी, पारव्या दिकांहीं करून संबद्ध होइजेतो जो तो. कृ. पृचीधा. संपर्क अ. पिं पळीचें झाड. इन्. पु.

**पर्जनी** पिपर्तीतिपर् जनयती तिजनी पर्चासोजनीच्चपर्जनी पिपर्ति ह्म. सेवन द्वारा रक्षण कर णारी अशी जी जनी ह्म. स्वास्थ्य जनक ती. स. दारुहळद. ई. स्त्री

**पर्जन्यः** पिपर्तिवर्षतिवापर्जन्यः पालन पूरणकिंवासेचनकर्ता जो तो. कृ. पृधा. पालनपूरणअ. २वृषुधा. से चनअ. इंद्र. २गर्जनाकरणारा मेघ. अ. पु.

**पर्णं** पर्णयतितत्पर्णं, हरितवर्ण होतें जें तें. कृ. पर्णधा. हरितभा वअ. पान. अ. न. २पळसाचें झाड. अ. पु.

**पर्णशाला** पर्णनिर्मिताशाला पर्णशाला, पर्णानीं निर्मित जी शाला ह्म. गृह ती. स. ऋषीचें घर. आ. स्त्री.

**पर्णासः** पर्णास्यतीतिपर्णासः, पर्णातें टाकितो जो तो. कृ. असु धा. क्षेपण अ. बावरीचें झाड. अ. पु.

**पर्यंकः** परितोऽक्यतइतिपर्यंक आसमंतात् भागीं चिन्हित करि जेतो जो तो. कृ. अकिधा. लक्षण अ. पलंग २परिकर. अ. पु.

**पर्यटनं** परितः अटनंपर्यटनं, आसमंतात् भागीं जें गमन तें. स. भ्रमण. अ. न.

**पर्यंतभूः** पर्यंतेभूःपर्यंतभूः, आसमंतात् भागीं जी भूमि ती. स. नदीपर्वत इत्यादिकांचे जव ळची भूमि. ऊ. स्त्री.

**पर्याप्तः** पर्याप्यतेस्मइतिपर्याप्त पर्याप्त होइजेला जो तो. कृ. आपू धा. लवनअ. यथेच्छ ह्म. परिपू र्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पर्याप्तिः** पर्यापनंपर्याप्तिः, संर क्षण जें ती. कृ. आपूधा. व्याप्ति अ. मारण्यास जो उद्युक्त त्याचें निवारण करणें. २परिपूर्णता. ३सामर्थ्य. इ. स्त्री.

**पर्ययः** विग्रहादि पर्यायशब्द प्रमाणें. अतिक्रमण अ. पु.

**पर्यायः** पर्ययणंपर्यायः, क्रमानें करणें जें तो. कृ. इणूधा. गति अ. अनुक्रम. २ प्रस्ताव. ह्म. प्रसं

ग. २ एकार्थाचे दोन शब्द ते पर स्परांचे पर्याय. अ. पु.

**पर्यवस्था** पर्यवसानंपर्यवस्था, आसमंतादवस्थानजें ती. कृ. ष्ठा धा. गतिनिवृत्तिअ. विरोध. आ. स्त्रीलिं.

**पर्युदंचनं** पर्युदंच्यतेपर्युदंचनं, उत्तम र्णापासून प्राप्त होतेंजें तें. कृ. अंच्चुधा. गतिअ. कर्ज. अ. न.

**पर्येषणा** पर्येषणंपर्येषणा, धर्मादिकाचें जें शोधन ती. कृ. इणधा. गतिअ. श्राद्धामध्यें भक्तिपुरःसर जी ब्राह्मणाची शुश्रूषा ती. आ. स्त्री.

**पर्वतः** पर्वतीतिपर्वतः, ओषध्यादिकातें पूरण करितो जो तो. कृ. पर्वधा. पूरणअ. डोंगर. अ. पु.

**पर्व** पर्वतिपर्व्यतेवापर्व, पूरण होतें किंवा करिजेतें ज्याचेगयीं तें. कृ. पर्वधा. पूरणअ. वेळूचें पेर. २ तिथिविशेष.

**पर्वसंधिः** पृणातिअभिलषितमितिपर्व, पर्वणः संधिः पर्वसंधिः अभिलषित देतें जें तें पर्व त्याचा जो संधितो. अमावास्या आणि पूर्णिमा किंवा अमावास्या त्यांचे अंतर. अ. पु.

**पर्शुका** स्पृशतीतिपर्शुका, स्पर्श करणारी जी ती. कृ. स्पृशधा. संस्पर्शअ. पाठीचा अस्थिविशेष, ज्यास बर्गडी असें ह्मणतात ती. आ. स्त्री.

**पलं** पलतीतिपलं, गमन करितें जें तें. कृ. पलधा. गतिअ. शास्त्रीय चार तोळे. २ मांस. अ. न.

**पलगंडः** पलेनगंडतीतिपलगंडः. मांसतुल्य मृदादिकें करून वदनैकदेशाप्रमाणें रचना करितो जो तो. कृ. गडिधा. वदनैकदेशअ. शिल्पिविशेष, गवंडी. अ. पु.

**पलंकषा** पलंकषतीतिपलंकषा, गमन करणारातें कषति ह्म. दुःख देती जी ती. कृ. कशधा. हिंसाअ. सराटा. आ. स्त्री.

**पललं** पल्यतेनेनपललं, ज्याचा योगानें गमन होतें तें. कृ. पल धा. गतिअ. मांस. अ. न.

**पलांडुः** पलतीतिपलांडुः, ऊर्ध्व गमन करितो जो तो. कृ. पलधा

गतिअ. कांटा. उ. पु.

**पलाल:** पलतीतिपलालः, सरळगमन करणारा जो तो. कृ. पलधा. गति अ. फलरहितधान्याचें कांड. अ. पु. न.

**पलाश:** प्रशस्तानिपलाशान्यस्यपलाशः, प्रशस्त आहेत पर्णें ज्याचीं तो. त. हिरवारंग. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ पान. अ. न. ३ पळसाचें झाड. ४ आंबेहळद. अ. पु.

**पलाशी** पलाशानिसंत्यस्येतिपलाशी, पर्णें आहेत ज्यास तो. त. झाड. इन्. पु.

**पलिक्नी** पलितंशुक्लत्वं अस्त्यस्याः पलिक्नी, जरेच्या योगानें केशाचे ठायीं आहे शुक्लत्व जीस ती. त. केंस पिकलेली स्त्रातारी बायको. ई.

**पलितं** पलतीतिपलितं, जरेनें केशादिकाचेठायीं जें शुक्लत्व तें. कृ. पलधा. गत्यादिअ. वार्धक्यानें जो केशांस पांढरेपणा येतो तो. अ. न.

**पल्यंक:** विग्रहादिपर्यंक शब्दाप्रमाणें. पलंग. अ. पु.

**पल्लव:** पल्यतिपल्लूयतेइतिपल्लवः, पल्लासोलवश्चपल्लवः, पल्यति ह्य. गमनाश्रय जो तो पल् पल् असा जो लव ह्य. छेदनयोग्य तो. म्ह. पालवी. अ. पु.

**पल्वलं** पलंतिमहिष्यादयोत्रेतिपल्वलं, गमन करिताहेत महिष्यादि ज्याचेठायीं तो. कृ. पलधा. गतिअ. अल्पसरोवर. अ. न.

**पव:** पवनंपवः, पूतिकरण जें तो. कृ. पूञ्धा. पवनअ. धान्यादिकाचें शुद्धकरण ह्य. पाखडणें इत्यादि अ. पु.

**पवन:** पुनातीतिपवनः, पवित्र करितो जो तो. कृ. पूञ्धा. पवनअ. वायु. अ. पु. धान्यादिकांचें आसडणें वगैरे. अ. पु.

**पवमान:** पवतेसोपवमानः सदोदित गमन करितो जो तो. कृ. पूङ्धा. पवनअ. वायु. अ. पु.

**पवनाशन:** पवनः अशनंयस्यपवनाशनः, वायू आहे भक्षण ज्याचें तो. स. सर्प. अ. पु.

**पवि:** पुनातीतिपविः, पवित्र करतो जो तो. कृ. पूञ्धा. पवनअ. इंद्राचें वज्र. इ. पु.

**पवित्रं** पुनातीतिपवित्रं, पवित्र

होणारें जें तें. कृ. पूत्रधा पवनका दर्पण अ. न २ निर्मळ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पवित्रकं** निर्मलत्वेन जलं पुना तीतिपवित्रकं, मलरहित करून जलातें पवित्र करितें जें तें. कृ. पूत्रधा. पवनअ. तागाची दो री सूत इत्यादि. अ. न.

**पशुपतिः** पशूनांपतिः पशुपतिः, ब्रह्मादि स्थावरांत जे पशु त्यां चा जो पति म्ह. स्वामी तो. स. म हादेव. इ. पु.

**पशुरज्जुः** पशुबंधनी रज्जुः प शुरज्जुः, पशु बंधन करणारी जी रज्जु ती. स. पशु बांधण्याचा रज्जुविशेष. उ. स्त्री.

**पश्चात्** पश्चिमस्यांदिशिपश्चात्, पश्चिमदिशेच्येठायीं जें तें. न. प श्चिमदिशा. २ अंत्य त्या अर्थी. अ व्य.

**पश्चात्तापः** पश्चात्तापयतीतिपश्चा त्तापः, पश्चात् दुःख देणारा जो तो. कृ. तपधा. संतापअ. मनो विकृतिविशेष. अ. पु.

**पश्चिमं** विग्रहादिपाश्चात्यशब्द प्र. अंत्य म्ह. शेवटचा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पष्ठवाट्** पंचषष्ठंवावहतीतिपष्ठ वाट्. पांच किंवा साहा वर्षे वाह णारा जो तो. कृ. वहधा. प्रापणअ. ज्या बैलाच्या खांद्यावर दमून व टणीस येण्यासाठीं कांहीं लांकुड किंवा जूं बांधितात आणि फिर वितात तो किरभिरीस घातले ला बैल. ह. पु.

**प्रष्ठौही** विग्रहादिप्रष्ठौहिशब्दा प्र. बाळेरंगाची असोन गाभण जी गाय ती. ई. स्त्री.

**पस्त्यं** अपस्त्यायतिइतिपस्त्यं, सं हत होतें जें तें. कृ. स्त्यैधा. संघात अ. घर. अ. न.

**पाकः** पिबतिस्तन्यमितिपाकः, दुग्ध प्राशन करणारा जो तो. कृ. पाधा. पानअ. बालक. २ पच्न अ. पु.

**पाकलं** पाकंलातीतिपाकलं, प चनातें करणारें जें तें. कृ. लाधा. आदानअ. गोडेंकोष्ठ. अ. न.

**पाकशासनः** पाकस्यशासनः पाकशासनः, पाक दैत्याचा जो

शासन कर्ता तो. क्त. इंद्र. अ. पु.

**पाकशासनिः** पाकशासनस्यअपत्यंपाकशासनिः, इंद्राचें जें अपत्य तो. त. इंद्राचा पुत्र. इ. पु.

**पाकस्थानं** पाकस्यस्थानंपाकस्थानं, पाकाचें जें स्थान तें. स. सैंपाक घर. अ. न.

**पाक्यः** पाकेसाधुः पाक्यः, पचनाविषयीं जो साधु तो. बिडलोण. अ. न. २ जवखार. अ. पु.

**पाखंडः** पाखंडयतीतिपाखंडः, श्रौतधर्मातें खंडन करितो जो तो. क्त. खंडिधा. भेदनआ. नास्तिक. अ. पु.

**पांचजन्यः** पंचजनेदैत्येभवःपांचजन्यः, पंचजन दैत्याचेठायीं जो झाला तो. त. विष्णूचा शंख. अ. पु.

**पांचालिका** पंचालदेशेभवा पांचालिका, पंचालदेशाचेठायीं जी उत्पन्न ती. त. बाहुली. आ. स्त्री.

**पाटच्चरः** पाटलंचरतीतिपाटच्चरः, हरण करीत होत्साता गमन करितो जो तो. क्त. चरधा. गतिअ. चोर. अ. पु.

**पाटलः** पाटलोवर्णोस्यास्तीतिपाटलः, पाटल आहे वर्ण ज्यास तो. काहीं पांढरा असोन तांबडा. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ पाटलापुष्प ३ भात. ४ लौकर पिकण्याचा व्रीहि विशेष. अ. न.

**पाटला** पाटलायाः पुष्पंपाटला, पाटलीचें जें पुष्प ती. त. पाडुळीची वेल. आ. स्त्री.

**पाटलिः पाटली** पातीतिपाः टलतीतिटलिः, पाश्चासौटलिश्च पाटलिः, संरक्षण करणारी अशी जी गमन करित्ये ती. स. पाडळीची वेल. इ. २ ई. स्त्री.

**पाठः** पठनंपाठः, पठन जो तो. क्त. पठधा. व्यक्तवाणिअ. अध्ययन. २ ब्रह्मयज्ञ. अ. पु.

**पाठा** पठ्यतेइतिपाठा, आरोग्यप्रत बोलणारी जी ती. क्त. पठधा. व्यक्तवाणिअ. पाहाड मूळ. आ. स्त्री.

**पाठी** पाठोस्यास्तीतिपाठी, ग्रंथ न आहे जीस ती. क्त. पठधा. ग्रंथअ. चित्रक. इन्. पु.

**पाठीनः** भक्ष्यतयाशास्त्रेषुपठ्यते पाठीनः. भक्ष्यत्वें करून शास्त्राचेठायीं बोलिजे तो जो तो. कृ. पठधा. व्यक्तवाणिअ. चित्रक. अ. पु.

**पाट्** पाट धर्तातिपाट्, संबोध्यार्थाविषयीं बोलतें जें तें. कृ. पटधा. भाषणअ. संबोधनार्थी अव्य.

**पाणिः** पणायंत्यनेनपाणिः, लोक ज्याच्या योगानें व्यवहार करितात तो. कृ. पणधा. व्यवहारअ. हात. इ. पु.

**पाणिगृहीती** पाणिः गृहीतो यस्याः पाणिगृहीती, हस्त ग्रहण केलाआहे जीचा ती. स. विवाहित स्त्री. ई. स्त्री.

**पाणिघः** पाणिं हंतीतिपाणिघः, हस्त ताडन करितो जो तो. कृ. हनधा. हिंसादिअ. हातावर गायनाचा ताल धरणारा. अ. पु.

**पादाः** पद्यंतेएभिरितिपादाः, गमन करिजेतात जींहीं करूनते. कृ. पदधाः गतिअ. पाय. २पर्वतविशेष. अ. पु.

**पाणिपीडनं** पाणेः पीडनंपाणिपीडनं, हस्ताचें जें ग्रहण तें. स. लग्न. अ. पु.

**पाणिवादः** पाणिंवादयतीतिपाणिवादः, हस्तानें शब्द करितो जो तो. कृ. वदधा. व्यक्तवाणिअ. हातावर गायनाचा ताल धरणारा. अ. पु.

**पांडुः** पंड्यतेइतिपांडुः, जाणिजे तो जो तो. कृ. पडिधा. गतिअ. शुक्लवर्ण व. पांढरा. वि. उ. पु. स्त्री. नपुं.

**पांडुकंबली** पांडुकंबलेनवृतोरथः पांडुकंबली, पांडुरवर्ण कंबलानें वेष्टित जो रथ तो. त. पांढऱ्या कांबळ्यानें वेष्टित रथ वगैरे. इन् पुल्लिंगी.

**पांडुरः** पांडुत्वंअस्यास्तीतिपांडुरः शुक्लत्व आहे जास तो. त. शुक्लवर्ण व. पांढरा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पातकं** पातयतीतिपातकं, पातन करितें जें तें. कृ. पत्लृधा. गतिअ. पाप. अ. न.

**पातालं** पततिअत्रइतिपात् तत् आलातीतिपातालं, पतन करतें ज्याचेठायीं तें पात त्यानें ग्रहण करितें जें तें. कृ. लाधा. आदानअ. पाताल लोक. २वडवाग्नि ३छि

द्र. अ. न.

**पातुकः** विग्रहादिपतयालुशब्दा प्रमाणें. पतनशील ह्म. पडणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पात्रं** पिबत्यनेनपात्रं, उदकादि प्राशन होतें जेणें तें. क्रु. पाधा. पानअ. भांडें. २ दोन तीरांचे मधिल भाग. ३ योग्य. उ. दान पात्रंश्रोत्रियः अ. न. को. होम पात्र, पान, प्रधान, नाचण्याचें अनु करण करणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पाथः** पीयतेइतिपाथः, प्राशन करिजेतें जें तें. क्रु. पाधा. पानअ. उदक. स. न.

**पादः** पद्यतेसोपादः, गमन क रणारा जो तो. क्रु. पद्धा. गति अ. चरण. २ किरण. ३ चतु र्थांश. ४ पर्वता जवळचा जो ल हान पर्वत तो. अ. पु.

**पादकटकः** पादस्यकटकःपाद कटकः, पायाचें जें भूषण तें. स. पादभूषण ह्म. तोरड्या. अ. पु.

**पादग्रहणं** पादयोर्ग्रहणंपादग्र हणं, चरणाला जो स्पर्श तें. स. नामगोत्रोच्चार पूर्वक नमस्कार. अ. न.

**पादपः** पादैःपिबतीतिपादपः, मू ल चरणांनीं उदकातें प्राशन करि तो जो तो. क्रु. पाधा. पानअ. वृक्ष. अ. पु.

**पादबंधनं** पादेबंधनंयस्यवापा दबंधनं, पादाचेठायींबंधन किंवातेंआ हेज्यास तें. स. पायांचें बंधन. २ गाय ह्मैस इत्यादि पशु. अ. न.

**पादस्फोटः** पादौस्फोटयतीति पादस्फोटः, पायांचा भेद करणा रा जो तो. क्रु. स्फुटधा. विकसन अ. खोंटा फुटण्याचा रोग. अ. पु.

**पादाग्रं** पादस्याग्रंपादाग्रं, चरणा चें जें अग्रतें. स. पायांचें अग्र च वडा. अ. न.

**पादांगदं** पादस्यअंगदंपादांग दं, पायांचें जें भूषण तें. स. तो रड्या पैंजण. अ. न.

**पादातः** विग्रहादिपदातिशब्दा प्रमाणें. अ. पु.

**पादातं** पदातीनांसमूहः पादातं, पदातींचा जो समुदाय तें. स. पाया नींजाणाऱ्याचासमूह. २पादचारी. अ. न. २पु.

**पादातिकः** पादाभ्यामततीति पादातिः सएवपादातिकः, पायांनीं चालणारा जो तो. पादाति तोच पादातिक. कृ. अतधा. सातत्यगमनअ. पायीं जाणारा. २ पदातींचा समूह. अ. पु.

**पादाविकः** पादाभ्यामवतीतिपादाविकः, पायांनीं चालणारा जो तो. कृ. अवधा. रक्षणादिअ. अर्थादिसर्व पादातिकश. प्र. अ. पु.

**पादुका** पादुरेवपादुका, पादु जी तीच त. चर्मीजोडा. आ. स्त्री.

**पादूः** पद्यतेऽनयापादूः, गमन करिजेतें जीणेंकरून ती. कृ. पद धा. गतिअ. चर्मीजोडा. ऊ. स्त्री.

**पादूकृत्** पद्यतेनयापादूः पादूंकरोतीतिपादूकृत, गमनकारीउपानहकरितो जो तो. कृ. डुकृञ्धा. करण अ. चांभार. त्र. पु.

**पाद्यं** पादार्थमुदकंपाद्यं, पादार्थ जें जल तें. त. पाय धुण्याचें पाणि अ. न.

**पानं** पीयतेतत्पीयतेस्मिन्पानं, पानकिंवा तें करिजे तें जाचेठायीं तें. कृ. पाधा. पान अ. प्राशन. २ दारूचें दुकान. अ. नपुंसक.

**पानपात्रं** पानस्यपात्रंपानपात्रं, प्राशन करण्याचें जें पात्र तें. स. प्राशन करण्याचें पात्र. अ. न.

**पानगोष्ठिका** पानस्यगोष्ठिकापानगोष्ठिका, पानाचें जें स्थान ती. स. मद्यप्राशनार्थ जमलेली मंडळी. अ. न.

**पानीयं** पातव्यंपानीयं, प्राशन करावयास योग्य जें तें. कृ. पाधा. पानअ. पाणि. अ. न.

**पानीयशालिका** पानीयस्य शालापानीयशाला सेवपानीयशालिका, पाण्याची जी शाला तीच पानीयशालिका, त. लोकांस पाणी प्यावयास देण्याची शाला ह्म. पाणपोई. आ. स्त्री.

**पांथः** पंथानंनित्यंगच्छतीतिपांथः, मार्गाप्रत नित्य गमन करणारा जो तो. त. मार्गस्थ. अ. पु.

**पापं** पापमस्यास्तीतिपापं, पाप आहे जास तो. त. पातक. अ. न. २ परद्रोहशील. क्रूर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पापघ्नेली** पापेच्चलतीतिपापघ्नेली, पापजनितरोगनाशार्थग

मन करित्ये जी ती. क्रृ. चलधा. कंपनअ. पाहाडमूळ. ई. स्त्री.

**पाप्मा** पतंतिनरकेयेनेतिपाप्मा, पडताहेत नरकाचेठायीं जेणें करून तें. क्रृ. पत्लृधा. गतिअ. पाप. न्. पु.

**पामा** पायतीतिपामा, अंगशुष्क करित्ये जी ती. क्रृ. पैधा. शोषणअ. रोगविशेष. २ खरूज. अ. पु.

**पामनः** पामास्त्यस्यपामनः, पामा ह्म. खरूज आहे जास तो. त. जास ओली खरूज जाहलि आहे तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पामा** विग्रहादिपामन् शब्दाप्रमाणें. रोगविशेष. २ ओलि खरूज. आ. स्त्री.

**पामरः** पाःधर्मोम्रियतेयेनपामरः, धर्मनाश होतो जेणें करून तो. क्रृ. मृङ्धा. प्राणत्यागअ. नीच ह्म. अधम. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पायसः** पयसोविकारःपायसः, दुग्धाचा जो विकार तो. त. क्षीर. २ धूप. अ. सु. २ पु.

**पायुः** पातिगलतिविष्ठानेनपायुः, विष्ठा बाहेर निघत्ये जेणें करून तें. क्रृ. पाधा. रक्षणअ. गुदस्थान. उ. पु.

**पाय्यं** मीयतेनेनपाय्यं, मान करिजेतें जेणें करून तें. क्रृ. माङ्धा. मानअ. प्रमाण. अ. न.

**पारं** पार्यतेउत्तारणकर्मअत्रसमाप्यतेपारं, उतरताहेत लोक जाचेठायीं तें. क्रृ. पारधा. कर्मसमाप्तिअ. पलिकडील तीर. अ. न.

**पारतः** पारंतनोतीतिपारतः, संसार पार करितो जो तो. क्रृ. तनुधा. विस्तारअ. धातुविशेष ह्म. पारा. अ. पु.

**पारदः** पारंददातीतिपारदः, लिंगादिकाच्या पूजनेकरून संसारपार करणारा जो तो. क्रृ. दाञ्धा. दानअ. पारा. अ. पु.

**पारशवः** परस्त्रुरेवपरस्त्रियाअपत्यं वापारशवः, परस्त्रु किंवा परस्त्रीचा जो पुत्र तो. त. शस्त्र विशेष. २ शूद्रीचेठायीं ब्राह्मणापासून उत्पन्न जो पुत्र तो. अ. पु.

**पारश्वधिकः** परश्वधः प्रहरणमस्यपारश्वधिकः, पर्शु आहे प्रहरण जाचें तो. त. परशूनामक शस्त्र

धारण करणारा. अ. पु.

**पारसीकः** पारसीकेषुभवः पारसीकः, पारसीक देशांत होणारा जो तो. त. वनायु देशांत जालेला घोडा. अ. पु.

**पारस्त्रैणेयः** परस्त्रियाः अपत्यं पारस्त्रैणेयः, परस्त्रीचा जो पुत्र तो. त. परस्त्रीचा पुत्र. अ. पु.

**पारावतः** पारादपिप्रेम्णाआपततीतिपारावतः, नद्यादिकांच्या परतीराहून प्रेमानें शीघ्र येतो जो तो. कृ. पत्लृधा. गतिअ. पारवा. २ खबुतर. अ. पु.

**पारावारः** पारमावृणोतीतिपारावारः, पारमपारमस्यदुस्तरत्वादितिवा, तीरातें व्याप्त करितो जो तो. कृ. वृञ्धा. वरणअ. समुद्र. अ. पु.

**पारायणं** पारस्यायनंपारायणं, समासीचें जें, अयन ह्म. स्थान तें. स. साकल्य वचन. अ. न.

**पारावतः** परंजीवयतीतिपरावान् दत्ताभयस्तस्यायंपारावतः, दुसऱ्या जीवातें रक्षितो तो परावान् त्याच्या जो अयं ह्म. गुरू तो. त. पारवा. २ खबुतर. अ. पु.

**पारावतांघ्रिः पारावतांघ्री** पारावतइव अंघ्रिरस्याःपारावतांघ्रिः पारव्या सारिखा आहे अंघ्रिह्म. चरण जीचा ती. स. मालकांगोणी. इ. २ ई. स्त्री.

**पारावारः** पारंआवृणोतीतिपारावारः, पार ह्म. परतीर जें त्याप्रत आवरण करितो जो तो. कृ. वृञ्धा. वरणअ. समुद्र. अ. पु. २ दोनतीरें. अ. पु. न.

**पाराशरी** पराशरस्यगोत्रापत्यंपाराशर्यस्तेनप्रोक्तं सूत्रमधीतेपाराशरी, पराशरगोत्रांत उत्पन्न जो पाराशर्य त्यानें उक्त जें भिक्षुसूत्र त्यातें अध्ययन करणारा जो तो. त. संन्यासी. इन्. पु.

**पारिकांक्षी** पारमत्राकांक्षतीतिपारी, ब्रह्मज्ञानं तत्कांक्षतीतिपारिकांक्षी, ब्रह्मज्ञानाची इच्छा करणारा जो तो. कृ. कांक्षिधा. कांक्षाअ. तपस्वी. इन्. पु.

**पारिजातकः** पारिणोअंजीतः पारिजातः सएवपारिजातकः, पारि ह्म. समुद्र त्यापासून झाला जो तो पारिजात तोच पारिजातक. त.

कल्पवृक्ष विशेष. २ कडूनिंबाचें - झाड. अ. पु.

**पारितथ्या** परितथ्यभूतापरितथा सैवपारितथ्या, सत्यभूत जी ती परितथा तीच पारितथ्या. त. स्त्रियांच्या मस्तकांतील भांगाचा भूषण विशेष. आ. स्त्री.

**पारियात्रकः** परितोयात्रयाद्दश्यतेपारियात्रः सएवपारियात्रकः, आसमंतात मार्गीं जें गमन तेणेंकरून अवलोकिजेतो जो तो पारियात्र तोच पारियात्रक. त. पर्वतविशेष. अ. पु.

**पारिप्लवः** परिप्लवएवपारिप्लवः, परिप्लव जोतोच. त. चंचळ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पारिभद्रः** पारिपारंगतंभद्रमस्मात्सपारिभद्रः, पारंगत आहे कल्याण जें तें जापासून तो. स. कडुनिंबाचें झाड. अ. पु.

**पारिभद्रकः** पारिनिष्ठांप्राप्तंभद्रमस्मात्पारिभद्रकः, पारंगत आहे कल्याण जें तें जापासून तो. स. देवदारु. अ. पु.

**पारिभाव्यं** परिभावेसाधुः पारिभाव्यं, बालादिकांस अनादराविषयीं जें साधु तें. त. कडू व गोडें कोष्ट. अ. न.

**पारिषदः पारिषद्यः** परिषदिसाधुः पारिषदः, सभेचाठायीं जो उत्तम तो. त. सभासद. अ. पु.

**पारिहार्यः** परिन्हीयतेपरिहार्यः सएवपारिहार्यः, स्वीकृत करिजे तो जो तो परिहार्य तोच पारिहार्य कृ. ह्रञ्धा. हरणअ. प्रकोष्ठाभरण ह्म. पोहची. अ. पु.

**पारी** पारयतीतिपारी, हत्तीच्या पाद बंधनातें पूरण करित्ये जी ती कृ. पृधा. पूर्तिअ. हत्तीच्या पायांस बांधावयाचा रज्जू. ई. स्त्री.

**पारुष्यं** परुषोनिष्ठुरभाषयंतस्यभावः पारुष्यं, निष्ठुरभाषणाचा जो प्रकार ह्म. भाषणतें. त. निष्ठुरभाषण. २ कठोरपणा. अ. न.

**पार्थिवः** पृथिव्याःईश्वरः पार्थिवः, पृथिवीचा जो स्वामी तो. त. राजा. अ. पु.

**पार्वती** पर्वतस्येयंपार्वती, हिमालय पर्वताची जी कन्या ती. त. महादेवाची बायको. ई. स्त्री.

**पार्वतीनंदन:** पार्वत्याः नंदनः पार्वतीनंदनः, पार्वतीचा जो नंदन ह्म. पुत्र तो. स. कार्तिकस्वामी. अ. पु.

**पार्श्व** पृश्यतेइतिपार्श्वं, स्पर्श करिजेतें जें तें. कृ. स्पृशधा. संस्पर्शनअ. पाठ. २ पर्शुका नामाचा अस्थिविशेषांचा समूह. अ. न.

**पार्ष्णि:** पृष्यतेअनेनपार्ष्णिः, ज्याच्या योगानें हिंसन होतें तो. कृ. पृषुधा. सेचनादिअ. पायाची खोट. इ. पु.

**पार्ष्णिग्राह:** पार्ष्णिंपश्चात्पदं गृह्णातीतिपार्ष्णिग्राहः, पृष्ठ भागानें रक्षण करणारा जो तो. कृ. ग्रहधा. उपादानअ. राजा शत्रूस जिंकण्या करितां पुढें गेला असतां मागें त्यानें राज्य घेऊं इच्छिणारा. अ. पु.

**पालघ्न:** पालंक्षेत्रंहंतीतिपालघ्नः, क्षेत्रातें नाश करितो जो तो. कृ. हनधा. हिंसाअ. वेरवंडा सारखा जलतृण विशेष. अ. पु.

**पालंक्य:** पालाअंक्यतेअनेनेतिपालंक्यः, रक्षकअंकित होतो जेणें तो. कृ. अंकधा. रक्षणादिअ. पोईचीशाक. अ. पु.

**पालाश:** पलाशस्यपत्रस्ययंपालाशः, पर्णसंबंधि जो तो. त. हिरवा वर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पालि: पाली** पालतीतिपालिः, रक्षण करणारी जी ती. कृ. पाधा. रक्षणअ. सुरी तलवार इत्यादि जीं शस्त्रें त्यांचें टोक. २ माडी. ३ चिन्ह. ४ पंगत. इ. २ ई. स्त्री.

**पालिंदी** पालयतीतिपालिंदी, संरक्षण करिते जी ती. कृ. पाधा. रक्षणअ. काळातेंडू. ई. स्त्री.

**पावक:** पुनातेइतिपावकः, पवित्र करितो जो तो. कृ. पूञ्धा. पवनअ. विस्तव. अ. पु.

**पाश:** पाश्यतेइतिपाशः, बंधन केला जातो जो तो. कृ. पशधा. बंधनअ. फांस. अ. पु.

**पाशक:** पाशयतीतिपाशकः, बंधन करितो जो तो. कृ. पाशधा. बंधनअ. खेळण्याचा फांसा. अ. पु.

**पाशी** पाशोस्यास्तीतिपाशी, पाशायुध आहे ज्यास तो. त. वरुण नामक देवविशेष. इन्. पु.

**पाशुपत:** पशुपतेरयंपाशुपतः, पशुपति संबंधि जो तो. त. रुई मंदा

रक्षक. अ. पु.

**पाशुपाल्यं** पशून्पालयतिपशुपालः, तस्यकर्मपाशुपाल्यं, पशुरक्षण करणाराचें जें कर्म तें. त. पशूचें रक्षण. अ. न.

**पांशुः** पंशतीतिपांशुः, नाश करणारी जी ती. कृ. पशिधा. नाशन अ. धूलि. २ दोष. उ. पु.

**पांशुला** पांशुअस्तिअस्याः पांशुला, पाप आहे जीस ती. त. व्यभिचारिणी बायको. आ. स्त्री.

**पाश्या** पाशानांसमूहः पाश्या, पंशांचा जो समूह ती. त. पाशांचा समूह. आ. स्त्री.

**पाश्चात्यं** पश्चाद्भवंपाश्चात्यं, पश्चात् होतें जें तें. त. शेवटचा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पाषाणः** पिनष्टीतिपाषाणः, संचूर्णन करितो जो तो. कृ. पिच्लृधा. संचूर्णनअ. दगड. अ. पु.

**पाषाणदारणः** पाषाणोदार्यतेनेनपाषाणदारणः, पाषाण विदारण करिजेतो जेणें तो. कृ. दृधा. विदारणअ. दगड फोडण्याचा घण. अ. पु.

**पांसूः** विग्रहादिसर्वपांशुशब्द.

**पांसुला** पांसुः पापमस्त्यस्याः पांसूला, पाप आहे जीस ती. त. व्यभिचारिणी बायको. आ. स्त्री.

**पिकः** अपिकायतीतिपिकः, सुंदर शब्द करणारा जो तो. कृ. कैधा. शब्दअ. कोकिलपक्षी. अ. पु.

**पिंगः** पिंक्तेइतिपिंगः, पिंगट वर्णातें करितो जो तो. कृ. पिजिधा. वर्णअ. पिंगट वर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पिंगलः** पिंगः अस्तियस्यसः पिंगलः, पिंगट वर्ण आहे ज्यास तो. त. पिंगट वर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ सूर्याचा गणविशेष. अ. पु.

**पिंगला** पिंगलः अस्तियस्याः सापिंगला, पिंगट वर्ण आहे जीस ती. त. वामन नामा जो दक्षिण दिशेचा हत्ती त्याची स्त्री. आ. स्त्री.

**पिचंडः पिचिंडिः** अपिचमत्यन्नं पिचंडः, अन्न भक्षण करणारा जो तो. कृ. चमुधा. अदन अ. जठर. अ. पु. इ. पु.

**पिचंडिलः** प्रशस्तंपिचंडउदरं यस्यपिचंडिलः, मोठें आहे उ

दूर जावें तो. त. दोंदिल. अ. पु.

पिचुतूल: पिचुश्चासौतूलश्चपिचुतूल:, क्षोद करणारा असाजो तूल म्ह. बाहिर निघणारा तो. स. कापूस. अ. पु. न.

पिचुमंद: पिचुंमंदयतीतिपिचुमंद:, कुष्टरोगातें मंद करितोजो तो. कृ. मदिधा. स्वशादिअ. निंबवृक्ष. अ. पु.

पिचुमर्द: पिचुंमर्दयतीतिपिचुमर्द:, कुष्ट रोगातें नाश करितो जो तो. कृ. मृदधा. क्षोदअ. निंबवृक्ष. अ. पु.

पिचुल: पिचुंलातीतिपिचुल:, शुभ्रवर्णातें ग्रहण करितो जो तो. कृ. लाधा. आदानअ. तिळ्याचे झाडांतील एकभेद. २कापूस. अ. पु.

पिच्चटं पिच्चयतीतिपिच्चटं, रोगादिकातें नाश करितें जें तें. कृ. पिच्चधा. छेदनअ. कथील. अ. न.

पिच्छं पिच्छ्यतेइतिपिच्छं, छेदन होइ जे तें जें तें. कृ. पिच्छधा. कुट्टनअ. मोराचें पिस. अ. न.

पिच्छा पतितुमिच्छतीतिपिच्छा, पतनाविषयीं इच्छा करित्ये जी ती. कृ. इषधा. इच्छाअ. सांवरी चाडीक. आ. स्त्री.

पिच्छिलं पिच्छास्त्यस्यपिच्छिलं, मंड आहे जास तें. त. मंडयुक्त दहीं वगैरे. अ. न.

पिच्छिला पिच्छाशाल्मलिपुष्पनिर्यासोस्यास्तीतिपिच्छिला, शाल्मलिपुष्प निर्यास आहे जीस ती. त. सांवरीचें झाड. २शिसव्याचें झाड. आ. स्त्री.

पिंज: पिंजनंपिंज:, हिंसनजें तें. कृ. पिजिधा. हिंसाअ. वध. २धान्याची वगैरे रास. अ. पु.

पिंजरं पिंजंवर्णविशेषंरातीतिपिंजरं, वर्णविशेष ग्रहण करितें जें तें. कृ. राधा. आदानअ. हरताळ. २पिंजरा. अ. न.

पिंजल: पिंजतेइतिपिंजल:, व्याकुल होणारा जो तो. कृ. पिजिधा. हिंसाअ. अत्यंत व्याकुल. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

पिट: पिटतीतिपिट:, गणना करणारा जो तो. कृ. पिटधा. शब्दसंघातअ. पांटी, टोपली वगैरे. अ. पु.

पिटक: पिटका पिटतीतिपि

टकः, शरीर नाश कारितो जो तो. कृ. पिटधा. शब्द संघात अ. फोड. अ. पु. २ वस्त्रें अलंकार इत्यादि ठेवण्याची पेटी. आ. स्त्री.

**पिठर:** पेठतीतिपिठं पिठंरातीति पिठरः, अन्नादि ग्रहण करणारा जो तो. कृ. राधा. आदान अ. त पेली वगैरे. अ. पु. २ मोथा. ३ मंथन दंड. अ. न.

**पिंड:** पिंडतेइतिपिंडः, संघीभूत होणारा जो तो. कृ. पिंडिधा. संघात अ. मृत्तिकेचा वगैरे गोळा. २ वेळूचें मांडें स. कृणिग पांटि इत्यादि. ३ रस्त्या बोळ. अ. पु. ४ लोखंड. अ. न.

**पिंडक:** पीड्यतेइतिपिंडकः, नाश करिजे तो जो तो. कृ. पिडिधा. संघात अ. लोबान ऊद. अ. पु.

**पिंडिका** पीड्यंते अरायस्यांपिंडिका, अरा संलग्न होतात जीच्याठायीं ती. कृ. पिडिधा. संघात अ. रथादिकांचे चाकाची मध्यभाग. आ. स्त्री.

**पिंडीतक:** पिंडीतनोतीतिपिंडीतकः, देहातें विस्तार करितो जो तो. कृ. तनुधा. विस्तार अ. गी क्याचें झाड. अ. पु.

**पिण्याक:** पण्यतेइतिपिण्याकः, व्यवहृत करिजे तो जो तो. कृ. पणधा. व्यवहार अ. तिळांची पेंड. २ ऊद लोबान. ३ हिंग. अ. पु. न.

**पितरौ** समासादिमातापितरश. प्र. आई आणि बाप.

**पितामह:** पितुः पितापितामहः, पित्याचा जो पिता तो. बापाचा बाप. २ ब्रह्मदेव. अ. पु.

**पितामही** पितामहस्यस्त्रीपितामही, पितामहाची जी स्त्री ती. स्त्री प्र. बापाची आई. ई. स्त्री.

**पिता** पातीतिपिता, रक्षण करणारा जो तो. कृ. पाधा. रक्षण अ. बाप. ऋ. पु.

**पितृदानं** पितृभ्योदानंपितृदानं, पितरांकारणें जें दान तें. स. पितरांचे उद्देशानें जें दान तें. अ. न.

**पितृपति:** पितॄणांपतिः पितृपतिः, पितरांचा जो पति तो. स. यम. इ. पु.

**पितृप्रसू:** पितॄणांप्रसूर्मातापितृप्रसूः, पितरांची जी प्रसू स. ज

ननी तो. स. संध्याकाळ. ऊ. स्त्री.

**पितृयज्ञः** पितृणांयज्ञःपितृय ज्ञः, पितरांचें जें पूजन तो. स. पितरांस अन्नपाणी देऊन तृप्त करणें. अ. पु.

**पितृवनं** पितृणांवनंपितृवनं, पितरांची जी भूमि ती. स. प्रेतभूमी. अ. न.

**पितृव्यः** पितुर्भ्रातापितृव्यः, बापाचा जो भाऊ तो. स. चुलता. अ. पु.

**पितृसन्निभः** पितेवसन्निभातीतिपितृसन्निभः, पित्यासारखा शोभतो जो तो. कृ. भाधा. दीप्तिअ. बापासारखा. अ. पु.

**पित्तं** अपिदयतेस्मपित्तं. देहाचें रक्षण करितें जें तें. कृ. देङ्धा. रक्षणअ. पित्त. अ. न.

**पित्सन्** पतितुमिच्छुःपित्सन्, गमन करावया कारणें इच्छा करणारा जो तो. कृ. पत्लृधा. गतिअ. पक्षि. त. पु.

**पिधानं** अपिधीयतेइतिपिधानं, आच्छादिजेतेंजें तें. कृ. डुधाञ्धा. धारणादिअ. आच्छादित करणें. २ आच्छादन. अ. न.

**पिनद्धः** विग्रहादिअपिनद्ध शा. प्र. आंगात आंगरखा वगैरे घातलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पिनाकः** पातिरक्षतीतिपिनाकः, संरक्षण करतो जो तो. कृ. पाधा. रक्षणअ. महादेवाचें धनुष्य. २ त्रिशूल. अ. पु. न.

**पिनाकी** पिनाकोधनुरस्यास्तीतिपिनाकी, पिनाक नामक आहे धनुष्य ज्याचें तो. त. महादेव. इन्. पु.

**पिपासा** पातुमिच्छापिपासा, पान करावया कारणें जी इच्छा ती. कृ. पाधा. पानअ. तृषा. आ. स्त्री.

**पिपीलिका** अपिपील्यतेइतिपिपीलिका, रुद्ध होइजेत्ये जी ती. कृ. पीलधा. प्रतिष्टंभअ. मुंगि. आ. स्त्री.

**पिप्पलः** पिप्पलंजलंमूलेसिक्तत्वस्तीतिपिप्पलः, उदक आहे मूलाचेठायीं ज्याचा तो. त. पिंपळाचें झाड. अ. पु.

**पिप्पलिः पिप्पली** पिपर्तीतिपिप्पलिः, संरक्षण करित्ये जी ती. कृ. पृधा. पालनादिअ. पिंपळी. इ. २

ई. स्त्री.

पितृपिता पितुः पितापितृपिता, बापाचा जो बाप तो. स. बापाचा बाप. रू. पु.

पिप्पलीमूलं पिप्पल्याः मूलंपिप्पलीमूलं पिंपळीचें जें मूळ तें. स. पिंपळमूळ. अ. न.

पिप्लुः अपिप्लवतेइतिपिप्लुः, गमन करणारा जो तो. रू. प्लुङ्धा. गति अ. शरीरावर कवित्काळें चिन्ह असतें तें. उ. पु.

पियालः पीयतेइतिपियालः, रक्षण करिजे तो जो तो. रू. पाधा. रक्षण अ. चारानें झाड. अ. पु.

पिलुः विग्रहादीकल्नाक्षश. प्र. चिपटे डोळ्यांचा. अ. पु.

पिशंगः पेशतीतिपिशंगः, पदार्थ अवयवातें रंजित करितो जो तो. रू. पिशधा. अवयवअ. पिंगटवर्ण. अ. पु.

पिशाचः पिशितमश्नातीतिपिशाचः, मांसातें भक्षितो जो तो. रू. अशधा. भक्षणअ. मांस भक्षक भूत विशेष. अ. पु.

पिशितं पिंशतीतिपिशितं, अवयव इन्द्री करणार जें तें. रू. पिशधा. अवयवअ. मांस. अ. न.

पिशुनः पिंशतीतिपिशुनः, भेद करितो जो तो. रू. पिशिधा. अवयव अ. परस्पर विघड करणारा. २ कानांत दुसऱ्याची निंदा सांगणारा. ३ दुर्जन. अ. पु.

पिशुना पिशतीतिपिशुना, अवयव इन्द्रीतें करित्ये जी ती. रू. पिशधा. अवयवअ. लताविशेष पिंडिका. आ. स्त्री.

पिष्टकः पिष्टस्यविकारः पिष्टकः, पिष्टाचा जो विकार तो. त. वडा घारगाइत्यादि. अ. पु.

पिष्टपचनं पच्यतेऽत्रपचनं, पिष्टस्यपचनं पिष्टपचनं, पिष्टपाक करणारें जें तें. स. तवा कढई इत्यादि अ. न.

पिष्टातः पिष्टमततीतिपिष्टातः, पिष्टाप्रत निरंतर गामी जो तो. रू. अतधा. सातत्यगमनअ. बुका. अ. पु.

पीठं पिठत्यत्रपीठं, क्लेशपावतो जाचेठायीं तें. रू. पीठधा. हिंसादिअ. आसन. अ. पु. न.

**पीडनं** पीड्यतेइतिपीडनं, विलोडन जें तें. क्रु. पीडधा. अवगाहअ. धान्यादिकांनीं संपन्न जो देश त्यास पर राजचक्रापासून जी पीडा तें. २ पीडा. अ. न.

**पीडा** पीड्यतीतिपीडा, दुःखादि संयुक्त करित्येजी ती. क्रु. पीडधा. अवगाहअ. दुःख. २ मनास जें दुःख तें. आ. स्त्री.

**पीतः** पिबतिवर्णांतरमितिपीतः, वर्णांतरातें प्राशन करितो जो तो. क्रु. पाधा. पानअ. पिवळा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पीतंदारु** पीतंदारुर्यस्यतत्पीतदारु, पिवळें आहे काष्ठ ज्याचें तो. स. दारुहळद. उ. पु. २ देवदारूचें झाड. उ. न.

**पीतद्रुः** पीयतेचक्षुषायामितिपीतः सचासौद्रुश्चपीतद्रुः, नेत्रेंकरून आदरावलोकन करिजेतो असा जो वृक्ष तो. स. देवदारूचें झाड. उ. पु.

**पीतनं** पीतं करोतीतिपीतनः, पिवळा रंग करणारा जो तो. क्रु. कृञ्धा. करणअ. आंबाड्याचें झाड. अ. पु. २ कुंकुम. ३ हरताळ. अ. न.

**पीतसारकः** पीतःसारोयस्यपीतसारकः, पिवळा आहे सार म्ह. गाभा ज्याचा तो. स. आसणाचें झाड. अ. पु.

**पीता** पीयतेइतिपीता, पान करिजेत्ये जी ती. क्रु. पाधा. पानअ. हळद. आ. स्त्री.

**पीतांबरः** पीतमंबरंयस्यसपीतांबरः, पीतवर्ण आहे वस्त्र ज्याचें तो. स. विष्णु. अ. पु.

**पीतिः** पिबतीतिपीतिः, पान करणारी जी तो. क्रु. पाधा. पानअ. प्राशन. इ. स्त्री. २ घोडा. इ. पु.

**पीनः** प्यायतेस्मपीनः, वृद्धी पाविजेतो जो तो. क्रु. ओप्यायीधा. वृद्धिअ. पुष्ट. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पीनसः** पीनंस्यतीतिपीनसः, पुष्टाचा नाश करणारा जो तो. क्रु. षोधा. अंतकर्मअ. रोगविशेष म्ह. पडसें. अ. पु.

**पीनोध्नी** पीनमूधोस्याःपीनोध्नी, पुष्ट आहे ऊध म्ह. ओठि जीची ती. स. मोठे कासेची गाय. ई. स्त्री.

**पीयूषं** पीयतइतिपीयूषं, देवांनीं प्राशेन करिजेतें जें तें. कृ. पाधा. पानअ. अमृत. अ. न. २ नवीन वियालेल्या गाईचें सात दिवस पर्यंत दूध. अ. पु.

**पीलुः** पीलतीतिपीलुः, रोधकारि तो जो तो. कृ. पीलधा. प्रतिष्टंभअ अक्रोड वृक्ष. २ हत्ती. ३ बाण. ४ पुष्प. उ. पु.

**पीलुपर्णी** पीलोरिवपर्णान्यस्याइतिपीलुपर्णी, अक्रोडा सारिखीं आहेत पानेंजीचीं ती. स. मुरवेल. ई. स्त्री.

**पीवः** प्याय्यतेइतिपीवः, वृद्धी पाविजेत्तोजो तो. कृ. ओप्यायीधा. वृद्धिअ. पुष्ट. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पीवरं** विग्रहादिसर्वपूर्वींच्याशब्दा प्रमाणें.

**पीवरस्तनी** पीवरास्तनाः यस्याः सापीवरस्तनी, पुष्ट आहेत स्तन जीचे ती. स. मोठे स्तनाची. ई. स्त्री.

**पुक्कसः** पुक्कुत्सितंपरुषंकसतीतिपुक्कसः, निंद्य परुषाप्रत प्राप्तजो तो. कृ. कसधा. गतिअ. चांडाळ. अ. पु.

**पुंखः** पुमांसंखनतीतिपुंखः, पुरुषातें विदारण करिती जो तो. कृ. खनुधा. अवदानअ. बाणाचाअवयवविशेष. अ. पु.

**पुच्छं** पुच्छतीतिपुच्छं, भूमीवर लोळणारें जें तें. कृ. पुच्छधा. प्रमादअ. शेंपटी. अ. पु. न.

**पुंजः** पिंजयतीतिपुंजः, संघीभूत होणारा जो तो. कृ. पिंजिधा. हिंसादिअ. धान्यादिकाची रास. अ. पु.

**पुटं** पुटतीतिपुटं, संबद्ध होतें जें तें. कृ. पुटधा. संश्लेषणअ. पात्र. अ. न.

**पुटभेदाः** जलशिरोरूपंपुटंभित्वानिर्यांतितेपुटभेदाः, जलाचें जें शिरस्थ. अग्रभाग तेंच पर्ण त्यातें भेद करून निघतात ते. कृ. भिदिरधा. विदारणअ. चक्राकार जें जल त्याली जातें तें. भोवरी. अ. पु.

**पुटभेदनं** पुटानिपात्राणिभिद्यंतेअत्रइतिपुटभेदनं, पत्रें विदीर्ण होतात ज्याचेठायीं तें. कृ. भिदिरधा. विदारणअ. शहर. अकारांत. नपुंसक.

**पुंडरीकः** पुंडरिकमस्तियस्यस

पुंडरीक:, पुंडरीककमलसदृश आहे वर्ण ज्याचा तो. त. आग्नेय दिशेचा हत्ति. अ. पु. २ श्वेतकमल. पु. न. ३ वाघ. ४ अग्नि. अ. पु.

**पुंडरीकाक्ष:** पुंडरीकइवअक्षिणी यस्यस पुंडरीकाक्ष:, कमला सारिखीं आहेत अक्षि ह्म. नेत्रें ज्याचीं तो. स. विष्णु. अ. पु.

**पुंडर्य** पुंडयतीतिपुंडं, तत् अर्यं यस्यतत् पुंडर्य, नाशक आहे प्रधान ह्म. बीज ज्याचें तो. स. ज्याचीं पानें सालवणा सारखीं असतात असें जें स्थल कमल तें. अ. न.

**पुंड्र:** पुंड्यतेइतिपुंड्र:, इतर सौंदर्याप्रत खंडन करिजे तो जो तो. कृ. पुडिधा. खंडनअ. घोड्याचे वगैरे रूपाच्यावर चित्र नाम असे तो तो. २ उसांतील एक भेद. अ. पु.

**पुंड्रक:** पृडतीतिपुंड्रक:, सुख करणारा जो तो. कृ. पृडृधा. सुखअ. फुल झाड विशेष ह्म. मधुमालती. अ. पु.

**पुण्य:** पुणतिशुभंकरोतीतिपुण्य: शुभकर्म करितो जो तो. कृ. पुणधा. शुभकर्मअ. पवित्र. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ सुंदर. ३ सुख देणारा धर्म. ४ सुकृत. अ. न.

**पुण्यजन:** पुण्यश्चासौजनश्च पुण्यजन:, पुण्यसंज्ञक जो जन तो. स. राक्षस. अ. पु.

**पुण्यजनेश्वर:** पुण्यजनानांईश्वर: पुण्यजनेश्वर:, पुण्यजनांचा जो स्वामी तो. स. कुबेर. अ. पु.

**पुण्यभूमि:** पुण्याचासौभूमिश्चपुण्यभूमि:, पुण्यकारक अशी जी भूमी ती. स. विंध्याद्री व हिमालय ह्यांची मध्यभूमि. इ. स्त्री.

**पुण्यवान्** पुण्यमस्यास्तिपुण्यवान्, पुण्य आहे ज्यास तो. त. भाग्यवान्. वि. त्. पु. न. ई. स्त्री.

**पुद्गल:** पुत्गिलतीतिपुद्गल:, कुत्सित अज्ञानातें नाश करितो जो तो. कृ. गृधा. गिळणअ. आत्मा. २ देह. अ. पु. ३ सुंदर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पुत्तिका** पुत्कुत्सितंतायतेइतिपुत्तिका, कुत्सित संतान करणारी जी ती. कृ. तायृधा. संतानादिअ. तुप सारिखा मध उत्पन्न करणारी माशी. आ. स्त्री.

पुत्रः पुत्री पुन्नरकात्त्रायतेइति पुत्रः, पुन्नाम नरकापासून रक्षण करणारा जो तो. कृ. त्रैङ्. धा. पालनअ. मुलगा. अ. पु. २ मुलगी. ई. स्त्री.

पुत्रौ पुत्रश्चदुहिताचपुत्रौ, पुत्र आणि कन्या जी ती. स. पुत्र आणि कन्या. नि. द्वि. अ. पु.

पुनः मुत्यतेइतिपुनः, अविचार प्राप्त जें तें. कृ. नुदधा. वैचित्र्य अ. अप्रथम. २ भेद विशेष त्या अर्थी अव्य.

पुनःपुनः नुत्यतेइतिपुनःपुनः, वारंवार अविचार प्राप्त जें तें. कृ. नुदधा. वैचित्र्यअ. वारंवारत्याअर्थी अव्य.

पुनर्नवः पुनः नौतीतिपुनर्नवः, वारंवार स्तुति पावतो जो तो. कृ. णुधा. स्तुतिअ. नरव. अ. पु.

पुनर्नवा पुनरभीक्ष्णंनूयतेइति पुनर्नवा, वारंवार स्तविजेली जी ती. कृ. णुधा. स्तुतिअ. घेटुळी. आ. स्त्री.

पुनर्भवः पुनर्भवतीतिपुनर्भवः, पुनः होणारा जो तो. कृ. भूधा. सत्ताअ. नरव. अ. पु.

पुनर्भूः पुनर्भवतिसंस्कृतापुनर्भूः, प्रथम एकाची स्त्री होऊन पुनः दुसऱ्याची स्त्री होत्ये जी ती. कृ. भूधा. सत्ताअ. प्रथम एकाची बायको होऊन पुनः दुसऱ्याची बायको होते ती स्त्री. ऊ. स्त्री.

पुन्नागः पुन्नागइवपुन्नागः, पुन्नागाच्या सारिखा जो तो. स. उंडणीचें झाड. अ. पु.

पुमान् पातीतिपुमान्, रक्षण करणारा जो तो. कृ. पाधा. रक्षणअ. मनुष्यस. पु.

पुरःसरः पुरःसरतीतिपुरःसरः, पुढें जाणारा जो तो. कृ. सृधा. गतिअ. पुढें जाणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

पुरं पिपर्तीतिपुरं, पालन करितें जें तें. कृ. पॄधा. पालनअ. शहर. २ घर. अ. न. ३ गुग्गुळ वृक्ष. अ. पु.

पुरतः पुरइतिपुरतः, अग्रगमनार्थातें करितें जें तें. तद्धितप्र. पुढच्याभागीं अग्रभागाचेठायीं त्या अर्थी अव्य.

पुरद्वारं पुरस्यद्वारंपुरद्वारं, नग

शाचें जें द्वार तें. स. नगराचें द्वार. अ. न.

**पुरंदरः** पुरः दारयतीतिपुरंदरः, शत्रु नगरांतें विदारण करितोजो तो. क्र. दॄधा. विदारणअ. इंद्र. अ. पु.

**पुरंध्रिः पुरंध्री** पुरः धारयतीति पुरंध्रिः, गृहादिकातें धारण करितेजी ती. क्र. धृञ् धा. धारण अ. जीस नवरा व पुत्र आहे ती स्त्री. इ. २ ई. स्त्री.

**पुरः** पुरतीतिपुरः, अग्रगमनार्थातें करितें जें तें. क्र. पुरधा. अग्रगमनअ. अग्रभागाचे ठायीं त्या अर्थीं अव्य.

**पुरस्कृतः** पुरोकारिपुरस्कृतः, अग्रभागीं करिजेला जो तो. क्र. कृञ् धा. करणअ. पुढें केलेला. २ पूजित. ३ शत्रूनें आक्रांत. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पुरस्तात्** पूर्वस्मिन्कालेपुरस्तात्, पूर्वकालाचे ठायीं जें तें. त. प्रथम. २ अग्रभाग. ३ अतीत त्या अर्थीं अव्य.

**पुरा** पुरतीतिपुरा, चिरकाल या अर्थीं अग्रगामी जें तें. क्र. पुरधा. अग्रगमनअ. चिरकाल. २ पूर्वीं ३ अतीत. ४ सन्निहित. ५ भावि त्या अर्थीं अव्य.

**पुराणं** पुराभवंपुराणं, पूर्वीं होणारें जें तें. त. सर्गप्रतिसर्गादि पंचलक्षणात्मक जें काव्य तें. २ शास्त्र. ३ सोळा पैसे. अ. न. ४ प्राचीन. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पुरातनं** विग्रहादि पुराणशब्दाप्रमाणें. प्राचीन. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पुरावृत्तं** पुरावृत्तंआचष्टे इतिपुरावृत्तं, पूर्वाचरितावृत्त कथन करितें जें तें. क्र. पुरावृत्तप्रकृतिकधा. प्रकथनअ. प्राचीन इतिहास. अ. न.

**पुरी** पुरतीतिपुरी, उत्कृष्टत्वें करून ज्ञातजी असत्ये ती. क्र. पुरधा. अग्रगमनअ. नगरी. ई. स्त्री.

**पुरीतत्** पुरींशरीरंतनोतीतिपुरीतत्, शरीरातें विस्तार करणारें जें तें. क्र. तनुधा. विस्तारअ. आंतडें. तु. न.

**पुरीषं** पिपर्तिशरीरंपुरीषं, कीं याद शरीरातें रक्षण करितें जें तें. क्र. पृधा.

पालन पूरणअ. पुष्कळ विष्णु. अ. पु. न.

**पुरुषः** पुरिदेहेसीदतीतिपुरुषः, देहाचेठायीं राहतो जो तो. कृ. षद्लृधा. अवसादनादिअ. शरीराधिदैवतम्. आत्मा. २ उंडणीचें झाड. ३ मनुष्य. ४ पुरुषव्यक्ति. अ. पु.

**पुरुषोत्तमः** पुरुषेषुउत्तमः पुरुषोत्तमः, पुरुषां मध्यें जो उत्तम तो. स. विष्णु. अ. पु.

**पुरुहः** पुरून् हंतीतिपुरुहः, अनेकांप्रत हनन करितो जो तो. कृ. हनधा. हननअ. पुष्कळ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पुरुहूतः** पुरुहूतंयस्यस्यपुरुहूतः, बहुत आहे यज्ञाचेठायीं हवन जास तो. स. इंद्र. अ. पु.

**पुरोगः** पुरोगच्छतीतिपुरोगः, अग्रभागीं गमन करणारा जो तो. कृ. गम्लृधा. गतिअ. पुढें जाणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पुरोगमः** इत्यादि सर्व पूर्वीच्या शब्दाप्रमाणें.

**पुरोगामी** इत्यादि सर्व पूर्वीच्या शब्दाप्रमाणें.

**पुरोडाशः** पुरःदाशंतिइतिपुरोडाशः, प्रथम देतात व भक्षितात जातें तो. कृ. दाशृधा. दानअ. हविर्भेद. २ हुतशेष. ३ सोमलतेचारस. ४ पीठ. अ. पु.

**पुरोधाः** पुरोग्रेधीयतेइतिपुरोधाः, अग्रभागाचेठायीं स्थित करिजेतो जो तो. कृ. डुधाञ्धा. धारणअ. पुरोहित. स. पु.

**पुरोभागी** पुरोभजतेइतिपुरोभागी, प्रथम दोष सेवन करितो जो तो. कृ. भजधा. सेवाअ. दोषमात्र पाहणारा. इन्. पु.

**पुरोहितः** विग्रहादि पुरोधाशब्दाप्रमाणें. अ. पु.

**पूः** पिपर्तीतिपूः, रक्षण करितें जी ती. कृ. पॄधा. पालनअ. शहर. इ. स्त्री.

**पुलाकः** पोलतीतिपुलाकः, महत्व पावतो जो तो. कृ. पुलधा. महत्वअ. तंदुलशून्य व्रीहि. २ भाताचें शीत. अ. पु.

**पुलिनं** पुलतीतिपुलिनं, महत्व पावतें जें तें. कृ. पुलधा. महत्वअ. वाळवंट. अ. न.

**पुलोमजा** पुलोम्नः मुनेर्जातापु

लोमजा, पुलोमा नामक ऋषि पासून झाली जी ती. कृ. जनीधा. प्रादुर्भावअ, इंद्राची बायको. आ. स्त्री.

**पुंश्चली** पुंसः चलतीतिपुंश्चली, भर्त्याहून अन्य पुरुषासीं गमन करणारी जी ती. कृ. चलधा. गति अ. व्यभिचारिणी स्त्री. ई. स्त्री.

**पुषितं** विग्रहादिपुष्टशब्दाप्रमा णें. पोसलेलें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पुष्करं** पुष्णातीतिपुष्करं, पुष्ट हो तें जें तें. कृ. पुषधा. पुष्टिअ. उदक २ आकाश. ३ औषधिविशेष. ४ तरवारीचा मध्य. ५ तीर्थविशेष. ६ हत्तीच्या सोंडेचें अग्र. ७ वाद्य रूप जें भांडें त्याचें मुख. अ. न. ८ कमळ. अ. पु. न.

**पुष्कराह्वः** पुष्करस्यआह्वापुष्क राह्वः, कमलाचें आहे नाम ज्या स तो. स. सारस नामा पक्षि. अ. पुल्लिंगीं

**पुष्करिणी** पुष्करमुदकमत्रास्ती तिपुष्करिणी, उदक आहे जीच्या ठायीं ती. त. लहान सरोवर. ई. स्त्री.

**पुष्कलः** पुष्यतीतिपुष्कलः, पुष्ट होतो जो तो. कृ. पुषधा. पुष्टिअ. फा र चांगला. २ श्रेष्ठ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पुष्टं** पुष्यतेस्मपुष्टं, पोषण करिजे लें जें तें. कृ. पुषधा. पुष्टिअ. पोसले लें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पुष्पं** पुष्प्यतितत्पुष्पं, विकसित हो तें जें तें. कृ. पुष्पधा. विकसन अ. फूल. २ स्त्रीरज. अ. न.

**पुष्पकं** पुष्पस्यप्रतिकृतिः पुष्पकं, पु ष्पाची जी प्रतिमा तें. त. कुबेराचें विमान. अ. पु. न. २ अक्लाचें फू ल. अ. न.

**पुष्पकेतु** पुष्पस्यकेतुरिवनाशक त्वात्पुष्पकेतु, पुष्पाला केतु सार खें जें नाशक तें. स. अक्लाचें फू ल. उ. न.

**पुष्पदंतः** पुष्पमिवदंतायस्यस पुष्पदंतः, पुष्पा सारिखे आहेत दांत ज्याचे तो. स. वायव्य दिशेचा हत्ती. अ. पु.

**पुष्पधन्वा** पुष्पंधनुर्यस्यसपुष्प धन्वा, पुष्प आहे धनुष्य ज्याचें तो. स. मदन. अ. पु.

**पुष्परथः** पुष्पेयात्रोत्सवादौरथः पुष्परथः, यात्रादिकांचाठायीं जो रथ तो. स. क्रीडारथ. अ. पु.

**पुष्पफलः** पुष्पवत् फलंयस्यसः पुष्पफलः, पुष्पसदृश वर्तुल फल आहे ज्याचें तो. स. कवठीचा वृक्ष. अ. पु.

**पुष्परसः** पुष्पस्यरसः पुष्परसः पुष्पाचा जो रस तो. स. फुलांतील मध. अ. पु.

**पुष्पवती** पुष्पंरजोस्त्यस्याः पुष्पवती, रज आहे जीस ती. त. रजस्वला स्त्री. ई. स्त्री.

**पुष्पवंतौ** पुष्पविकासस्तद्वंतौपुष्पवंतौ, पुष्पविकास होतो ज्याचा योगानें तो. त. एकोक्तीनें चंद्रसूर्य. अ. पु. द्वि. नि.

**पुष्पलिट्** पुष्पाणिलेढीतिपुष्पलिट्, पुष्पांतें आस्वादन करणारा जो तो. कृ. लिहधा. आस्वादन अ. भ्रमर. ह. पु.

**पुष्पसमयः** पुष्पाणांसमयः पुष्पसमयः, पुष्पांचा जो समय तो. स. वसंत ऋतु. अ. पु.

**पुस्तं** पुस्त्यतेइतिपुस्तं, आहत करिजेतें जें तें. कृ. पुस्तधा. आदरादि अ. मातीची वगैरे पुतळी करणें. अ. पु. न.

**पुष्यः** पुष्यंतिअस्मिन्अर्थाः इति पुष्यः, पुष्ट होतात अर्थ ज्याचेठायीं तो. कृ. पुषधा. पुष्टिअ. पुष्य नक्षत्र. अ. पु.

**पूगः** पुनातीतिपूगः, पवित्र करितो जो तो. कृ. पूञ्धा. पवनअ. पोफळीचें झाड. २ समूह. अ. पु.

**पूजा** पूजनंपूजा, पूजन जें तें. कृ. पूजधा. पूजाअ. पूजन. आ. स्त्री.

**पूजितः** पूज्यतेस्मपूजितः, पूजन करिजेला जो तो. कृ. पूजधा. पूजाअ. पूजलेला. २ मान्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पूज्यः** पूज्यतेइतिपूज्यः, पूजितकरिजेतो जो तो. कृ. पूजधा. पूजा अ. वंद्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ सासरा. अ. पु.

**पूतः** पवतेइतिपूतः, पवित्र होणारा जो तो. कृ. पूञ्धा. पवनअ. पवित्र. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ भूस घालवून शुद्ध केलेलें धान्य

अ. न.

**पूतना** पूतंकरोतीतिपूतना, आरोग्य द्वारा पवित्र करित्ये जी ती. कृ. डुकृञ् धा. करणअ. हिरड्या चें झाड. आ. स्त्री.

**पूतिकः** पुनातीतिपूतिकः, पवित्र करितो जो तो. कृ. पूञ्धा. पवनअ. कांटे करंजाचें झाड. अ. पु.

**पूतिकरजः** पूतिश्चासौकरजश्च पूतिकरजः, दुर्गंधियुक्त असा जो करज वृक्ष तो. स. कांटे करंजाचें झाड. अ. पु.

**पूतिकरंजः** पूतिश्चासौकरंजश्चपूतिकरंजः, दुर्गंधयुक्त असा जो करंज वृक्ष तो. स. अर्थादि पूर्वींच्याश. प्र.

**पूतिकाष्ठं** पूतिकाष्ठंयस्यपूतिकाष्ठं, पवित्र आहे काष्ठ ज्याचें तो. स. देवदारूचें झाड. २ सरळ देवदार वृक्ष. अ. न.

**पूतिगंधिः** पूतिः गंधः अस्य पूतिगंधिः, दुष्ट आहे गंध ज्याचा तो. स. दुर्गंधियुक्त. वि. इ. पु. स्त्री. न.

**पूतिफली** पूतिः फलेअस्याइति पूतिफली, दुर्गंध आहे फलाचे ज्यां जीच्या ती. स. बावची. ई. स्त्री.

**पूपः** पुनातीतिपूर्पूतंपिबतीतिपूपः घृतपान करणारा जो तो. कृ. पाधा पानअ. वडा घारगा इत्यादि. अ. पु.

**पूरः** पूरयतीतिपूरः, भरण करितो जो तो. कृ. पुरीधा. आप्यायन अ. जलप्रवाह. २ खाद्य. ३ व्रणसंशुद्धि. अ. पु.

**पूरणी** पूरयतीतिपूरणी, विस्तारे द्वारा पूरण करित्ये जी ती. कृ. पूरीधा. आप्यायनअ. सांवरीचें झाड. ई. स्त्री.

**पूरितः** विग्रहादिपूर्णशब्दाप्रमाणें. पूर्ण भरलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पूरुषः** विग्रहादिसर्वपुरुष शब्दाप्रमाणें.

**पूर्णं** पूर्यतेस्मपूर्णं, परिपूर्ण होइ जेतें जें तें. कृ. पूरीधा. आप्याय नअ. संपूर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पूर्णकुंभः** पूर्णश्चासौकुंभश्चपूर्णकुंभः, जलानें पूर्ण जो कुंभ तो. स. भरलेला घट. अ. पु.

**पूर्णिमा** पूर्यतेमासोनयेतिपूर्णिमा, परिपूर्ण होतो हे मास जीणें ती.

क्रु. पूरीधा. आप्यायनअ. पौर्णिमा तिथि ह्म. शुक्लपक्षाची शेवटची तिथि. आ. स्त्री.

**पूर्तं** पूर्यतेइतिपूर्तं, पूर्ण होइजे तें जें वापीकूपादि तें. क्रु. पृधा. पूरणाद्यर्थ. देवालय तळें इत्यादि बांधण्याचें धर्मकृत्य. अ. न.

**पूर्वः** पूर्वतीतिपूर्वः, सृष्ट्यादि पूरण करितो जो तो. क्रु. पुर्वधा. पूरणअ. ब्रह्मदेव. २ पितृपिता महादि पूर्वज. अ. पु. ३ समग्र. ४ आद्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पूर्वजः** पूर्वस्मिन्कालेजातः पूर्वजः पूर्वकाली झाला जो तो. क्रु. जनी धा. प्रादुर्भावअ. ज्येष्ठबंधु. २ पितृपितामहादि पूर्वज. अ. पु.

**पूर्वदेवाः** पूर्वेचतेदेवाश्चपूर्वदेवाः पहिले जे देव ते. स. दैत्य. अ. पु.

**पूर्वपर्वतः** पूर्वश्चासौपर्वतश्च पूर्वपर्वतः, पूर्व असा जो पर्वत तो. स. उदयाचल. अ. पु.

**पूर्वेद्युः** पूर्वस्मिन्नहनिपूर्वेद्युः, पूर्वदिवसाचेठायीं त्याअर्थी अव्यय.

**पूषा** पुष्णातीतिपूषा, पुष्टीतें देतो जो तो. क्रु. पुषधा. पुष्टिअ. सूर्य. न. पु.

**प्याट्** प्यायतेइतिप्याट्, संबोधनार्थातें वाढवितें जें तें. क्रु. ओप्यायीधा. वृद्धिअ. संबोधनार्थी अव्य.

**पृक्तिः** पर्चनंपृक्तिः, संपर्क जो ती. क्रु. पृचीधा. संपर्क अ. स्पर्श. इ. स्त्री.

**पृच्छा** पृच्छ्यतिइतिपृच्छा, प्रश्न जो ती. क्रु. प्रच्छधा. ज्ञीप्सा अ. प्रश्न. आ. स्त्री.

**पृतना** प्रियतेइतिपृतना, व्यायाम करणारी जी ती. क्रु. पृङ्धा. व्यायामअ. सेना दोन तीन वाहिनी ह्म. एक पृतनात्मक सेना. आ. स्त्री

**पृथक्** पर्थयतीतिपृथक्, प्रक्षेपार्थातें करितें जें तें. क्रु. पृथधा. प्रक्षेपअ. वर्जन त्याअर्थी अव्य.

**पृथक्पर्णी** पृथक्पर्णानियस्याः सापृथक्पर्णी, विभक्त आहेत पर्णें जीचीं ती. स. टवळापिठवण. ई. स्त्री.

**पृथगात्मता** पृथगात्मनोभावः पृथगात्मता, आत्म्याचा जो पृथ

कृ भाव ल्य. प्रकृतिपुरुषांचा भेदें करून जें ज्ञानती. त. व्यक्ति. आ. स्त्रीलिंगी.

**पृथग्जनः** सज्जनेभ्यःपृथग्भू तोजनः पृथग्जनः, सज्जनाहून वेगळा जो जन तो. स. पामर. २ मूर्ख. अ. पु.

**पृथग्विधः** पृथग्विधास्यपृथग्वि धः, पृथक् आहे प्रकार ज्याचा तो. स. नानाविध. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पृथिवी** प्रथतइतिपृथवी, विस्तृ त होत्ये जी ती. कृ. प्रथधा. प्रख्या नअ. भूमि. ई. स्त्री.

**पृथुकः** पर्थयतीतिपृथुकः, प्र क्षेप करितो जो तो. कृ. पृथधा. प्रक्षेपअ. बालक. २ पोहे. अ. पु.

**पृथुरोमा** पृथुरोमाणिपक्षायस्य पृथुरोमा, मोठे आहेत पर ज्याचे तो. स. मत्स्य. न. पु.

**पृथुलं** पृथुलंलातीतिपृथुलं, महत्व ग्रहण करितें जें तें. कृ. ला धा. आदानअ. विस्तीर्ण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पृथुः** विग्रहादिसर्वपूर्वीच्या शब्दा प्रमाणें. उ. पु.

**पृथ्वी** विग्रहादिसर्वपृथिवीशब्दा प्रमाणें. २ काळें जिरें स्म. काळेरें. ३ हिंगु वृक्षाची पत्री. ई. स्त्री.

**पृथ्वीका** प्रथतेइतिपृथ्वीका, स्व खानें प्रख्याति पावत्ये जी ती. कृ. प्रथधा. प्रख्यानअ. इलाची. आ. स्त्री.

**पृदाकुः** पर्दतीतिपृदाकुः, कु त्सित शब्द करितो जो तो. कृ. प र्दधा. कुत्सितअ. सर्प. उ. पु.

**पृश्निः** स्पृशतीतिपृश्निः, सम्य क् स्पर्श करणारा जो तो. कृ. स्पृ शधा. संस्पर्शनअ. किरण. २ ज्या चें शरीर फार लाहान तो. इ. पु.

**पृश्निपर्णी** पृश्निरल्पंपर्णमस्या इतिपृश्निपर्णी, अल्प आहे पर्ण जीचें ती. स. दवला पिठवण. ई. स्त्री.

**पृषतः** पृषताःसंत्यस्येतिपृषतः, पृषत् ल्य. बिंदु जे ते आहेत ज्या स तो. त. पृषत्. २ मृगविशेष. अ. पु.

**पृषत्** पर्षतीतिपृषत्, सेचन हो तो जो तो. कृ. पृषुधा. सेचनअ.

पाण्याचा बिंदु. दू. पु.

**पृषत्कः** पर्षतीतिपृषत्कः, शत्रु नाश करणारा जो तो. कृ. पृषुधा. सेचनअ. बाण. अ. पु.

**पृषदश्वः** पृषन्मृगभेदोश्वोयस्येतिपृषदश्वः, मृगभेद आहे अश्वजाचा तो. स. वायु. अ. पु.

**पृषदाज्यं. पृषातकं** पृष्यते इतिपृषत् पृषता सहित माज्यंपृषदाज्यं, दधियुक्त जें घृत तें. स. दधियुक्त तूप. अ. न.

**पृष्ठं** पृष्यतेइतिपृष्ठं, सेचन करिजेतें जें तें. कृ. पृषुधा. सेचनअ. शरीराचा पृष्ठ भाग. अ. न.

**पृष्ठ्यः** प्रशस्तंपृष्ठमस्यपृष्ठ्यः, प्रशस्त आहे पृष्ठ भाग जाचा तो. त. भार वाहणारा घोडा. अ. पु. २ पृष्ठांचा समूह. अ. न.

**पृष्णिः** पर्षतीतिपृष्णिः, क्षरण पावतो जो तो. कृ. पृषुधा. सेचन अ. अल्पतनु. इ. पु.

**पेचकः** पचतीतिपेचकः, संतप्त होतो जो तो. कृ. डुपचष्धा. पाकअ. पैंचा पक्षि. २ हत्तीच्या शेंपडी जवळ गुदस्थानाचा आच्छादक जो मांस पिंड विशेष तो. अ. पु.

**पेटकः** विग्रहादिपिटक शब्दाप्रमाणें. अर्थ वस्त्रें अलंकार ठेवण्याची पेटि. २ समूह. अ. पु.

**पेटा** विग्रहादि पूर्वीच्याश. प्र. पेटी आ. स्त्री.

**पेटी** पिट्यतेइतिपेटी, वस्त्रादिकें करून संबद्ध होइजेत्ये जी ती. कृ. पिटधा. संघातअ. वस्त्र अलंकार ठेवण्याची पेटी. ई. स्त्री.

**पेडा** पेडतीतिपेडा, अर्थादिपिटक शब्दाप्र. कृ. पिडिधा. संघात अ. पेटी. आ. स्त्री.

**पेयूषं** विग्रहादिपीयूषशब्दाप्र. अमृत. २ नवीन वियालेल्या गाईचें सात दिवस पर्यंतचें दूध. अ. न.

**पेलवं** पेलनंपेलः सोस्यास्तीति पेलवं, भेदन आहे जास तें. त. विरळ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पेशलः** पेशनंपेशः सोस्यास्तीति पेशलः, चित्तवृत्ति निरोध आहे जास तो. त. सुंदर. २ चतुर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पेशिः पेशी** पिंशतीतिपेशिः, अवयव करणारी जी ती. क्रू. पि शधा. अवयवअ. पक्ष्यादिकांचें अंडें ह्म. कवठ. इ. २ई. स्त्री.

**पैठरं** पिठरेसंस्कृतंपैठरं, स्थाली चेठायीं संस्कृत जें अन्न तें. त. स्थालींत शिजवलेलें अन्न. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पैतृष्वसेयः** पितृष्वसुरपत्यं पैतृष्वसेयः, पित्याच्या बहिणी चा जो पुत्र तो. त. आते भाऊ. अ. पु.

**पैतृष्वस्रीयः** पितृष्वसुरपत्यं पैतृष्वस्रीयः, पितृभगिनीचें जें अपत्य तें. त. आतेभाऊ. अ. पुल्लिं.

**पैत्रं** पितृणामिदंपैत्रं, पितरांचें जें इदं ह्म. हें तें. त. अंगुष्ठआ णि तर्जनी त्यांचें अंतर. अ. न.

**पोगंडः** पुनातीतिपोः, पोर्गंडेए कदेशोयस्यपोगंडः, वायूआहे ए क देशाचेठायीं ज्याचा तो. स. ज्या चे अवयव स्वभावतः कांहीं क- मी असतात तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पोटगलः** पोटेनसंश्लेषेणगल तीतिपोटगलः, संमिश्रणानें स्थ ल भक्षण ह्म. नाशन करितो जो तो. क्रू. गलधा. अदनअ. देवनळ. २ लव्हाळा. अ. पु.

**पोटा** पोटयतीतिपोटा, स्त्रीपुरु षाच्या चिन्हानें भासणारी जी ती. क्रू. पुटधा. भासनअ. जीच्यास्तनो वर केश आहेत अशी पुरुष चिन्हाची जी स्त्री ती. आ. स्त्री.

**पोतः** पुनातीतिपोतः, उत्तीर्ण करितो जो तो. क्रू. पूञ्धा. पवन अ. बालक. २ नौका. ३ वाहणें अ. पु.

**पोतवणिक्** पोतस्यवणिक्पो तवणिक्, नौकेचा जो वणिक्. ह्म. व्यापारी तो. स. गलबताचा व्यापार करणारा. अ. पु.

**पोतवाहः** पोतंवहतीतिपोतवा हः, नौकेतें वाहणारा जो तो. क्रू. वहधा. प्रापणअ. गलबताचे म ध्यस्तंभावर राहून दुष्टप्राण्यानें निवारण करणारा मनुष्य. अ. पु.

**पोताधानं** मत्स्यपोताअस्मिन् धीयंतेइतिपोताधानं, मत्स्य बा

रुक् राहतात ज्याचेठायीं तें. द्रु डुधाञ्‌धा. धारणअ. लहान म स्याचे पोरांचें समूह पात्र. अ. न.

**पोत्रं** पूयतेनेनपोत्रं, शुद्ध करिजे तें जेणें तें. कृ. पूञ्‌धा. पवनअ. व स्त्र. २ डुकराच्या तोंडाचें अग्र. ३ नागराचें अग्र. अ. न.

**पोत्री** पोत्रंप्रशस्तमुखमस्यास्ती निपोत्री. प्रशस्तआहे मुखजाचें तो. न. डुकर. इन्. पु.

**पौत्री** पुत्रस्य पुत्र्यावा अपत्यंपौ त्री, पुत्राची किंवा कन्येची जी. कन्या ती. त. पुत्रादिकांची कन्या ई. स्त्री.

**पौंडर्यं** पुंडस्य अयंपुंडर्यं, पुंड र्यमेवपौंडर्यं, रोगनाशनासजें श्रेष्ठ तें पुंडर्य तेंच पौंडर्य. औ षधि विशेष. अ. न.

**पौरं** पुरेभवंपौरं. नगराच्येठायीं जें उत्पन्न तें. त. रोहिसगवत. अ. न.

**पौरस्त्य**: पुरोभवः पौरस्त्यः, अग्रभागीं होतो जो तो. त. कुबे र. अ. पु. २ प्रथम. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**पौरुषं** पुरुषस्य कर्मभावोवापौ रुषं, पुरुषाचा धर्म किंवा कर्मजें तें. त. पराक्रम. २ पुरुष त्व. ३ मस्तकावर सरळ वर हात केलेल्या पुरुषाची उंची. अ. न.

**पौरुषी** पुरुषः प्रमाणमस्याः पौरु षी, पुरुष प्रमाण आहे उदक जी चें ती. मस्तकावर सरळ हात केलेल्या पुरुषाची उंची. ई. स्त्री.

**पौरोगव**: पुरः प्रथमंपाच्यवस्तु षु गोर्नेत्रमस्यपुरोगुः, सएवपौ रोगवः, पाच्यवस्तूचाठायीं आ हे दृष्टि ज्याची तो पुरोगु तोच पौरो गव. त. बाकनीस. अ. पु.

**पौर्णमास**: पौर्णमास्यांभवः पौ र्णमासः, पौर्णमासीच्याठायीं वि द्यमान जो याग तो. त. पूर्णिमेस करावयाचा जो याग तो. अ. पु.

**पौर्णमासी** पूर्णमासश्चंद्रस्तस्ये यंपौर्णमासी, पूर्णमास ह्म. चंद्र त्याची जीही ती. त. पूर्णिमा. ई. स्त्री.

**पौलस्त्य**: पुलस्तेर्गोत्रापत्यंपौल स्त्यः, पुलस्तिऋषीचें जें गोत्राप त्य ह्म. नातु तो. त. कुबेर. अ. पु.

**पौलि**: पोलतीतिपोलः पोलेनानि र्वृतः पौलिः, महत्वानें संपादित

जी ती. न. शोळा इ. स्त्री.

**पौष:** पुष्ययुक्तापौर्णमासीयत्रा स्तिसपौष:, पुष्ययुक्त आहे पौर्णिमा ज्याचेठायीं तो. न. पौषमास. अ. पु.

**प्रकांडं** प्रकाम्यतइतिप्रकांडं, गृहादिनिर्माणार्थ उत्तम प्रकारें इच्छिजेतें जें तें. क्र. कमुधा. कांतिअ. प्रशस्त. अ. न. मूळापासून शाखा मर्याद जो वृक्ष भाग तो. अ. पु. न.

**प्रकामं** प्रकामनंप्रकामं, अर्थादिकामशब्दाप्रमाणें. क्र. कमुधा. कांतिअ. यथेच्छ त्याअर्थी अव्य.

**प्रकार:** प्रकरणंप्रकार:, भेद किंवा सादृश्य जें तो. क्र. कृञ्धा. करणअ. भेदविशेष. २ सादृश्य. अ. पु.

**प्रकाश:** प्रकाशनंप्रकाश:, प्रकाशन जें तो. क्र. काशृधा. दीप्तिअ. सूर्याची प्रभा. २ अतिप्रसिद्ध. ३ व्यक्त. अ. पु.

**प्रकीर्णकं** प्रकीर्यतेस्मप्रकीर्णकं, विक्षिप्त करिजे तें जें तें. क्र. कृ अधा. विक्षेपअ. चामर. अ. न.

**प्रकीर्य:** प्रकीर्यतेइतिप्रकीर्य:, टांकिजे तो जो तो. क्र. कृधा. विक्षेपअ. कांटे करंजाचें झाड. अ. पु.

**प्रकृति:** प्रकृष्टाकृति: कार्यंयस्या: सांप्रकृति:, उत्कृष्ट आहे कार्य जीचें ती. स. सत्वादि गुणाची साम्यावस्था. २ स्वभाव. ३ पौरजनश्रेणी. ४ राजाचीं सप्तांगें प्रत्येक. ५ योनि ह्म. मूलकारण. इ. स्त्री. ६ लिंग ह्म. चिन्ह. इ. स्त्री.

**प्रकोष्ठ:** प्रकुष्यतेनेनप्रकोष्ठ:, निष्कर्ष होइजेतो जेणेंकरून तो. क्र. कुषधा. निष्कर्षअ. कोंपराचा खालचा भाग. २ घराचा मध्यभाग. अ. पु.

**प्रक्रम:** प्रक्रमणंप्रक्रम:, आरंभ जो तो. क्र. क्रमुधा. पादविक्षेपअ. प्रथमारंभ. अ. पु.

**प्रक्रिया** प्रकर्षेणकरणंप्रक्रिया, उत्कर्षें करून करणारी जी ती. क्र. डु कृञ्धा. करणअ. व्यवस्थाठेवणें. आ. स्त्री.

**प्रक्कण: प्रक्काण:** प्रक्कणनंप्रक्कण:, प्रकर्षें करून शब्दन जें तें. क्र. क्कणधा. शब्दअ. वीणादिका

घांचा शब्द. अ. पु.

**प्रक्ष्वेडनः** प्रकर्षेणक्ष्वेडतेप्रक्ष्वेडनः, अतिशयें करून शब्द करणारा जो तो. क्ष्वि. अक्ष्विदाधा. अव्यक्तशब्दअ. लोखंडी बाण. अ. पु.

**प्रगंडः** प्रकृष्टोगंडइवप्रगंडः, उत्कृष्ट जो गंड ह्म. वदनैकदेश त्यासारखा जो तो. स. कोपराचेवरचा भाग. अ. पु.

**प्रगतजानुकः** विग्रहादि प्रज्ञुशब्दाप्रमाणें. अ. पु.

**प्रगल्भः** प्रगल्भतेइतिप्रगल्भः, प्रौढत्व धारण कर्तो जो तो. क्रु. गल्भधा. धार्ष्ट्यअ. प्रौढ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रगाढं** प्रगाह्यतेप्रगाढं, विलोडन करिजेतें जें तें. क्रु. गाहूधा. विलोडनअ. अतिशय. २ दुःख. अ. न.

**प्रगुणः** प्रकृष्टाःगुणाःयस्यप्रगुणः, उत्कृष्ट आहेत सरलत्वादि गुण ज्याचे तो. स. सरळ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रगे** प्रगीयतेअत्रेतिप्रगे, प्रकृष्ट शब्द करिताहेत पक्ष्यादिक ज्याचे ठायीं तो. क्रु. गैधा. शब्दअ. प्रातःकाल त्या अर्थी अव्यय.

**प्रग्रहः** प्रगृह्यतेप्रग्रहः, ग्रहण करिजेतो जो तो. क्रु. ग्रहधा. उपादानअ. अटकाव. २ बंधन. ३ पशुबांधण्याचा रज्जु ह्म. दोरी. ४ किरण. अ. पु.

**प्रग्राहः** विग्रहादि सर्व प्रग्रह शब्दाप्रमाणें.

**प्रग्रीवं** प्रगताग्रीवायस्मिन्तत्प्रग्रीवं, प्रगत ह्म. गत आहे ग्रीवा ह्म. कंठ ज्याचे ठायीं तें. स. लहान खिडकी. अ. पु. न. २ वृक्षाचें शिखर. अ. न.

**प्रघणः प्रघाणः** प्रहन्यतेइति प्रघणः, प्रकर्षें करून गमन करिजेतो जो तो. क्रु. हनधा. गतिअ. देवडी. अ. पु.

**प्रचक्रं** प्रस्थितंचक्रंसैन्यंप्रचक्रं, प्रस्थित जें सैन्य तें. स. बाहेर निघालेलें सैन्य. अ. न.

**प्रचलायितः** प्रचलइवआचरतिसाप्रचलासासंजातास्यप्रचलायितः, निद्राघूर्णन संजात आहे ज्यास तो. त. निजेनें झुंग जाहला

लेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रचुरं** प्रगतंचुरया: प्रचुरं, न्यून नाहीं जें तें. स. पुष्कळ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रचेता:** प्रकृष्टंचेतोयस्यसप्रचेता:, उत्कृष्ट आहे चित्त ज्याचें तो. स. वरुणनामा देवविशेष. स. पु.

**प्रचोदनी** प्रचोदयतीतिप्रचोदनी, रोग नाशना विषयीं प्रेरणा करणारी जी ती. कृ. चुदधा. संकोचनअ. रिंगणीचें झाड. ई. स्त्री.

**प्रच्छदपट:** प्रकर्षेणछदयतीतिप्रच्छद:, प्रच्छदश्चासोपटश्च प्रच्छदपट:, प्रकर्षे करून आच्छादित करितो असा जो पट तो. स. वीणादिकांचा गवसणी. अ. पु.

**प्रच्छन्नं** प्रकर्षेणाच्छन्नंप्रच्छन्नं, प्रकर्षे करून आच्छादित जें तें. स. खिडकी. अ. न. २ आच्छादित. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रच्छर्दिका** प्रच्छर्दनंप्रच्छर्दिका वमन जें तें. कृ. छर्दधा. वमनअ. उलटीचा रोग. आ. स्त्री.

**प्रजन:** प्रजननंप्रजन:, प्रथम गर्भग्रहण जें तो. कृ. जनीधा. प्रादुर्भावअ. गर्भग्रहण. अ. पु.

**प्रजवी** प्रजवतीतिप्रजवी, वेग करणारा जो तो. कृ. जुधा. वेगअ. त्वराशील. इन्. पु.

**प्रजा** प्रजायतेइतिप्रजा, उत्पन्न होत्ये जी ती. कृ. जनीधा. प्रादुर्भावअ. संतति. २ जन. आ. स्त्री.

**प्रजाता** प्रजायतेस्मप्रजाता, प्रकर्षे करून उत्पत्ति करिती झाली जी ती. कृ. जनीधा. प्रादुर्भावअ. बाळंत जाहलेली बायको. आ. स्त्रीलिंगीं.

**प्रजापति:** प्रजानांपति: प्रजापति:, प्रजांचा जो स्वामी तो. स. ब्रह्मदेव. इ. पु.

**प्रजावती** प्रजास्त्यस्यामितिप्रजावती, प्रजा आहे जीचाठायीं ती. त. भावजय. ई. स्त्री.

**प्रज्ञ:** विग्रहादि सर्व प्रज्ञु शब्दा प्रमाणें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रज्ञा** प्रकर्षेणज्ञायतेअनयेतिप्रज्ञा, उत्कृष्ट जाणिजेतें जीणें ती. कृ. ज्ञाधा. अवबोधनअ. बुद्धि. २ शुभाशुभ जाणती बायको. आ. स्त्रीलिं.

**प्रज्ञानं** प्रज्ञायतेनेनप्रज्ञानं, जाणिजेतें जेणेंकरून तें. कृ. ज्ञाधा. अवबोधनअ. बुद्धी. २ चिन्ह. अ. न.

**प्रज्ञु:** प्रगतेजानुनीयस्यप्रज्ञु:, बालादिकानें गेले आहेत जानु ज्याचे तो. स. फेगडा. वि. उ. पु. स्त्री. न.

**प्रडीनं** प्रकर्षेणडीनंप्रडीनं, प्रकर्षेकरून जें डीन म्ह. गमन तें. कृ. डीङ्धा. विहायसागतिअ. पक्ष्याची गति. अ. न.

**प्रणत:** प्रणम्यतेइतिप्रणत:, नम्रत्व पाविजे तो जो तो. कृ. णमधा. प्रह्वत्वअ. नम्र. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रणय:** प्रणयनंप्रणय:, प्रीतीनें प्रार्थना जी तो. कृ. णीञ्धा. प्रापणअ. प्रीति. २ विश्वास. ३ याच्ञा अ. पु.

**प्रणव:** प्रकर्षेणनूयतेइतिप्रणव: प्रकर्षें करून स्तविजेतो जो तो. कृ. णुधा. स्तुतिअ. ओंकार. अ. पु.

**प्रणाद:** प्रणाद्यतेनुरागेणप्रणाद: अनुरागें करून जो शब्द तो. कृ. णदधा. अव्यक्त शब्दअ. प्रीतीचा शब्द. अ. पु.

**प्रणाल:** अंभोनेनप्रणालनिबध्यत इतिप्रणाल:, उदक निबद्ध करितें ज्याचा योगानें ता. कृ. णलधा. गतिअ. पाणि जाण्याचा मार्ग. अ. पु. आ. स्त्री.

**प्रणिधि:** प्रकर्षेणनिधीयतेज्ञेयमत्रप्रणिधि:, प्रकर्षेंकरून ज्ञेय धारण करिजेतें ज्याचे ठायीं तो. कृ. डुधाञ्धा. धारणअ. याच्ञा करणें. २ बातमीदार. इ. पु.

**प्रणिहितं** प्रणिधीयतेइतिप्रणिहितं, स्थापन करिजेलें जें तें. कृ. डुधाञ्धा. धारणअ. मिळालेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रणीत:** प्रकर्षेनीत: प्रणीत:, उत्कर्षातें पावणारा जो तो. स. मंत्रादिकें करून संस्कृत जो अग्नि तो. २ कढी वगैरे. अ. पु. ३ सांगितलेला. ४ केलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रणुत:** प्रणूयतेस्मप्रणुत:, स्तवन करिजेला जो तो. कृ. णुधा. स्तुतिअ. स्तवलेला. वि. अ. पु.

न. आ. स्त्री.

**प्रणेय:** प्रकर्षेणनेतुंशक्य:प्रणेय: प्रकर्षें करून पावण्याला शक्त जो तो. कृ. णी॰धा. प्रापणअ. स्वाधीन जाहलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतन** प्राग्भवंप्रतनं, पूर्वींविद्यमान जें तें. न. पुरातन. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतल:** प्रश्लिष्टेतलेयस्यप्रतल:, संलग्न आहेत तलें ज्याचीं तो. स. पसरलेला हात. अ. पु.

**प्रताप:** प्रतपत्यनेनप्रताप:, ज्याच्या योगानें संतप्त करितो ती. कृ. तपधा. संतापअ. धनाढ्यपणा. व सेन्या—पासून जो यजमानाचेठायीं तेजोविशेष तो. अ. पु.

**प्रतापस:** प्रतापश्चक्षुस्तेज: तत्स्यतीतिप्रतापस:, चक्षुतेजातें नाश करितो जो तो. कृ. षोधा. अंतकर्मअ. पांढरी रुई. अ. पुल्लिंगीं.

**प्रति** प्रथतेइतिप्रति, प्रतिनिधि या अर्थातें बोलतें जें तें. कृ. प्रथधा. प्रस्यानअ. प्रतिनिधि. अव्य.

**प्रतिकूलं** प्रतीपगतंकूलात्प्रतिकूलं, अनुकूलाहून जें विरुद्ध तें. स. विरुद्ध. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतिकर्म** प्रत्यंगंकर्मप्रतिकर्म, अंगाप्रत जें कर्म तें. स. अलंकारांनीं केलेली शोभा. २ आंगाचा परिमळ जाण्यासाठीं आंगास कुंकुमादिकांचा संस्कार करणें. न. न.

**प्रतिकृति:** प्रकृष्टाकृति:प्रतिकृति:, सादृश्य जी कृति ती. स. प्रतिमा. इ. स्त्री.

**प्रतिकृष्ट:** प्रतिकृष्यतेस्मप्रतिकृष्ट:, भेदन करिजेला जो तो. कृ. कृषधा. विलेखनअ. नीच. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतिख्याति:** प्रतिख्यानंप्रतिख्याति:, अत्यंत जी ख्याति ती. कृ. ख्याधा. प्रकथनअ. अतिप्रसिद्धि. इ. स्त्री.

**प्रतिक्षिप्त:** प्रतिक्षिप्यतेस्मप्रतिक्षिप्त:, प्रतिक्षेपिकरिजेला जो तो. कृ. क्षिपधा. क्षेपअ. आक्षिप्त. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतिग्रह:** प्रतिगृह्यतेअनेनप्रति:

हः, प्रतिग्रह छोड जेलो जेणें तो. क्रु. ग्रहधा. उपादानअ. दिलेलें घेणें. २ सैन्याचा पृष्ठभाग. ३ पिकदाणी. अ. पु.

**प्रतिग्राहः** प्रतिगृण्हातीतिप्रतिग्राहः, प्रतिग्रह करितो जो तो. क्रु. ग्रहधा. उपादानअ. पिकदाणी. अ. पु.

**प्रतिघः** प्रतिहन्यतइतिप्रतिघः, हिंसक जो तो. क्रु. हनधा. हिंसाअ. क्रोध. अ. पु.

**प्रतिघातनं** प्रतिघात्यतेइति प्रतिघातनं, हिंसा जी तें. क्रु. हनधा. हिंसाअ. वध. अ. न.

**प्रतिछाया** प्रकृष्टाछायाप्रतिछाया, उत्कृष्ट जी छाया ह्म. प्रतिबिंब ती. स. प्रतिमा. आ. स्त्री.

**प्रतिजागरः** प्रतिजागरणंप्रतिजागरः, जागृती जी तो. क्रु. जागृधा. निद्राक्षयअ. कांहीं एकवस्तूस पाहात असणें. अ. पु.

**प्रतिज्ञातः** प्रतिज्ञायतेस्मप्रतिज्ञातः, प्रतिज्ञाविषय करिजेला जो तो. क्रु. ज्ञाधा. अवबोधनअ. स्वीकारलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतिज्ञानं** प्रतिज्ञायतेइतिप्रतिज्ञानं, ज्ञान जें तें. क्रु. ज्ञाधा. अवबोधनअ. स्वीकार. अ. न.

**प्रतिदानं** प्रतीपंदानंप्रतिदानं, निक्षेपाकारणें जें दान तें. स. मोबदला. २ ठेव परत देणें. अ. न.

**प्रतिध्वानः** प्रतिध्वन्यतेइतिप्रतिध्वानः, प्रथम शब्दातें लक्षून नंतर जो ध्वनि जो. क्रु. ध्वनधा. शब्दअ. प्रतिशब्द. अ. पु.

**प्रतिनिधिः** प्रतिनिधीयतेइति प्रतिनिधिः, सदृश करिजे तो जो तो. क्रु. डुधाञ्धा. धारणअ. प्रतिमा. इ. पु.

**प्रतिपत्** प्रतिपद्यतेउपक्रम्यते इतिप्रतिपत्, तिथिगणनाप्रसंगीं पूर्वी उपक्रमिजेत्से ह्म. मोजिली जात्ये जी ती. क्रु. पदधा. गतिअ. प्रतिपदातिथि. २ बुद्धि. त. स्त्री.

**प्रतिपन्नः** प्रतिपद्यतेस्मप्रतिपन्नः, अवबोध करिजेलें जें तें. क्रु. पदधा. गतिअ. जाणलेला. २ कबूल केलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतिपादनं** प्रतिपाद्यतेइतिप्रति

पादनं, दानजें तें. कृ. पद्धा. ग तिअ. दान. अ. न.

**प्रतिबद्धः** प्रतिबध्यतेप्रतिबद्धः, मनोभंगकरिजेला जो तो. कृ. बध धा. बंधनअ. मनोभंग झालेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतिबंधः** प्रतिबध्यतेस्मप्रतिबंधः प्रतिबंध पाविजेला जो तो. कृ. बध धा. बंधनअ. अवष्टंब. अ. पु.

**प्रतिबिंबं** बिंबस्यप्रतिकृतिःप्र तिबिंबं, बिंबाचीजी प्रतिमा ती. स. प्रतिमा. अ. न.

**प्रतिभयं** भयानकंप्रतिप्रतिभयं, भयानकाप्रत जो तो. स. भयान कनामारसविशेष. अ. पु. २भयं कर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतिभान्वितः** प्रतिभानंप्रतिभा प्रतिभयान्वितःप्रतिभयान्वितः, न वोन्मेषशालीनी बुद्धीनें युक्त जो तो. स. ज्यास स्फूर्ति आहे तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतिभूः** प्रतिनिधिर्भवतीतिप्र तिभूः, प्रतिनिधी होतो जो तो. कृ. भूधा. सत्ताअ. जामीन. ऊ. पुल्लिंगीं

**प्रतिमा** प्रतिमीयतेनयाप्रतिमा, सदृश करिजेतें जीणें करून ती. कृ. माङ्धा. मानअ. प्रतिबिंब. आ. स्त्री.

**प्रतिमानं** प्रतिकृत्यमीयतेनेन प्रतिमानं, प्रतिकृती करून मान करिजेतें जेणें तें. कृ. माङ्धा. मा नअ. प्रतिमा. २ हत्तीच्या वाहि त्याचा अधोभाग. ३ दंताचाम ध्यभाग. अ. न.

**प्रतियत्नः** प्रतियतनंप्रतियत्नः, प्रयत्न जो तो. कृ. यतीधा. प्रयत्नअ. वांछा. २ अनुकूल होणें. ३ संस्का र. अ. पु.

**प्रतियातना** प्रतियात्यतेनया प्रतियातना, प्रयत्न होइजेतोजी णें ती. कृ. यतीधा. प्रयत्नअ. प्र तिमा. आ. स्त्री.

**प्रतिरोधी** प्रतिरोद्धुंशीलमस्य प्रतिरोधी, निरोधस्वभावी जो तो. कृ. रुधिर्धा. आवरणअ. शत्रु. इन्. पु.

**प्रतिवाक्यं** प्रतिघातनार्थंवाक्यं प्रतिवाक्यं, प्रत्युत्तर जें तें. स. उत्त र. अ. न.

**प्रतिविषा** प्रतीपंविषमस्याः प्रतिविषा, प्रतिकूलआहे विष जीसती. स. अतिविष. आ. स्त्री.

**प्रतिशासनं** प्रतिशिष्टिःप्रति शासनं, भृत्यादिप्रेषण जें तें. कृ. शास्‌धा. अनुशिष्टीअ. चाकरास बोलावून कोठें तरीं कार्यासाठीं पाठविणें. अ. न.

**प्रतिश्यायः** प्रतिक्षणंश्यायते प्रतिश्यायः, प्रतिक्षणीं गमन क रणारा जो तो. कृ. श्यैङ्‌धा. गति अ. पडसें. अ. पु.

**प्रतिश्रयः** प्रतिश्रयणमत्रवा प्रतिश्रयः, आश्रयण किंवातेंहोतें जान्वेठायींतो. कृ. श्रिञ्‌धा. सेवा अ. आश्रय. २ स्वीकार. ३ सभा. अ. पु.

**प्रतिश्रवः** प्रतिश्रूयतेइतिप्रति श्रवः, स्वीकार जो तो. कृ. श्रुधा. श्रवणअ. स्वीकार. अ. पु.

**प्रतिश्रुतं** प्रतिश्रूयतेस्मप्रतिश्रु तं, प्रतिज्ञा करिजेलें जें तें. कृ. श्रु धा. श्रवणअ. स्वीकारलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतिश्रुत्** प्रतिश्रूयतइतिप्रति श्रुत्, प्रथम शब्दातें लक्षून नं तर जो शब्द तो. कृ. श्रुधा. श्रवण अ. प्रतिध्वनि. ह. स्त्री.

**प्रतिष्टंभः** प्रतिष्टंभनंप्रतिष्टंभः, प्रतिबंध जो तो. कृ. ष्टभिधा. प्रति ष्टंभअ. प्रतिबंध. अ. पु.

**प्रतिसीरा** प्रतिसीयतेप्रतिसी रा, बांधिजेत्ये जी ती. कृ. षिञ् धा. बंधनअ. पडदा. ह्या. कनात. आ स्त्रीलिंगीं.

**प्रतिहतः** प्रतिहन्यतेस्मप्रतिहतः, मनोभंग करिजेला जो तो. कृ. हन धा. हिंसाअ. मनोभंग जाहलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतिहारः** प्रतिहरणंप्रतिहारः, प्रतिहारोस्यास्तीतिप्रतिहारः, ज ननिवारणआहे ज्यास तो. त. द्वा र. २ द्वारपाळ. अ. पु.

**प्रतीकः** प्रत्येतीतिप्रतीकः, ग मन करणारा जो तो. कृ. इण्‌धा. गतिअ. शरीराचे अवयव. अ. पु. प्रतिकूल. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतीकारः** प्रतिकरणंप्रतीकारः वैर निराकरण जें तो. कृ. डुकृ ञ्‌धा. करणअ. वैरशुद्धि. २ नि

वारणकरणें. अ. पु.

**प्रतीकाश:** प्रतिकाशतेप्रती काशः, सादृश्यानें शोभतो जो तो. क्र. काशृधा. दीप्तिअ. सदृश. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतीक्ष्य:** प्रतीक्षितुंयोग्यःप्रती क्ष्यः, अवलोकन करावयास जो योग्य तो. क्र. ईषधा. दर्शनांकन अ. पूज्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतीची** पश्चादंचतिसूर्यास्तमय इतिप्रतीची, मागून सूर्याच्या अ स्तमानीं क्र.शोभित होत्से ती. क्र. अंचुधा. पूजाअ. पश्चिमदिशा. ई. स्त्री.

**प्रतीत:** प्रत्येकं अगात्प्रतीतः, प्रत्येकाप्रत प्राप्त झाला जो तो. क्र. इण्धा. गतिअ. प्रख्यात. २ हर्षयु क्त. ३ आदरयुक्त. ४ विद्वान. ५ आणलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रतीपदर्शिनी** प्रतीपंद्रष्टुंशील मस्याःप्रतीपदर्शिनी, प्रतिकूल पाहाण्याचा आहे स्वभाव जीचा ती. क्र. दृशिर्धा. प्रेक्षणअ. बाय को. ई. स्त्री.

**प्रतीरं** प्रकर्षेणतरंत्यस्मात्प्रतीरं, प्रकर्षेंकरून तरताहेत जा पासून तें. क्र. तृधा. तरणअ. तीर. अ. न.

**प्रतीहार:** प्रतिह्रियतेनेनात्रवा प्रतीहारः, निवारण करिजेतें जा णें किंवा जाचेठायीं तो. क्र. हृञ् धा. हरणअ. द्वार. २ द्वारपाळ. अ. पु.

**प्रतीहारि:** विग्रहादिपूर्वीच्या श ब्दाप्रमाणें ——— द्वारपाळ. इ. स्त्री.

**प्रतीहास:** प्रतिपोहासो विकासो स्यप्रतीहासः, प्रतिकूळ आहे हा स्य रूप विकास जास तो. स. कण्हे रीचें झाड. अ. पु.

**प्रतोली** प्रतोलयतीतिप्रतोली, श जमार्गाचीतुलना करित्से जी ती. क्र. तुलधा. उन्मानअ. गांवांतील लहान मार्ग. ई. स्त्री.

**प्रत्नं** प्रकृष्टेभवंप्रत्नं, चिरकाला चेठायीं जें विद्यमान तें. त. पुरात न. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रत्यक्पर्णी** प्रत्यंचिपर्णान्यस्या इतिप्रत्यक्पर्णी, पूज्यमानआहेत पर्णें जीस ती. स. आघाड्याचें झाड. ई. स्त्री.

**प्रत्यक्श्रेणी** प्रतीचीश्रेणीयस्या

इतिप्रत्यक्श्रेणी, पूज्यमानआहे श्रेणी स्म. पंक्ति जीची ती. स. उंदरकानी. २दाती. ई. स्त्री.

**प्रत्यक्षं** अक्षमिंद्रियंप्रतिगतंप्रत्यक्षं, इंद्रियांप्रतजें गत तें. स. इंद्रियानें ग्राह्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ प्रत्यक्षज्ञान. ३प्रत्यक्ष ज्ञानाचें कारण जें इंद्रिय तें. अ. न.

**प्रत्यग्रः** प्रतिनवमग्रमस्यप्रत्यग्रः, नवीन आहे अग्र जाचें तो. स. नूतन. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रत्यंतः** प्रतिगतोअंतंप्रत्यंतः, जयन्याप्रत प्राप्त जो तो. स. म्लेंछ देश. अ. पु.

**प्रत्यंतपर्वताः** प्रत्यंतेपर्वताः प्रत्यंतपर्वताः, महा गिरीच्यासमीप भागीं जे क्षुद्र पर्वत ते. स. मोठ्या पर्वता जवळ जे लहान पर्वत असतात ते. अ. पु.

**प्रत्ययः** प्रत्ययनंप्रीयतेनेनवा प्रत्येतिवाप्रत्ययः, ज्ञान किंवा जाणिजे तो जेणेंकरून अथवा जाणतो जो तो. कृ. इण्धा. गति अ. स्वाधीन. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ शपथ. ३ ज्ञान. ४ विश्वास. ५ हेतु. ६ छिद्र. ७ शब्द. ८ प्रसिद्धपणा. अ. पु.

**प्रत्ययितः** प्रत्ययः संजातोस्यप्रत्ययितः, विश्वास झाला आहे जास तो. त. विश्वासू. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रत्यर्थी** प्रतिकूलमर्थयितुंशीलः प्रत्यर्थी, प्रतिकूलाप्रत याचना करण्या विषयीं स्वभाव ज्याचा तो. कृ. अर्थधा. उपयाञ्चाअ. शत्रु. इन्. पु.

**प्रत्यवसितं** प्रत्यवसीयतेस्म प्रत्यवसितं, भक्षण करिजे लें जें तें. कृ. षोधा. अंतकर्मअ. खाल्लें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रत्याख्यातः** प्रत्याख्यायतेस्म प्रत्याख्यातः, प्रत्याख्यान करिजे ला जो तो. कृ. ख्याधा. प्रकथन अ. निराकरण केलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रत्याख्यानं** प्रत्याख्यातिः प्रत्याख्यानं, निराकरण जें तें. कृ. ख्याधा. प्रकथनअ. निराकरण. अ. न.

**प्रत्यादिष्टः** प्रत्यादिश्यतेस्मप्रत्या

दिष्टः, संत्यक्त करिजेला जो तो. कृ. दिशधा. अतिसर्जनअ. निरा करण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रत्यादेशः** प्रत्यादेशनंप्रत्यादेशः, त्याग जो तो. कृ. दिशधा. अतिसर्जनअ. निराकरण. अ. न.

**प्रत्यालीढं** प्रत्यालेढनंप्रत्यालीढं, संकोचनं जें तें. कृ. लिहधा. आस्वादनअ. धनुर्धरांचास्थिति विशेषरूप. वाम जंघाप्रसारपूर्वक दक्षिण जंघासंकोच. अ. न.

**प्रत्यासारः** प्रतीपमासारयति प्रत्यासारः, प्रतिकूलातें अनुसरण करणारा जो तो. कृ. सृधा. गतिअ. सैन्यव्यूहाचा पृष्ठभाग. अ. पुल्लिंगी.

**प्रत्याहारः** प्रत्याहरणंप्रत्याहारः इंद्रियपरावर्तनजें तें. कृ. हृधा. हरणअ. इंद्रियांचें आकर्षण. अ. पु.

**प्रत्युत्क्रमः** प्रत्युत्क्रमणंप्रत्युत्क्रमः, कर्मारंभीं प्रथम प्रयोग जो तो. कृ. क्रमुधा. पादविक्षेपअ. युद्धनिमित्त अतिशयितजो उद्योग तो. अ. पु.

**प्रत्यूषः** प्रत्यूषस्यतिइतिप्रत्यूषः, प्रभातकाल जो तें. कृ. उषस्धा. प्रभातीभावअ. प्रातःकाल. स्. अ. न.

**प्रत्यूहः** प्रत्यूहनंप्रत्यूहः, प्रत्यूहनं जें तें. कृ. ऊहधा. वितर्कअ. विघ्न. अ. पु.

**प्रथमः** प्रथतेइतिप्रथमः, विख्यात होतो जो तो. कृ. प्रथधा. प्रख्यानअ. आद्य. २ मुख्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रथा** प्रथनंप्रथा, विख्याती जी ती. कृ. धा. पू. श. प्र. प्रसिद्धि. आ. स्त्री.

**प्रथितः** प्रथ्यतेस्मप्रथितः, विख्याति पाविजेला जो तो. कृ. प्रथधा. प्रख्यानअ. प्रख्यात. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रदरः** प्रदीर्यतेप्रदरणमनेनवा प्रदरः, विदीर्णहोतें किंवातें करिजेतोजेणेंकरून तो. कृ. दृधा. विदारणअ. विदारण. २ स्त्रीरोगविशेष. ३ बाण. अ. पु.

**प्रदीपः** विग्रहदीपशब्दाप्र. दीप. अ. पु.

**प्रदीपनः** प्रदीपयतीतिप्रदीपनः,

संताप करणारा जो तो. क्रु. दी पीधा. दीप्तिअ. विषविशेष. अ. पुल्लिं.

**प्रदेशनं** प्रदिश्यतेइतिप्रदेशनं, देइजेतें जें तें. क्रु. दिशधा. अति सर्जनअ. नजराणा. अ. न.

**प्रदेशनी** प्रदिश्यतेनयाप्रदेशनी, अत्यंत तर्जन करिजेतें जीणें करून ती. क्रु. दिशधा. अतिसर्जनअ. आंगठ्या जवळची अंगुळी. ई. स्त्री.

**प्रदेशिनी** प्रदेशोअस्या अस्तीति प्रदेशिनी, अंगुष्ठ समीप भाग - आहे जीस ती. त. अर्थादिप्र. शश्र

**प्रदोषः** प्रारब्धः दोषः अत्रेतिप्रदोषः, अध्ययनादिकाविषयीं सांगितला आहे दोष जाचेठायीं तो. स. रजनीमुखस्य. रात्रीच्या आरंभ. अ. पु.

**प्रद्युम्नः** प्रकृष्टंद्युम्नंबलमस्यप्रद्युम्नः, उत्कृष्ट आहे बल ज्याचें तो. स. मदन. अ. पु.

**प्रद्रावः** प्रद्रवणंप्रद्रावः, पलायन जें तो. क्रु. द्रुधा. गतिअ. पलायन. अ. पु.

**प्रधनं** प्रधानेप्रधनं, परस्परानीं शस्त्र धारण करिजेतें जें तें. क्रु. डुधाञ्धा. धारणअ. युद्ध. अ. न.

**प्रधानं** प्रवर्ततेसर्वमत्रेतिप्रधानं, प्रवृत्त होतें हे सर्व जाचेठायीं तें. क्रु. वृतुधा. वर्तनअ. प्रपंचोत्पत्तीस मुख्य जें कारण मायास्वरूप तें. २ राजास मुख्य जो सहाय तो. ३ प्रमुख. ४ बुद्धि. ५ प्रकृति. ६ परमात्मा.

**प्रधिः** प्रधीयतेअनेनप्रधिः, रथ धारण करिजे तो जेणें करून तो. क्रु. डुधाञ्धा. धारणअ. रथाच्या चाकाचा भूस्पर्शी भाग. इ. स्त्री.

**प्रपंचः** प्रपंचतेइतिप्रपंचः, विस्तृत होतो जो तो. क्रु. पचिधा. व्यक्तीकरणअ. वैपरित्य. २ शब्दाचा विस्तार. ३ संसार. ४ प्रतारण. अ. पु.

**प्रपदं** प्रकृष्टंपदंप्रपदं, प्रकृष्ट जें पद तें. स. पायांचा चवडा. अ. नपुं.

**प्रपा** प्रपिबंतिअस्यामितिप्रपा, उदक प्राशन करितात जीचेठायीं ती. क्रु. पाधा. पानअ. जलशा

ला. आ. स्त्री.

**प्रपात:** प्रपतत्यस्मात्प्रपातः, पतन होतें ज्यातटापासून तो. कृ. पत्लृधा. गतिअ. पर्वताचा तुटलेला कडा. अ. पु.

**प्रपितामह:** प्रकृष्टःपितामहः प्रपितामहः, पित्याचा जो पितामह तो. स. पणजा. अ. पु.

**प्रपितामही** प्रपितामहस्यस्त्री प्रपितामही, प्रपितामहाची जी स्त्री ती. स्त्रीप्र. बापाचे बापाची आई. ह्म. पणजी. ई. स्त्री.

**प्रपुन्नाड:** पुमांसंनाडयतीति पुन्नाडः, प्रकृष्टःपुन्नाडः प्रपुन्नाडः, पुरुषाप्रत अधोगमन करणारा जो तो पुन्नाड प्रकृष्ट ह्म. अत्यंत जो पुन्नाड तो. स. टाकळा अ. पु.

**प्रपौंडरीकं** पुंडरीकेनसदृशंपौंडरीकं, प्रकृष्टंपौंडरीकंप्रपौंडरीकं, पुंडरीक सदृशजें तें पौंडरीक उत्कृष्ट जें पौंडरीक ह्म. श्वेत कमळयुक्त तें. स. सातवणा ज्यारवीं पानें असतात तो वृक्ष. अ. न.

**प्रफुल्ल:** प्रकर्षेणफुल्लतीतिप्रफुल्लः, उत्कृष्ट विकास पावणारा जो तो. कृ. फुल्लधा. विकसनअ. फुल्लेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रबंधकल्पना** प्रबंधस्यकल्पनाप्रबंधकल्पना, श्लोकाची जी रचना ती. स. कथा. आ. स्त्री.

**प्रबोधनं** प्रबुद्धिःप्रबोधनं, गतगंधाचें जें उद्बोधन तें. कृ. बुधधा. अवगमनअ. जागृत करणें. २ ज्या वस्तूचा गंध गेला त्यास पुनः गंध आणणें. अ. न.

**प्रभंजन:** प्रकर्षेणभनक्तीतिप्रभंजनः, बलात्कारानें वृक्षादि भग्न करितो जो तो. कृ. भंजोधा. आमर्दनअ. वायु. अ. पु.

**प्रभव:** प्रभवत्यस्मात्प्रभवः, उत्पन्न होतो ज्यापासून तो. कृ. भूधा. सत्ताअ. जन्महेतु. २ ज्या वस्तूचें ज्यापासून प्रथम ज्ञान होतें तो. ३ पराक्रम. अ. पु.

**प्रभा** प्रकर्षेणभातीतिप्रभा, प्रकर्षेकरून शोभत्ये जी ती. कृ. भाधा. दीप्तिअ. कांति. आ. स्त्री.

**प्रभाकर:** प्रभांकरोतीतिप्रभाकरः, प्रभेतें करणारा जो तो. कृ. कृ

न्भूधा. करणअ. सूर्य. अ. पु.

**प्रभातं** प्रकर्षेणभातुंवृत्तंप्रभातं, उत्कर्षे करून देदीप्यमान होण्या करितां प्रवृत्त झालें जें तें. कृ. भाधा. दीप्तिअ. प्रातःकाल. अ. न.

**प्रभावः** प्रभवंत्यनेनप्रभावः, समर्थ होतो जेणें करून तो. कृ. भूधा. सत्ताअ. धनाढ्यता वसैन्य त्यां पासून जो यजमानाचे ठायीं तेजोविशेष असतो तो. २ सामर्थ्यातिशय. अ. पु.

**प्रभिन्नः** प्रभिद्यतेस्मप्रभिन्नः, मदानें भिन्न होणारा जो तो. कृ. भिदिर्धा. विदारणअ. ज्याच्या मस्तकापासून मदस्राव होत आहे असा हत्ती. अ. पु.

**प्रभुः** प्रभवतीतिप्रभुः, समर्थ होतो जो तो. कृ. भूधा. सत्ताअ. स्वामी. २ नायक. ३ समर्थ. उ. पु.

**प्रभूतं** प्रभवतितीप्रभूतं, प्रकर्षे करून झालें जें तें. कृ. भूधा. सत्ताअ. पुष्कळ. वि. अ. पु. न. आ. स्त्रीलिंगीं.

**प्रभ्रष्टकः** प्रभ्रंशितुंप्रवृत्तःप्रभ्रष्टकः, अधः पतन करावयाकारणें जो योग्य तो. कृ. भ्रंशुधा. अधःपतनअ. जी माळ शेंडींत किंवा वेणींत लोंबत असते ती. अ. पु.

**प्रमथः** प्रमथ्नातीतिप्रमथः, प्रकर्षे करून मथन करितो जो तो. कृ. मथेधा. विलोडनअ. महादेवाचा गणविशेष. अ. पु.

**प्रमथनं** प्रमथ्यतेप्रमथनं, हिंसा जी तें. कृ. मथधा. हिंसाअ. ठार मारणें अ. न.

**प्रमथाधिपः** प्रमथानामधिपः प्रमथाधिपः, प्रमथांचा जो अधिप म्ह. स्वामी तो. स. महादेव. अ. पुल्लिं.

**प्रमदः** प्रमद्यतेइतिप्रमदः, हर्ष जो तो. कृ. मदीधा. हर्षअ. हर्ष. अ. पु.

**प्रमदवनं** प्रमदानांवनंप्रमदवनं, स्त्रियाला क्रीडार्थ जें वन तें. स. राजांच्या स्त्रियांचें क्रीडारण्य. अ. न.

**प्रमदा** प्रमदोहर्षोस्त्यस्याःसाप्रमदा हर्ष आहे जीस ती. त. जीस मदनवेग पुष्कळ आहे ती बायको. आ. स्त्री.

**प्रमना:** प्रकृष्टंमनोयस्यप्रमना:, उत्कृष्ट आहे अंत:करण ज्याचें तो. स. ज्याचें अंत:करण हर्षयुक्त आहे तो. वि. स. पु. न. स्त्री.

**प्रमा** विग्रहादिप्रमितिशब्दाप्रमाणें यथार्थज्ञान. आ. स्त्री.

**प्रमाणं** प्रमीयतेअनेनवाप्रमाणं, मान करिजेतें किंवा ज्याचा योगानें परिमाण करिजेतें तें. कृ. माङ् धा. मानअ. अंगुलिमान अंगुली वीत हात इत्यादिकांनीं जें मोजणें तें व मोजण्याचें साधन. २ हेतु,कारण. ३ मर्यादा. ४ शास्त्र. ५परिच्छेद. ६मोजणारा. अ. न.

**प्रमातामह:** प्रकर्षेणमातामह: प्रमातामह:, आईच्या बापाचाजो बापतो. स. आईच्याबापाचाबाप. अ. पु.

**प्रमाद:** प्रमद्यतइतिप्रमाद:,अनवधानजें तो. कृ. मदीधा. ग्लेपन अ. अनवधान. अ. पु.

**प्रमापणं** प्रमाप्यतेइतिप्रमापणं, हिंसन जें तें. कृ. मीञ्धा. हिंसा अ. ठार मारणें. अ. न.

**प्रमापनं** प्रमाप्यतेइतिप्रमापनं, हस्तादिकांनीं जें मारणें तें. कृ. मीञ्धा. हिंसाअ. ठार मारणें. अ. न.

**प्रमिति:** प्रमाणंप्रमिति:, प्रमाण जें ती. कृ. माङ् धा. मानअ. यथार्थज्ञान. इ. स्त्री.

**प्रमीत:** प्रमीयतेस्माप्रमीत:, प्रकर्षे करून हिंसित करिजेला जो तो. कृ. मीञ्धा. हिंसाअ. यज्ञासाठीं मारलेला पशु. अ. पु. २मेलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रमीला** प्रमीलंतींद्रियाणि अत्रेतिप्रमीला, निमीलन पावताहेत इंद्रियें जीचाठायीं ती. कृ. मीलधा. निमेषणअ. निद्राजन्यआलस्य. २ अत्यंत श्रमानें जें असामर्थ्य ती. आ. स्त्री.

**प्रमुख:** प्रकृष्टंमुखमस्यप्रमुख:, प्रकृष्ट आहे मुख ज्याचें तो. स. मुख्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रमुदित:** प्रमोदतेस्मप्रमुदित:, हर्ष पावताझाला जो तो. कृ. मुद धा. हर्षअ. हर्षयुक्त. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रमोद:** प्रमोद्यतेइतिप्रमोद:, हर्षजो तो. कृ. मुदधा. हर्षअ. ह

र्ष. अ. पु.

**प्रयत:** प्रयच्छतिस्मेतिप्रयत:, शांति पावणारा जो तो. कृ. यमधा. उपरमअ. पवित्र. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रयस्तं** प्रयस्यतेस्मप्रयस्तं, प्रयत्नानें कारिजेलें जें तें. कृ. यसूधा. प्रयत्नअ. प्रयत्नानें निष्पन्न. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रयाम:** प्रयमणंप्रयाम:, अत्यंत आदर जो तो. कृ. यमधा. उपरमअ. धनधान्याचेठायीं जोलो. कांचा आदरातिशय तो. अ. पु.

**प्रयुद्धार्थ:** प्रकृष्टंयुद्धं अर्थोयस्यप्रयुद्धार्थ:, प्रकृष्ट युद्ध आहे प्रयोजन ज्याचें तो. स. युद्धार्थअतिशयित जो उद्योग तो. अ. पु.

**प्रयोगार्थ:** प्रयोग: अर्थ: अस्यप्रयोगार्थ:, युद्ध योग आहे प्रयोजन ज्याचें तो. स. अर्थादिपूर्वीच्या शब्दाप्र.

**प्रलंबघ्न:** प्रलंबंहतवानितिप्रलंबघ्न:, प्रलंबासुरातें मारिता झालाजो तो. कृ. हनधा. हिंसाअ. बलराम. अ. पु.

**प्रलय:** प्रलीयतेजगदत्रेतिप्रलय:, लय पावतें हे जगजाचेठायींतो. कृ. लीङ्धा. श्लेषणअ. सृष्टिसंहार. २ मरण. ३ परिस्पंद. ४ नाश. अ. पु.

**प्रलाप:** प्रलप्यतेइतिप्रलाप:, व्यर्थभाषण जें तो. कृ. लपधा. व्यक्तवाणिअ. व्यर्थभाषण. अ. पु.

**प्रवण:** प्रवतेत्रप्रवण:, गमन करितो ज्याचेठायीं तो. कृ. प्रुङ्धा. गतिअ. क्रमानें निम्नभूमि वगैरे. २ नम्र. वि. अ. पु. न. आ. स्त्री. ३ चतुष्पथ स्थ. चवांगा. अ. पु.

**प्रवया:** प्रगतंवयोयस्यसप्रवया: गेलें आहे वय ज्याचें तो. स. वृद्ध. स. पु.

**प्रवल्हिका** प्रवल्हतेइतिप्रवल्हिका, संशययुक्त भाषण करितात्येजी ती. कृ. बल्हधा. भाषाअ. वास्तविक अर्थ गुप्त राखून अर्थांतर स्पष्ट दिसावें असें जें संशय पडण्याजोगें बोलणें तें. आ. स्त्री.

**प्रवह:** प्रकृष्टंवहनंप्रवह:, बहिर्गमन जें तो. कृ. वहधा. प्रापणअ. पाण्याचा बाहेर निर्गम स्थ.

गाहणें. अ. पु.

**प्रवहणं** प्रोह्यतेअनेनप्रवहणं, वहन होइजेतें जेणें करून तें. क्र. वहधा. प्रापणअ. बुरख्याची गाडी. अ. न.

**प्रवारणं** प्रवार्यतेअनेनप्रवारणं. फलस्वीकार करिजेतोजेणें तें. क्र. वृञ्धा. वरणअ. काम्यदान. २ महादान. अ. न.

**प्रवालं** प्रवलतीतिप्रवालं, जीवन करितें जें तें. क्र. वलधा. जीवनअ. रत्नविशेष म्ह. पोवळें. २ अंकूर. ३ वीणादंड. अ. पु. न.

**प्रवाहः** प्रवहणंप्रवाहः, जलप्रवहण जें तो. क्र. वहधा. प्रापणअ. पाण्याचा प्रवाह. अ. पु.

**प्रवासनं** प्रवास्यतेप्रवासनं, छेदन जें तें. क्र. वसधा. छेदनअ. वध. अ. न.

**प्रवाहिका** प्रवहतीतिप्रवाहिका, वाहत्येजी ती. क्र. वहधा. प्रापणअ. संग्रहणी रोग. आ. स्त्री.

**प्रविख्यातिः** प्रविख्यानंप्रविख्यातिः, अत्यंत जी ख्याती ती. क्र. ख्याधा. प्रकथनअ. अतिप्रसिद्धि. इ. स्त्री.

**प्रविदारणं** प्रविदार्यतेतत्प्रविदारणं, परस्पर जें भेदन तें. क्र. दृधा. विदारणअ. युद्ध. अ. न.

**प्रवीणः** वीणयाप्रगायतिप्रवीणः, वीणें करून गायन करितो जो तो. क्र. वीणाप्रकारधा. गायन निपुण. अ. पु.

**प्रवृत्तिः** प्रवर्तनंप्रवृत्तिः, जलादि प्रवर्तन जें ती. क्र. वृतुधा. वर्तनअ. वास्तवीक लोकवृत्तांत सांगणें. २ प्रवाह. ३ निवृत्तीचा प्रतिपक्षी. इ. स्त्री.

**प्रवृद्धं** प्रवर्द्धतेस्मप्रवृद्धं वृद्धी पावतें झालें जें तें. क्र. वृधुधा. वृद्धिअ. वृद्धिंगत. २ प्रौढ. ३ पसरलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रवेकः** प्रविनक्तीतिप्रवेकः, सारासार विचार करितो जो तो. क्र. विचिर्धा. पृथग्भावअ. मुख्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रवेणिः प्रवेणी** प्रकर्षेणवीयतेस्यांप्रवेणिः, प्रकर्षेकरून वाधिजतें कि कागज निक्षिप्त होतो जीच्याठायीं ती. क्र. वीधा. गतिअ. वेणी. २

हत्तीच्या पाठीवर घालावयाचें आस्तरण. इ. २ ई. स्त्री.

**प्रवेष्टः** प्रकर्षेणवेष्टतेइतिप्रवेष्टः, प्रकर्षें करून वेष्टन करितो जो तो. कृ. वेष्टधा. वेष्टनअ. बाहु. अ. पु.

**प्रव्यक्तं** प्रव्यंचतेस्मप्रव्यक्तं, स्फुट करिजेलें जें तें. कृ. अंचुधा. गत्यादिअ. उघड. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रश्नः** पृच्छनइतिप्रश्नः, पृच्छा जी तो. कृ. प्रच्छधा. ज्ञीप्साअ. पृच्छा. अ. पु.

**प्रश्रयः** प्रश्रयणंप्रश्रयः, सेवन जें तो. कृ. श्रिञ्धा. सेवाअ. प्रीति. अ. पु.

**प्रश्रितः** प्रकृष्टंश्रयतिप्रश्रितः, अत्यंत सेवा करिता झाला जो तो. कृ. श्रिञ्धा. सेवाअ. नम्र. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रष्ठः** प्रतिष्ठतेगच्छतीतिप्रष्ठः, अग्र गमन करणारा जो तो. कृ. ष्ठाधा. गतिनिवृत्तिअ. अग्रसर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रष्ठवाट्** प्रष्ठंप्रहतीतिप्रष्ठवाट्, अग्रगामीप्रत वहन करितो जो तो. कृ. वहधा. प्रापणअ. ज्या बैलाच्या खांद्यावर जूं वगैरे घालून दमून वठणीस येण्यासाठीं फिरवितात तो बैल. हृ. पु.

**प्रष्ठौही** प्रष्ठंवहतीतिप्रष्ठौही, प्रथम गर्भ वाहणारी जी ती. कृ. वहधा. प्रापणअ. बाला असून गर्भिणी जी गाय ती. ई. स्त्री.

**प्रसन्नः** प्रसीदतीतिप्रसन्नः, संतुष्ट होतो जो तो. कृ. षद्लृधा. गत्यादिअ. संतुष्ट. २ निर्मळ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रसन्नता** प्रसन्नस्यभावःप्रसन्नता, प्रसन्नाचा जो भाव ती. त. प्रसन्नपणा. २ स्वच्छता. आ. स्त्री.

**प्रसन्ना** प्रसीदतिस्मप्रसन्ना, पान करणाऱ्यानें विशीर्ण करणारी जी ती. कृ. षद्लृधा. विशरणादिअ. मद्य. आ. स्त्री.

**प्रसभं** प्रगतासभायस्मात्प्रसभं, गेली आहे सभा ज्यापासून तें. स. बलात्कार. अ. न.

**प्रसरः** प्रसरणंप्रसरः, व्रणादि प्रसरण जें तो. कृ. सृधा. गतिअ.

व्रणादिकांचें प्रसरण. २ प्रीति.
अ. पु.

**प्रसरणं. प्रसरणिः** प्रसृ
तिः प्रसरणं, सर्वतः जें गमन
तें. कृ. सृधा. गतिअ. अधिकप्र
देशीं व्याप्ति. २ पसरणें. अ. न. २
इ. स्त्री.

**प्रसरणी** विग्रहादिप्रसरणश
ब्दाप्रमाणें. ई. स्त्री.

**प्रसवः** विग्रहादिप्रसूतिशब्दाप्र
यहा प्रसवनंप्रसूयतेवाप्रसवः, प्रा
णिप्रसवन जें तें. किंवातेंकरिजे
ती जो तो. कृ. षूङ्धा. प्राणिप्रसव
अ. प्रसूत होणें. २ उत्पत्ती. ३ फूल
४ पुष्प. ५ अपत्य. अ. पु.

**प्रसवबंधनं** प्रसूयतेसोप्रसवः,
तस्यबंधनंप्रसवबंधनं, उत्पन्न
होतेंज्याचेंजें बंधन स. देट तें. स.
फूल फळ इत्यादिकांचा देंट. अ.न.

**प्रसव्यं** प्रगतंसव्यात्प्रसव्यं, सव्या
हून भिन्न जें तें. स. विपरीत. वि.
अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रसह्य** प्रकर्षेणसोढं प्रसह्य, प्र
कर्षे करून सहन करून. कृ. षह
धा. मर्षणअ. बलात्कारें करूनत्या
अर्थी अव्यय.

**प्रसादः** प्रसाद्यतेनेनप्रसादः, प्र
साद करिजेतो जेणें तो. कृ. षद्लृधा
विशरणादिअ. अनुग्रह. २ निर्म
लता. ३ प्रसन्नता. ४ काव्यगुण
विशेष. अ. पु.

**प्रसाधनं** प्रसाध्यतेनेनांगमिति
प्रसाधनं, अंग अलंकृत करिजेतें
जेणें तें. कृ. साधधा. संसिद्धिअ.
अलंकारकृत शोभा. अ. न.

**प्रसाधनी** प्रसाध्यतेनयाप्रसाध
नी, प्रसाध्यतेह्य. सुशोभन करि
जेतें जीणें करून ती. कृ. साधधा.
सिद्धिअ. अलंकार युक्त. वि. अ.
पु. न. आ. स्त्री.

**प्रसाधितः** प्रसाध्यतेस्मप्रसा
धितः, अलंकृत करिजेतो जो तो.
कृ. साधधा. संसिद्धिअ. अलंका
रयुक्त. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रसारिणी** प्रसार्यतेंगमनया
इतिप्रसारिणी, अंगप्रसृत हो
इजेतें जीणें ती. कृ. सृधा. गति
अ. चांदवेल. ई. स्त्री.

**प्रसारी** प्रसरणशीलः प्रसारी, प्र
सरण शील जो तो. कृ. सृधा. गति

अ. पसरट. वि. इन्. पु. ई. स्त्री. इन्. न.

**प्रसितः** प्रासायि इतिप्रसितः, बंधन करिजेला जो तो. कृ. षिञ् धा. बंधनअ. आसक्त ह्म. तत्पर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रसितिः** प्रसीयतेइतिप्रसितिः, बंधन जें ती. कृ. षिञ्धा. बंधनअ. बंधन किंवा त्याचें साधन दोरी व गैरे. इ. स्त्री.

**प्रसिद्धः** प्रसिध्यतीतिप्रसिद्धः, प्रसिद्धी पावतो जो तो. कृ. षिधु धा. संसिद्धिअ. प्रख्यात. २ भूषित. वि. अ. पु. न. आ. स्त्री

**प्रसूः** प्रसूयतेइतिप्रसूः, प्रसवणारी जी ती. कृ. षूङ्धा. प्रसवअ. जननी २ घोडी. ३ कदलीनामाहरिण. ४ वेल. ऊ. स्त्री.

**प्रसूता** प्रासाविष्टेतिप्रसूता, पुत्रातें प्रसवती झाली जी ती. कृ. षूङ् धा. प्राणिगर्भमोचनअ प्रसूत झालेली. आ. स्त्री.

**प्रसूतिः** प्रसवनंप्रसूतिः, प्रसवन किंवा प्रेरण जें ती. कृ. षूङ्धा. प्रसवअ. प्रसूतहोणें. इ. स्त्री.

**प्रसूतिका** विग्रहादिप्रसूता शब्दाप्र. प्रसूत जाहलेली. आ. स्त्री.

**प्रसूतिजं** प्रसूतोजातंप्रसूतिजं, प्रसूति कालीं जें उत्पन्न दुःख तें. कृ. जनी धा. प्रादुर्भावअ. प्रसूतकालींची वेदना. अ. न.

**प्रसूनं** प्रसूयतेइतिप्रसूनं, अभिषव करिजेतें जें तें. कृ. षूञ् धा. अभिषवअ. फूल. २ फळ. अ. न. ३ उत्पन्न. वि. अ. पु. न. आ. स्त्री

**प्रसूजनयितारौ** प्रसूश्वजनयिताचप्रसूजनयितारौ आई आणि बाप जेते. स. मातापितर. कृ. आई आणि बाप यांची सहोक्ति आहे. ऋ. पु.

**प्रसृतं** प्रसरतिस्मप्रसृतं, प्रसरण पावतें झालें जें तें. कृ. सृधा. गतिअ. पसरलेलें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रसृता** प्रसरतिस्मप्रसृता. प्रसृत केली जी ती. कृ. सृधा. गतिअ. पायांची पोटरी. आ. स्त्री.

**प्रसृतिः** प्रकृष्टासृतिःप्रसरणमस्याः प्रसृतिः, प्रकृष्ट ह्म. आकृष्ट आहे विस्तार जीचा ती. स.

कुडवा. इ. स्त्री.

**प्रसेवः** प्रसीव्यतेस्मप्रसेवः, अ र्थादिस्यूतशब्दप्रमाणें धान्या दि ठेवण्याचें भांडें गोणी वगैरे. अ.पु.

**प्रसेवकः** प्रकर्षेणसेव्यतेइति प्रसेवकः, प्रकर्षें करून सेवि जेतो जो तो. कृ. षेवृधा. सेव नअ. वीणेचा भोपळा. अ.पु.

**प्रस्तरः** प्रकर्षेणस्तृणातीतिप्र स्तरः, अत्यंत मजबुदीनें आ च्छादन होतो जो तो. कृ. स्तृ धा. आच्छादनअ. पाषाण ह्म. द गड. अ.पु.

**प्रस्तावः** प्रस्तवनंप्रस्तावः, प्रस्त वन जें ह्म. स्तुती जी तो. कृ. ष्टुञ्धा. स्तुतिअ. प्रसंग. अ.पु.

**प्रस्थः** प्रस्थीयतेअनेनप्रस्थः, जेणें करून स्थिती होत्से तो. कृ. ष्ठाधा. गतिनिवृत्तिअ. सपाट जो पर्वताचा येक देश तो. २प रिमाणविशेष ह्म. शेर. अ.पु.न.

**प्रस्थपुष्पः** प्रस्थेपुष्प्यतीतिप्रस्थ पुष्पः, पर्वतशिखराचेठायीं जो फुलतो तो. कृ. पुष्पधा. विकसन

अ. पांदरा मरवा. अ.पु.

**प्रस्थानं** प्रस्थितिःप्रस्थानं, ग मन जें तें. कृ. ष्ठाधा. गतिनिवृत्ति अ. प्रयाण. अ.न.

**प्रस्रवणं** प्रस्रवंतीआपःअस्मा न्इतिप्रस्रवणं, पाझरताहेतउ दकें जा पासून तें. कृ. स्रुधा. ग तिअ. स्रवणें. २ पाणि ठेवण्याचें भांडें वगैरे. अ.न.

**प्रस्फोटनं** प्रस्फोट्यतेनेनप्रस्फो टनं, धान्य नीट कारिजेतें जेणें तें. कृ. स्फुटधा. विकसनअ. सूप. अ.न.

**प्रस्रावः** प्रस्रूयतेइतिप्रस्रावः, प्रस्रविजेतो जो तो. कृ. ष्णुधा. प्रस्र वणअ. मूत्र. अ.पु.

**प्रहरः** प्रह्रीयतइतिप्रहरः, प्रक र्षें करून हरण होइजे तो जो तो. कृ. हृञ्धा. हरणअ. अहोरात्रा चा आठवा भाग ह्म. साडेसात घटिका. अ.पु.

**प्रहरणं** प्रह्रीयतेअनेनप्रहरणं, हरण करिजेतें जेणें करून तें. कृ. हृञ्धा. हरणअ. शस्त्र. अ.न.

**प्रहारणं** प्रह्रीयतेप्रहारणं, ग्रह

णकरिजेलें जें तें. कृ. धा. पू. श. प्र. काम्यदान. २ महादान. अ. न.

**प्रहस्तः** प्रसृतोहस्तः प्रहस्तः, पसरलेला असा जो हात तो. स. व्याकुक. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ पसरलेलाहात. अ. पु.

**प्रही** जलंप्रजहातिददातीतिप्रही, जलाप्रत देत्ये जी ती. कृ. ओहाकधा. त्यागअ. विहीर. ई. स्त्री.

**प्रहेलिका** प्रहेलयतिसूचयतिभावार्थमितिप्रहेलिका, अभिप्रायातें सूचना करणारी अशी जी ती. कृ. हिलधा. भावकरण अ. अर्थ प्रवल्हिकाशब्दाप्रमाणें. आ. स्त्री.

**प्रल्हन्नः** प्रल्हाद्यतेस्यप्रल्हन्नः, सुखपाविजेला जो तो. कृ. ल्हादीधा. सुखअ. हर्षयुक्त. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रांशुः** प्रकृष्टाअंशावोस्यप्रांशुः, उत्कृष्ट आहेत अंशु म्ह. किरण ज्याचे तो. स. उंच. वि. उ. पु. स्त्री. न.

**प्राकारः** प्रक्रियतेइतिप्राकारः, अत्यंत दृढ करिजेतो जो तो. कृ. डुकृञ्धा. करणअ. कुंपण किंवा तट. अ. पु.

**प्राकृतः** प्रकृतौभवःप्राकृतः, मायेचाठायीं, झाला जो तो. त. क्षुल्लक. अ. पु.

**प्राक्** प्राचिदेशेइतिप्राक्, पूर्वदेशाचेठायीं जें तें. त. अतीत ह्या अर्थी अव्य.

**प्राग्र्यः** प्रागेभवःप्राग्र्यः, अग्रभागींहो तो जो तो. त. मुख्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्राग्वंशः** प्रकर्षेणांचतीतिप्राक्सचासौवंशश्चप्राग्वंशः, हविःशालेच्या पूर्वेस स्थित जो स्तंभ तो. समास ह्याति. यज्ञशालेचे ठायीं पूर्वदिशेस वेदोक्त यज्ञकर्मै करणारे जे ऋत्विजादिक त्यांसजी तेथें राहाण्याची जागा केलेली असते ती. किंवा यज्ञशालेचा पूर्वस्ले भत्यांवर लांब लांकूड ठेवलेलें असतें तें. अ. पु.

**प्राग्रहरः** प्रकृष्टमग्रंहरतिप्राग्रहरः, अग्र भागातें हरण करितो जो तो. कृ. हृञ्धा. हरणअ. प्रमुख. अ. पु.

**प्राघार:** प्राघरणंप्राघार:, घृतादिक्षरण जें तो. क्रु. घृधा. क्षरणादिअ. घृतादिकांचें क्षरण. अ. पुल्लिंगीं.

**प्राञ्चिका** प्रांचतीतिप्राञ्चिका, प्रकर्षें करून गमन करित्ये जी ती. क्रु. अंचुधा. गत्यादिअ. रानमाशि. आ. स्त्री.

**प्राची** प्रागंचतिसूर्येणेतिप्राची पूर्वी सूर्यानें करशोभित होत्येजी ती. क्रु. अंचुधा. पूजाअ. पूर्वदिशा. ई. स्त्री.

**प्राचीना** प्राचिभवाप्राचीना, पूर्वे दिशेचाठायीं जाहली जी ती. त. जीस पाहाड मूळ असें ह्मणतात ती. आ. स्त्री.

**प्राचीनावीतं** प्राचीनंदक्षिणमावीयतेस्मप्राचीनावीतं, दक्षिणस्कंधाचेठायीं जें क्षिप्ततें. क्रु. वीधा. असनादिअ. उजवे खांद्यावरून घातलेलें यज्ञोपवीत अ. न.

**प्राचीरं** प्राचीयतेइतिप्राचीरं, परिधीकृत केलें जें तें. क्रु. चिञ्धा. चयनअ. शहर व घर इत्यादिकांचे सभोंवार जें वेढूनें वगैरे वेष्टन असतें तें. अ. न.

**प्राच्य:** प्राच्यांभव: प्राच्य:, प्राचीदिशेचाठायीं जो विद्यमान तो. त. शरावती नदीपर्यंत जो पूर्व दक्षिण देश तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्राजनं** प्रवीयतेअनेनप्राजनं, वृषभादिकांतें प्रेरणा करिजेते जेणें करून तें. क्रु. अजधा. गतिविशेषअ. चाबूक. अ. न.

**प्राजिता** प्रकर्षेणाजतीतिप्राजिता, प्रेरणा करणारा जो तो. क्रु. अजधा. गत्यादिअ. सारथि. ऋ. पु.

**प्राज्ञ:** प्रज्ञास्त्यस्यप्राज्ञ:, प्रशस्त आहे बुद्धि जाची तो. त. पंडित. अ. पु.

**प्राज्ञा** प्रज्ञास्त्यस्या:इसाप्राज्ञा, बुद्धि आहे जीस ती. त. बुद्धिमती स्त्री. आ. स्त्री.

**प्राज्ञी** प्रज्ञायतइतिप्रज्ञा सैव प्राज्ञी, प्रकर्षें करूनजाणणारी जी ती. प्रज्ञा. तीच प्राज्ञी. स. बुद्धिमती स्त्री. ई. स्त्री.

**प्राज्यं** प्रवीयतेइतिप्राज्यं, अधिक प्राप्त करिजेतें जें तें. क्रृ. अज धा. गतिअ. पुष्कळ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्राड्विवाक:** प्रच्छन्नंप्राट् विवचनंविवाक:, प्राड्च विवाकश्चताव स्यस्तइतिप्राड्विवाक:, प्रश्नआणिविचारहे आहेतजास तो. त. न्यायाधीश. अ. पु.

**प्राण:** प्राणंत्यनेनेतिप्राण:, ज्या संचाराने प्राणीजीवन पावतात तो. क्रृ. अनधा. प्राणनअ. शरीरांत संचार करणारावायु. २ पराक्रम. ३ गंध रसविशेष रूरत्न्याबोळ. अ. पु.

**प्राणी** प्राणोस्यास्तीतिप्राणी, प्राण आहे जास तो. त. जंतुरूप्राणवान्. इन्. पु.

**प्रात:** प्रानतीतिप्रात:, प्रात:काल याअर्थीतेंनिरंतर बोधक जें तें. क्रृ. अतधा. सातत्यगमनअ. प्रात: काल त्या अर्थी अव्य.

**प्रातिहारक:** प्रतिहरणंप्रातिहारोव्याज: सप्रयोजनमस्यप्रातिहारक:, कपटआहे प्रयोजन जाचें तो. त. गारुडी. अ. पु.

**प्राथमकल्पिक:** प्रथमकल्प आद्यारंभ: प्रयोजनमस्यप्राथमकल्पिक:, प्रथमारंभआहे प्रयोजन जाचें तो. ज्याणें अध्ययनास आरंभ केला आहे असा बटु. अ. पु.

**प्रादु:** प्रकर्षेण अत्तिइतिप्रादु:, तमानिघ्नन्ति रूप्रकाशित स्यातें करितेंरूनहोधक जें तें. क्रृ. अद्धा. भक्षणअ. नाम. २ प्रकाशित त्या अर्थी. अव्यय.

**प्रादेश:** प्रदिश्यतेनेनप्रादेश:, अत्यंत तर्जन होइजेतें जेणें करून तो. क्रृ. दिशधा. अतिसर्जनअ. तर्जनी सहित विस्तृत जो अंगुष्ठ तो. अ. पु.

**प्रादेशनं** प्रादिश्यतइतिप्रादेशनं, दान जें तें क्रृ. दिशधा. अतिसर्जनअ. दान. अ. न.

**प्राध्वं** प्राध्वनतीतिप्राध्वं, अनुकूल्यार्थीतें बोलिजेजें तें. क्रृ. ध्वनधा. शब्दअ. आनुकूल्यार्थी अव्य

**प्रांतरं** प्रकृष्टंअंतरंअत्रइतिप्रांतरं, प्रकृष्ट आहे अंतर ज्यांतेंग

-यांतें. स. ज्यामार्गीं छायापाणी नाहीं असा जो दूरचा मार्ग तो. अ. न.

**प्राप्तं** प्राप्यतेस्मप्राप्तं, लब्धकरि जेलें जें तें. कृ. आप्लृधा. व्याप्तिअ मिळालेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्राप्तपंचत्वः** प्राप्तंपंचत्वंयेनस प्राप्तपंचत्वः, प्राप्त आहे मरणजे णें तो. स. मेलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्राप्तरूपः** प्राप्तोरूपंप्राप्तरूपः, रूपाप्रत जो प्राप्त तो. स. पंडित. अ. पु. २ मनोहर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्राप्तिः** प्राप्यतेइतिप्राप्तिः, पावि जेत्येजी ती. कृ. आप्लृधा. लंभन अ. उत्पत्ती. २ लाभ. इ. स्त्री.

**प्राप्यं** प्राप्यतेस्मप्राप्यं, प्राप्तुंश क्य जें तें. कृ. आप्लृधा. लंभन अ. मिळवावयाची जागा. अ. न.

**प्राभृतं** प्राभृयतेस्मइतिप्राभृ तं, भरण करिजेतें जें तें. कृ. भृञ्धा. भरणअ. नजराणा. अ. न.

**प्रायः** प्रायनंप्रायः, प्रकर्षें करू न जें गमन ह्म. संन्यासपूर्वक भो जनत्याग जो तें. कृ. अयधा. ग तिअ. संन्यासपूर्वक अभोजन. २ बाहुल्य. ३ नाश जाणविणा रें चिन्ह. अ. पु.

**प्रायः** प्रकृष्टमयनंप्रायः, वैकुं ठादि स्थानप्राप्ति साधन जें तो. कृ. इणधा. गतिअ. बाहुल्यार्थी अव्य.

**प्रालंबं** प्रालंबतेइतिप्रालंबं, अधोभागपर्यंत लंबायमान प डतें जें तें. कृ. लबिधा. अवस्रं सनअ. गळ्यामध्यें सरळ लों बणारी माळ. अ. न.

**प्रालंबिका** प्रालंबतेइतिप्रालं बिका, कंठाचाठायीं प्रकर्षें करू न लोंबणारी जी ती. कृ. लंबिधा. अवस्रंसनअ. नाभिपर्यंत लों बणारी सोन्याची कंठी. आ. स्त्री.

**प्रालेयः** प्रलीयंतेपदार्थाअत्र इतिप्रालेयः, ततआगतंप्रालेयं, लय पावतात पदार्थ ज्याचेठायीं तो प्रलय त्यापासून प्राप्त जें तें. त. थंडी. २ बर्फ. अ. न.

**प्रावृतं** प्राव्रियतेस्मइतिप्रावृ तं, आवरण करिजेतें जें तें.

कृ. वृञ्धा. वरणअ. पांघुरले लें वस्त्र. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रावारः प्रावरः** प्राव्रियतेने नप्रावारः, आच्छादन करिजे तें जेणें करून तो. कृ. वृञ्धा. वरणअ. उत्तरीय वस्त्र. अ. पु.

**प्रावृषायणी** प्रावृषिएतिअ यतेवा प्रावृषायणी, प्रावृट् का लाचे ठायीं गमन करित्ये जी ती. कृ. इण्धा. २ अयधा. गतिअ. काच कुयरी. ई. स्त्री.

**प्रावृट्** प्रकर्षेणवर्षतइतिप्रावृट् प्रकर्षें करून वृष्टि करित्ये जी ती कृ. वृषुधा. सेचनअ. वर्षाकाल ह्म. पावसाळा. षृ. स्त्री.

**प्रासः** प्राश्यतेइतिप्रासः, टाकि जे तो जो तो. कृ. असुधा. क्षेपण अ. शस्त्र विशेष ह्म. सांग. अ. पु.

**प्रासंगः** प्रसज्जतेइतिप्रासंगः संलग्न करिजे तो जो तो. कृ. षं जधा. संग अ. गाडीस जुंप लेल्या बैलाच्या खांद्यावर घा तलेलें जूं ह्म. जोकड. अ. पु.

**प्रासंग्यः** प्रसंगंवहतीतिप्रा संग्यः, स्कंद काष्ठातें वाहतो जो तो. कृ. वहधा. प्रापणअ. न म्र होष्या करितां गळ्यांत लांकूड बांधलेले गाई बैल इत्यादि. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रासादः** प्रसीदतिमनः अत्रेति प्रासादः, संतुष्ट होइ जेतें मन जाचे ठायीं तो. कृ. षद्लृधा. गत्या दिअ. देव राजे इत्यादिकांचें जें घर तें. अ. पु.

**प्रासिकः** प्रासः प्रहरणमस्यप्रा सिकः, भल्ल आहे प्रहरण ज्याचें तो. त. प्रासायुधी. अ. पु.

**प्रास्थिकं** प्रस्थस्यवापः प्रस्थिकं, प्रस्थिकं अस्तिअत्रेतिप्रास्थिकं, प्रस्थ परिमाण धान्याचें जें वाप आहे ज्याचे ठायीं तें. त. प्रस्थ परिमित धान्याचें शेत. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्राह्णः** प्रथमंकनत् अह्नप्रा ह्णः, प्रथम जो दिनावयव तो. स. दिवसाच्या तीन भागांतील पहिला भाग. अ. पु. न.

**प्रियः** प्रीणातीतिप्रियः, संतुष्ट करणारा जो तो. कृ. प्रीञ्धा. तर्प णअ. नवरा. अ. पु. २ अभीष्ट.

वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रियक:** प्रीणातिप्रियतेवाप्रियः, सएवप्रियकः, संतुष्ट होतो जो तो प्रिय तोच प्रियक. त. कदंब वृक्ष. २ असणाचें झाड. ३ प्रियंगु वृक्ष. ४ हरिणविशेष. अ. पु.

**प्रियंगु:** प्रियंगच्छतीतिप्रियंगुः, प्रियातें प्राप्त करणारा जो तो. कृ. गम्लृधा. गतिअ. वायाटीचावृक्ष. २ कांगशाळे असें धान्य. उ. पु.

**प्रियता** विग्रहादिप्रेमशब्दाप्रमाणें. प्रेमता. आ. स्त्री.

**प्रियंवद:** प्रियंवदतीतिप्रियंवदः, प्रिय बोलतो जो तो. कृ. वदधा. व्यक्तवाचिअ. प्रियबोलणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रियाल:** प्रीणातीतिप्रियालः, पआदिकांनीं संतोष पावतो जो तो. कृ. प्रीञ्धा. तर्पणअ. चाराचें झाड. अ. पु.

**प्रीणनं** प्रीतिःप्रीणनं, तृप्तीजी ती. कृ. प्रीञ्धा. तर्पणअ. तृप्ति. अ. न.

**प्रीत:** प्रीयतेस्मप्रीतः, संतोषपावता झाला जो तो. कृ. प्रीञ्धा. प्रीतिअ. हर्षयुक्त. वि. अ. पु. न. आ. स्त्रीलिंगीं.

**प्रीति:** प्रीयतेइतिप्रीतिः, हर्ष जो ती. कृ. प्रीञ्धा. तर्पणअ. हर्ष. २ प्रेमा. इ. स्त्री.

**प्लुष्ट:** प्लुष्यतेस्मप्लुष्टः, दग्ध करिजेला जो तो. कृ. प्लुषधा. दाहअ. जळालेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रेक्षा** प्रकृष्टमीक्षतेनयेतिप्रेक्षा, प्रकर्षानें अवलोकतें जीणें ती. कृ. ईक्षधा. दर्शनअ. बुद्धि २ नृत्येक्षण. आ. स्त्री.

**प्रेंखा** प्रेंखतेइतिप्रेंखा. प्राप्त होइजेत्ये जी ती. कृ. इखिधा. गतिअ. डोली. आ. स्त्री.

**प्रेंखित:** प्रेख्यतेस्मप्रेंखितः, चंचल करिजेला जो तो. कृ. धा. पूशा. प्र. किंचित् कांपलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रेत:** प्रकर्षेणइतःप्रेतः, प्रकर्ष करून जो गेला तो. स. नरकामध्यें आहलेला प्राणि. २ मेलेला. अ. पु.

**प्रेत्य** प्रकर्षेणइत्वाप्रेत्य, प्रकर्षें करून गमन करून. कृ. इण्धा.

गतिअ. जन्मांतरीं त्याअर्थी अव्य.

**प्रेम** प्रियस्यभावःप्रेम, प्रियाचा जो भाव ह्म. प्रकार तो. न. प्रेमा. न्. न.

**प्रेष्ठः** अतिशयेनप्रियःप्रेष्ठः, अत्यंत जो प्रिय तो. न. अतिप्रिय. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रेष्यः प्रैष्यः** प्रेष्यतेइतिप्रेष्यः, प्रेषण करिजेतो जो तो. क्रु. इष्धा. गतिअ. चाकर. अ. पु.

**प्रैषः** प्रेषणंप्रेषःसएवप्रैषः, प्रेषण जें तो प्रेष तोनप्रैष न. क्रु. इषधा. इच्छाअ. पाठविणें. २ मर्दन. ३ क्लेश. ४ उन्माद. अ. पु.

**प्रोक्षणं** प्रकृष्टमुक्षणंप्रोक्षणं, प्रकृष्ट जें हिंसन तें. क्रु. उक्षधा. सेचनअ. यज्ञसंबंधि जें पशुहनन तें. २ पवित्रीकरण. अ. न.

**प्रोक्षितः** प्रोक्ष्यतेस्मइतिप्रोक्षितः उत्कृष्टालंभित करिजे तो जो तो. क्रु. उक्षधा. सेचनअ. यज्ञासाठीं मारलेला पशु. अ. पु. २ पवित्रीकृत. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रोथं** प्रोथतइतिप्रोथं, परिभ्रमण करणार जें तें. क्रु. प्रोथृधा. पर्याप्तिअ. घोड्याचें नाक. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रोषः** प्रोषणंप्रोषः, दाह जो तो. क्रु. प्रुषुधा. दाहअ. जळणें. अ. पु. न.

**प्रोष्ठः प्रोष्ठी** प्रकृष्टःओष्ठः अस्यप्रोष्ठः, उत्कृष्ट आहे ओठ ज्याचा तो. स. मत्स्यविशेष. अ. पुल्लिंगीं २इन

**प्रोष्ठपदा** प्रोष्ठोगोःतस्येवपादायस्याःसा प्रोष्ठपदा, गाईसारखे आहेत पाय जीचे ती. स. पूर्वाभाद्रपदा नक्षत्र. २ उत्तराभाद्रपदा नक्षत्र. आ. स्त्री.

**प्रोढं** प्रोह्यतेस्मप्रोढं, वृद्धि करिजेलें जें तें. क्रु. वहधा. प्रापणअ. प्रगल्भ ह्म. वाढलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्रोष्ठपदः** प्रोष्ठपदीअत्रास्तीतीप्रोष्ठपदः, प्रोष्ठपदी आहे जाचे ठायीं तो. त. भाद्रपद मास. अ. पु.

**प्लक्षः** प्रक्षरतीतिप्लक्षः, ऊर्ध्वगमन करितो जो तो. क्रु. क्षरधा. संचलनअ. पिंपरीचें झाड. २ कासि

पिंपरी. अ. पु.

**प्लव:** प्लवतइतिप्लवः, गमनकरि तो जो तो. क्र. प्लुङ्.धा. गतिअ. चांडाल. २लाहान नौकापु.३बेडूक.न.४ पाण कोंबडा. अ. पु. ५.कोंबडा. अ पु.

**प्लवग: प्लवंग:** प्लवनंप्लवः प्लवेनगच्छतीतिप्लवगः, उड्या मारून गमन करितो जो तो. क्र. गमॢधा. गतिअ. वानर. २ बेडूक. ३ सारथी. अ. पु.

**प्लवंगम:** प्लवेनगच्छतीतिप्लवंगमः, प्लवें करून गमन करितोजो तो. क्र. गमॢधा. गतिअ. अर्थादिपूर्वीच्याशब्दाप्रमाणें.

**प्लाक्षं** प्लक्षस्यफलंप्लाक्षं, पिंपरीचें जें फळ तें. त. प्लक्षाचें फळ. अ. न.

**प्लीहा** प्लिहतीतिप्लीहा भेष जानें नष्ट जो तो. क्र. प्लिहधा. गतिअ. वाम कुक्षिस्थ मांस पिंड विशेष. न. पु.

**प्लीहशत्रु:** प्लीहस्यशत्रुःप्लीहशत्रुः, प्लीहरोगाचा जो नाश करितो तो. स. तांबडा रोहिडा वृक्ष. उ. पु.

**प्लुतं** प्लवनंप्लुतं, गमन जें तें. क्र. प्लुङ्.धा. गतिअ. घोड्याची चौक चाल. अ. न.

**प्लुष्ट:** प्लुष्यतेस्मप्लुष्टः, दहन करिजेला जो तो. क्र. प्लुषधा. दाहअ. जळालेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**प्लोष:** प्लोषणंप्लोषः, दाह जो तो. क्र. प्लुषधा. दाहअ. जळणें. अ. पुल्लिंगी

**प्सातं** प्सायतेस्मप्सातं, भक्षण करिजेलें जें तें. क्र. प्साधा. भक्षणअ. खाल्लेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**फंजिका** भनक्तीतिफंजिका, रोगातें नाश करितें जी ती. कृ. भंजोधा. आमर्दनअ. भारंगवृक्ष. आ. स्त्री.

**फटः** स्फुटतीतिफटः, विस्तार पावतो जो तो. कृ. स्फुटधा. विकसनअ. सर्पाची फणा. अ. पु. आ. स्त्री.

**फणा** फणतीतिफणा, विस्तृत होत्ये जी ती. कृ. फणधा. गतिअ. सर्पाची फणा. आ. स्त्री.

**फणिज्जकः** फणाजातोस्मिन्नितिफणिज्जकः, सर्प राहतो ज्याचेठायीं तो. स. पांढरामरवा अ. पु.

**फणी** फणास्यास्तीतिफणी, फणा आहे ज्यास तो. त. सर्प. इन. पु.

**फलं** फलतीतिफलं, विशीर्ण होतें जें तें. कृ. ञिफलाधा. विशरणअ. १ हेतुसाध्य कार्य. २ जायफळ. ३ बाणाचें अग्र. ४ ढाल. ५ नागराचें खालचें लांकूड इस. फाळ. ६ वृक्षादिकांचें फळ. ७ कापूस. अ. न.

**फलकः** फलतीतिफलकः, निष्पन्न होतो जो तो. कृ. फलधा. निष्पत्तिअ. ढाल. अ. पु.

**फलकपाणिः** फलकः पाणौयस्य फलकपाणिः, ढाल आहे हस्ताचे ठायीं ज्याचा तो. स. ढाल धारण करणारा. इ. पु.

**फलत्रिकं** फलानांत्रिकं फलत्रिकं, फलाचें जें त्रय तें. स. हिरडा बेहडा आणि आवळकाठी ह्या तिहींनें कूरक्षत्रिफला. अ. न.

**फलपूरः** फलेनपूर्यतइतिफलपूरः, फलांनीं पूरण होइजे तो जो तो. कृ. पूरीधा. आप्यायनअ. माहाळुंगाचें झाड वत्याचें फळ. अ. पुल्लिंगीं.

**फलवान्** फलंआस्तिअस्यफलवान्, फल आहे ज्यास तो. त. ज्यास फळ आहे तो. वृक्षादि. वि. त. पु. ई. स्त्री. तं. न.

**फलसः** फलंअस्तियस्यसः फलसः, प्रशस्त फल आहे ज्यास तो. त. फणसाचें झाड. अ. पु.

**फलाध्यक्षः** फलानामध्यक्षः फलाध्यक्षः, फलांचा जो अध्यक्ष

स्न. स्नमी: तो. स. खिरणीचें झाड. अ. पु.

**फलिन:** विग्रहादिसर्वफलव नूशब्दाप्रमाणें. अ. पु.

**फलिनी** फलमस्त्यस्याः फलिनी फल आहे जीस ती. त. वाघांटी. २ कळलावी वनौषधी. ई. स्त्री.

**फली** फलमस्यास्तीतिफली, फल आहे जास तो. त. जास फळें आहेत तो वृक्ष. वि. इन्. पु. ई. स्त्री. न.

**फलेग्राहि:** फलानिगृण्हातीति फलेग्राहिः, फलातें ग्रहण करणारा जो तो. कृ. ग्रहधा. उपादानअ. फळ यावयाच्या समयीं ज्यास फळें येतात तो वृक्ष. इ. पु.

**फलेरुहा** फलेरोहतीतिफलेरुहा, फलाचेठायीं उत्पन्न होते जी ती. कृ. रुहधा. बिजयजन्मादिअ. वनस्पतिविशेष पाडली. आ. स्त्री.

**फल्गु:** फलतीतिफल्गुः, विशीर्ण होतो जो तो. कृ. ञिफलाधा. विशरणअ. बोखाडा सर्वत. उ. पु.

**फाणितं** फाण्यतेइतिफाणितं, गमन करवितें जें तें. कृ. फणधा. गतिअ. काकवी. अ. न.

**फांटं** फण्यतेस्मफांटं, अनायासानें प्राप्त करिजेलें जें क्वाथादि तें. कृ. फणधा. गतिअ. अनायासीनें झालेला कषायविशेष. अ. न.

**फालं** फलस्यविकारः फालं, फलांचा जो विकार तें. त. कारणसवस्त्र. २ नागराचें खालचें लोकूड स्न. लेहूं. अ. न.

**फाल्गुन:** फल्गुनीयुक्ता फाल्गुनी. सायत्रास्तिसफाल्गुनः, फाल्गुनी आहे ज्याचेठायीं तो. त. फाल्गुन महिना. अ. पु.

**फाल्गुनिक:** फल्गुनएवफाल्गुनिकः, फल्गुन जो तोच फाल्गुन. त. फाल्गुन महिना. अ. पु.

**फुल्ल:** फुल्लतीतिफुल्लः, पुष्पित होतो जो तो. कृ. ञिफलाधा. विशरणअ. प्रफुल्लित. अ. पु.

**फेन:** स्फायतेइतिफेनः, वृद्धिंगत होतो जो तो. कृ. स्फायीधा. वृद्धिअ. जलविकार स्न. फेंण. २ समुद्रफेण. अ. पु.

**फेनिलः** फेनोस्यास्तीतिफेनिलः, फेन आहे जास तो. न. दिग्रक्ष. २ बोराचें फळ. अ. पु. ३ फेनयुक्त. वि. अ. पु. न. आ. स्त्री

**फेरवः** फेइत्येवंरवीस्यफेरवः, फे याप्रकारचा आहे शब्द जास तो. त. कोल्हा. अ. पु.

**फेरुः** फेइत्यव्यक्तंरौतीतिफेरुः, फे याप्रकारचा शब्द करणारा जो तो. कृ. रुधा. शब्दअ. कोल्हा. उ. पु.

**फेला** फेल्यतेइतिफेला. गमन करिजे त्ये जी ती. कृ. फेलृधा. गति अ. खाऊन टाकलेलें. आ. स्त्रीलिंगी.

**फेली** विग्रहादि पूर्वींच्याशब्दाप्रमाणें. ई. स्त्री.

**बकः** बंकतेइतिबकः, ऊर्ध्व गमन करणारा जो तो. क्र. बकिधा. कौटिल्यगतिअ. रुई मंदार. २ बगळा. अ. पु.

**बकुलः** बंकतेइतिबकुलः, ऊर्ध्व गमन करितो जो तो. क्र. बकिधा. गतिअ. बकुल. अ. पु.

**बडिशं** बडिनोमत्स्यान्स्यतीतिबडिशं, मत्स्यातें नाश करितें जें तें. क्र. षोधा. अंतकर्मअ. मत्स्यवेधन. अ. न. आ. ई. स्त्री.

**बत** वन्यतेस्मइतिबत. खेदाद्यर्थीतें बोधलिजे तें जें तें. क्र. वनुधा. याचनअ. खेद. २ करुणारस. ३ संतोष. ४ आश्चर्य. ५ आमंत्रण ह्या अर्थी. अव्य.

**बदरं बदरा** बदतीतिबदरं, स्थिर राहतें जें तें. क्र. बदधा. स्थैर्यअ. बोरीचें फळ. अ. न.

**बदरिः** विग्रहादिसर्वबदरशब्दा प्रमाणें. इ. स्त्री.

**बंदी** बंदतेअवश्यंबंदी, अवश्य स्तुति करणारा जो तो. क्र. वदिधा. स्तुतिअ. स्तुतिपाठक. इन्. पु. ई. स्त्री.

**बंधकी** बध्नातीतिबंधकी, मनाला विकार करणारी जी ती. क्र. बधधा. बंधनअ. व्यभिचारिणीबायको. ई. स्त्री.

**बद्धः** बध्यतेस्मबद्धः, रज्ज्वादिकें करून बंधन करिजेला जो तो. क्र. बंधधा. बंधनअ. बांधलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**बधिरः** बध्नातिकर्णमितिबधिरः, कर्णातें बंधन करणारा जो तो. क्र. बधधा. बंधनअ. बहिरा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**बंधनं** बध्यतेनेनबंधनं, बंधन होइजे तें जेणें करून तें. क्र. बंधधा. बंधनअ. बांधणें. २ बांधण्याचें साधन. अ. न.

**बंधुः** विग्रहादिबांधवशब्दाप्रमाणें. सगोत्र ह्म. एकवंशी भाऊबंद. उ. पु.

**बंधुजीवकः** बंधुरिवजीवंजलमस्यबंधुजीवकः, बंधुसारखेंप्रियआहे जीवन जास तो. स. एक फुलझाड ज्यास दुपारी असें ह्मणतात तें. अ. पु.

**बंधुता** बंधूनांसमूहोबंधुता, बं

धूंचा जो समुदाय तो. न. बंधूचा समूह. २ बंधुपणा. आ. स्त्री.

**बंधुरः** बध्नातीतिबंधुरः, चित्ता तें बंधन करितो जो तो. कृ. बंधधा. बंधनअ. जो स्वभावतः उन्नतअसोन उपाधिवशें करून किंचित् नम्र होतो तो. वि. अ. पु. न. आ स्त्रीलिं.

**बंधुलः** बंधुंलातीति बंधुलः, अर्थ बांधाकिनेय शब्दाप्रमाणें. कृ. लाधा. आदानअ. व्यभिचारिणीचा पुत्र. अ. पु.

**बंधूकः** बध्नातिचित्तंबंधूकः, चित्तातें बंधन करितो जो तो. कृ. बंधधा. बंधनअ. दुपारीचें झाड. अ. पु.

**बंधूकपुष्पः** बंधूकस्यपुष्पाणीवपुष्पाण्यस्यबंधूकपुष्पः, बंधूकाच्यापुष्पाचे परी आहेत पुष्पें जाचीं तो. स. असणाचें झाड अ. पु.

**बंधूरं** विग्रहादिसर्व बंधुरशब्दाप्रमाणें.

**बंध्या** बध्नातीतिबंध्या, गत्यभावानेंबंधन करित्ये जी ती. कृ. बंधधा. बंधनअ. फलहीन ह्म. वांझ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**बभ्रुः** बिभर्तीतिबभ्रुः, धारणपोषण करितो जो तो. कृ. डुभृञ्धा. धारणपोषण अ. मोठा मुंगस. २ विष्णु. ३ अग्नि. ४ महादेव. ५ ऋषि. उ. पु. ६ पिंगटवर्ण. वि. उ. पु. स्त्री. न.

**बलीवर्दः** ईश्वरअतोददातीतिईवर्दः बलिआसावीवर्दश्चबलवान् असा जो ईवर्द ह्म. लक्ष्मीतें व बरातें देणारा जो तो. स. बैल. अ. पु.

**बर्बरः** बर्बतीतिबर्बरः, ऊर्ध्वगमन करितो जो तो. कृ. बर्बधा. गतिअ. भारंग वनोषधि. अ. पु.

**बर्बरा** वृणुतीतिबर्बरा, आवरण करित्ये जी ती. कृ. वृञ्धा. वरणअ. तिळवण ह्म. कानफोड. आ. स्त्री.

**बर्बरी** विग्रहादिसर्व बर्बराशब्दाप्रमाणें. ई. स्त्री.

**बर्ह** बर्हतीतिबर्हं, वृद्धीप्रत पावतें जें तें. कृ. बृहधा. वृद्धिअ. मोराचें पीस. २ पर्णपान. ३ परीवार ४ गाठवन ह्म. भरोसा. अ. न.

**बर्हपुष्पं** बर्हंप्रशस्तंअस्यब-र्हं पुष्पतीतिपुष्पं बर्हंच तत्पुष्पं च बर्हपुष्पं, षर्ह द्म. तेत्र प्रशस्त आहे जास तें बर्ह बर्ह असें जें पुष्प तें. स. गंठीवन द्म. भ रोरा. अ. न.

**बर्हिः** बृंहतिघृतादिनेतिबर्हिः, घृतादिकानें वृद्धिंगत होतो जो तो. कृ. बृहिधा. वृद्धिअ. अग्नि इ. पु.

**बर्हिण:** बर्हमस्त्यस्यबर्हिणः, अर्थादिक बर्हीशब्दाप्रमाणें. त. मोर. अ. पु.

**बर्ही** बर्हमस्त्यस्यबर्ही. पिच्छ आहे जास तो. त. मोर. इन्. पु.

**बर्हिपुष्पं** विग्रहादिसर्वबर्हपुष्पशब्दाप्रमाणें.

**बर्हिःपुष्पं** विग्रहादिसर्वबर्हपुष्पशब्दाप्रमाणें.

**बर्हिर्मुख:** बर्हिरग्निर्मुखंयस्य सबर्हिर्मुखः, अग्निआहेमुख जानें तो. स. देव. अ. पु.

**बर्हिषं** बर्हिधिकुशोतिषतीतिब र्हिषं, कुशाग्रेगर्यी राहतें जें तें. कृ. षाधा. गतानवृत्तिअ. वाळा. अ. न.

**बल:** बलमस्यास्तीतिबलः, बल आहे जास तो. त. बलराम. २कावळा. अ. पु. ३ सैन्य. ४ पराक्रम. ५ सामर्थ्य. ६ स्थौल्य. अ. न.

**बलदेव:** बलेनदीव्यतीतिबलदेवः, बलानें खुसती किंवा क्रीडा अथवा प्रकाशमान होतो जो तो. कृ. दिवुधा. क्रीडादिकअ. बलराम. अ. पु.

**बलभद्र:** बलंभद्रंश्रेष्ठंयस्यस बलभद्रः, सर्वांपेक्षां ज्याचें बल अधिक तो. स. बलराम. अ. पु.

**बलभद्रिका** बलेनभद्राबलभद्रा सैव बलभद्रिका, बलें करून श्रेष्ठ जी ती बलभद्रा तीच बलभद्रिका, त्रायमाण औषधि. आ. स्त्रीलिंगी.

**बलभी** वलतीतिवलभी, सम्यक् आवरण करिते जी ती. कृ. वलधा. संवरणअ. घराच्या शाकारास आधारभूत जे वांसे कडणी इत्यादि. ई. स्त्री.

**बलवान्** बलमस्त्यस्यबलवान्, बल आहे जास तो. त. बलिष्ठ.

वि. न. पु. ई. स्त्री. न्. न.

**बला** बलमस्यस्याइतिबला, बल आहे जीस ती. त. चिकणा. आ स्त्रीलिंगीं.

**बलाका** बलतेइतिबलाका, उत्तम गमन करणारी जी ती. क्रु. बलधा. संवरणअ. बगळा. आ. स्त्री.

**बलात्कार:** बलात्करणंबलात्कारः, हट्टानें जी क्रिया ती. क्रु. डुकृञ्धा. करणअ. बलात्कार. अ. पु.

**बलाराति:** बलस्य अरातिर्बलारातिः, बलनामक दैत्याचा जो शत्रु ती. स. इंद्र. इ. पु.

**बलाहक:** वारिवहतीतिबलाहकः, उदकानें वाहणारा जो तो. क्रु. वहधा. प्रापणअ. मेघ. २ विष्णुचा घोडा. अ. पु.

**बलि:** बलनंबलिः, दानजें तो. क्रु. बलधा धान्यावरोधअ. राजास द्यावयाचा दस्त. २ पूजासाहित्य. इ. पु. ३ बळी. इ. स्त्री.

**बलिध्वंसी** बलिंध्वंसितुंशीलमस्यबलिध्वंसी, बलीप्रत नाश करण्याचा आहे स्वभाव ज्याचा तो. क्रु. ध्वंसुधा. अवस्रंसनअ. विष्णु. इन्. पु.

**बलिन:** बलिरस्यास्तीतिबलिनः, चर्म संकोच आहे ज्यास तो. न. म्हातारपणानें ज्याचे अंगास वळ्या पडतात तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**बलिपुष्ट:** बलिनापुष्टः बलिपुष्टः, बली करून जो पुष्ट तो. स. कावळा. अ. पु.

**बलिभ:** विग्रहादि सर्व बलिन शब्दाप्रमाणें.

**बलिभुक्** बलिंभुंक्तेइतिबलिभुक्, बलि भक्षण करणारा जो तो. क्रु. भुजधा. अभ्यवहारअ. कावळा. ज्. पु.

**बलिमुख:** विग्रहादि सर्व बलीमुख शब्दाप्रमाणें. वानर. अ. पु.

**बलिसद्म** बलेः सद्मबलिसद्म, बलीचें जें वसति स्थान तें. स. पाताळ. न्. न.

**बलीकं** वलति भित्यादीतिबलीकं, भित्यादिकानें आवरण करितें जें तें. क्रु. वलधा. संवरणअ. वळचण ह्म. पडवी. अ. न.

**बलीमुख:** बलीयुक्तंमुखम स्यबलीमुख:, बलीयुक्त आहे मुख ज्याचें तो. स. वानर. अ. पु.

**बलीवर्द:** वरणंवर: ईश्चवर श्चईवरौ ईवरौददातीतिईवर्द:, बलीचासौईवर्दश्चबलीवर्द:, लक्ष्मीतें व वरातें देणारा जो तो ईवर्द बलवान् असा जो ईवर्द तो. स. बैल अ. पु.

**बल्लव:** बल्लोस्यास्तीतिबल्लव:, प्रीति आहे जास तो. त. आचा री. ह्म. सैंपाकी. २गवळी. अ. पु.

**बष्कय:** बष्कतेइतिबष्कय:, त्व रेंकरून गमन करितो जो तो. कृ. बष्कधा. गतिअ. एक वर्षाचा गा ईचा वत्स. अ. पु.

**बष्कयणी** बष्कयेणनीयतेइति बष्कयणी, एक हायन वत्सातें नेइजेत्ये जी ती. कृ. णीञ्धा. प्राप णअ. फार वर्षानीं वियालेलीगा य. ई. स्त्री.

**बष्कयिणी** बष्कयोस्तीतिबष्क यिणी, तरुण आहे वत्सजीचा ती. न. फारादिवसांनीं वियालेली गाय. ई. स्त्री.

**बस्तक:** बस्तइवप्रतिकृतिर्बस्त क:, मेषासारिखी जी प्रतिमा तें त. अज ह्म. बोकड. अ. न.

**बर्हि:** वहतीतिबर्हि:बाह्यार्थधारणक रितें जें तें. कृ. बृहधा. प्रापणअ. बाह्यार्थी अव्य.

**बहिर्द्वारं** बहिश्चतद्वारंचबहि र्द्वारं, बाहिर असें जें द्वार तें. स. बाहिरचें द्वार. अ. न.

**बहु** बंहतेइतिबहु, वृद्धी पावतें जें तें. कृ. बंहधा. वृद्धिअ. पुष्क ळ. उ. पु. न. ई. स्त्री.

**बहुकर:** बहुकरोतीतिबहुकर:, भूमि संमार्जन करितो जो तो. कृ. डुकृञ्धा. करणअ. सडा संमा र्जन करणारा. वि. अ. पु. न. आ. ई. स्त्री.

**बहुगर्ह्यवाक्** बहुगर्ह्यावाक् यस्यबहुगर्ह्यवाक्, बहुत निंद्य आहे वाणी ज्याची तो. स. बहुत अवाच्य भाषण करणारा. त्रि. पु. ल्लिंगी.

**बहुपात्** बहव पादा: यस्यब हुपात्, बहुत आहेत पाय ज्याचे तो. स. वडाचें झाड. द. पु.

**बहुप्रदः** बहुप्रददातीति बहुप्रदः, बहूत देतो जो तो. कृ. डुदाञ् धा. दानअ. दानशूर. अ. पु.

**बहुमूल्यं** बहुमूल्यमस्य बहुमूल्यं, फार आहे मोल्य ज्याचें तो. न. मोठे किंमतीचें. वि. अ. पु. न. आ. स्त्रीलिंगी.

**बहुरूपः** नानारूपात गंधत्वात् बहूनि रूपाण्यस्य बहुरूपः, बहूत आहेत रूपें ज्याचीं तो. स. धूप. अ. पु.

**बहुलं** बहून्लातीति बहुलं, बहुतांतें ग्रहण करितें जें तें. कृ. ला धा. आदानअ. पुष्कळ. २ काळा. वि. अ. पु. न. आ. स्त्री. ३ अग्नि अ. पु.

**बहुला** बहूनिलातीति बहुला, बहुत गुणातें ग्रहण करित्ये जी ती. कृ. ला धा. आदानअ. इलायची. २ कृत्तिकानक्षत्र. ३ गाय. ४ नीळ. आ. स्त्री.

**बहुलीकृतं** अबहुलं बहुलमकारि बहुलीकृतं, थोडकें जें फार केलेलें तें. कृ. डुकृञ् धा. करणअ. चांगलें निवडकेलेलें धान्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**बहुवारकः** बहून्वारयतीति बहुवारकः, बहुतांतें स्वीकार करितो जो तो. कृ. वृञ् धा. वरणअ. भोकरीचें झाड. अ. पु.

**बहुविधः** बहवः विधाः अस्य बहुविधः, बहुत आहेत प्रकार ज्याचे तो. स. नानाप्रकारचा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**बहुसुता** बहवः सुताः यस्याः बहुसुता, फार आहेत पुत्र जीस ती. स. शतावरी. आ. स्त्री.

**बहुसूतिः** बह्वीः सूतिः यस्याः बहुसूतिः, फार आहे प्रसूति जीची ती. स. बहूत वेळ प्रसवलेली. इ. स्त्री.

**बाकुची** वातंसंकोचयतीति बाकुची, वायूतें संकोच करणारी जी ती. कृ. कुच धा. तारशब्द अ. बावची. ई. स्त्री.

**बाढं** बाध्यतेस्म बाढं, स्वीकारत्या अर्थी प्राप्त करिजेलें जें तें. कृ. वह धा. प्रापणअ. अतिशय. स्वीकार त्या अर्थी अव्यय.

**बाणः** बणनं बाणः बाणः शब्दो

स्यस्यबाणः, शब्द आहे जासतो. त बाण. २ बलीचा पुत्र बाणनामा तो. अ. पु.

**बाणा** वण्यतेइतिबाणा, बोलिजेत्ये जी ती. कृ. वणधा. शब्दअ. काळा कोरंटा. आ. स्त्री.

**बाधा** बाध्यतेइतिबाधा, पीडाजी ती. कृ. बाधृधा. विलोडनअ. म नःपीडा. आ. स्त्री.

**बांधकिनेयः** बंधक्याः अपत्यं बांधकिनेयः, व्यभिचारिणीचा जो पुत्र तो. त. व्यभिचारिणीचा पुत्र. अ. पुं.

**बांधवः** बध्नातीतिबंधुः सएवबांधवः, बंधन करणारा जो तो बंधु तोच बांधव. त. सगोत्र ह्म. एक वंशी भाऊबंद. अ. पु.

**बार्हतं** बृहत्याः इदं बार्हतं, बृहतीचें हें तें. त. रिंगणीचें फळ. अ. नपुंस.

**बालः** बलतीतिबालः, जीवन करणारा जो तो. कृ. बलधा. प्राणनअ. मूर्ख. २ बालक. वि. अ. पु न. आ. स्त्री. ३ वाळा. ४ शेपटी. अ. पुं. न.

**बालतनयः** बालाइवतनयाः पत्राण्यस्येतिबालतनयः, बालसदृश आहेत पत्रें ज्याचीं तो. स. खेराचें झाड. अ. पु.

**बालतृणं** बालंचतत्तृणंचबालतृणं, कोमल असें जें तृण तें. स. कोवळें तृण. अ. न.

**बालधिः** बालाः धीयंतेअत्रइति बालधिः, केश राहातात ज्याचे ठायीं तो. कृ. डुधाञ्धा. करणअ. केशयुक्त जो शेपटीचा अग्रभाग तो. इ. पु.

**बालपाश्या** बालपाशेसाधुर्बालपाश्या, केश समूहाचेठायीं जो साधु तो. त. भांगाचें भूषण. आ. स्त्रीलिं.

**बालमूषिका** क्षुद्रत्वाद्बालाच सौ मूषिकाच बालमूषिका, लहान अशीजी मूषिका ती. स. उंदराची एक लाहान जाती. आ. स्त्री.

**बालहस्तः** बालाः हस्तइवास्य बालहस्तः, केश जो तो हस्ताचेपरी ज्यास तो. स. केशयुक्त जो शेपटीचा अग्रभाग तो. अ. पु.

**बाला** बलतीतिबाला, जीवन

करविते जी ती. कृ. बलधा. प्रा णनअ. कुमारी. आ. स्त्री.

**बालिशः** बलिशस्यमत्स्यवेध नस्यायमपूज्यत्वात्बालिशः. मत्स्यवेधन संबंधीं जो तो. त. मूर्ख. २ कालक. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**बालेयः** बलयेहितोबालेयः, उपहारा कारणें जो हित तो. त. वनोषधी. भारंग. अ. पुं.

**बाल्यं** बालस्यभावः बाल्यं, बा ल्य अवस्था जी ती. स. बाल्याव स्था. अ. न.

**बाष्पं** बातिइतिबाष्पं, शैत्यनाश करितें किंवा नेत्राचेठायीं प्राप्त हो तें तें. कृ. बाधा. गत्यादिअ. उष्मा २ नेत्रोदक. अ. पु. न. आ. स्त्री.

**बाष्पिका बाष्पीका** बाष्प मिवप्रतिकृतिबाष्पिका, बाष्पा सारिखी जी प्रतिमा ती. त. हिं गुपत्राची पत्री. आ. स्त्री.

**बाहुः** बाधतेइतिबाहुः, लोडन करणारा जी ती. कृ. बाधृधा. वि लोडनअ. भुज. उ. पुं.

**बाहुजः** बाहुभ्यांजातोबाहुजः, बाहूं पासून जो झाला तो. कृ. ज नीधा. प्रादुर्भावअ. क्षत्रिय. अ. पु.

**बाहुदा** बाहुजलंददातीतिबा हुदा, उदकातें देणारी जी ती. कृ. डुदाञ्धा. दानअ. नदीवि शेष. अ. पु.

**बाहुमूलं** बाह्वोर्मूलं बाहुमूलं, बाहूचें जें मूल तें. स. कारव. अ. नपुं.

**बाहुयुद्धं** बाहुभ्यांयुद्धं बाहुयुद्धं, बाहू करून जें युद्ध तें. स. बाहूंनीं लढणें. अ. न.

**बाहुलः** बहुलाः कृत्तिकाअस्मि न्स बहुलः बहुलएवबाहुलः, बहुत कृत्तिका आहेत ज्याचेठायीं तो बहुल तोच बाहुल. त. कार्ति कस्वामी. अ. पु.

**बाहुलेयः** बहुलानामपत्यंबाहु लेयः, बहुला म्हणजे कृत्तिकास्त्रि यांचें जें अपत्य तो. त. कार्तिकस्वा मी. अ. पु.

**बाल्हिकः** बाल्हीकं बाल्हिकेभ वः बाल्हिकः, बाल्हिकदेशाचेठायीं जो उ त्पन्न तो. स. कुंकुम. २ अश्वविशेष. ३ हिंग. अ. पुं. न.

**बिडं** बिडतीतिबिडं, जाड्यनाश करणारें जें तें. क्रु. बिडधा. भेदनअ. बिडलोण. अ. न.

**बिडाल:** बिटतीतिबिडाल:, आक्रोश करितो जो तो. क्रु. बिट्धा. आक्रोश अ. माजर. अ. पु.

**बिडौजा:** बिडमोजोयस्याबिडौजा:, बिड ह्म. शत्रु भेदक आहे ओज ज्याचें तो. स. इंद्र. स. पु.

**बिंदु:** बिंदतीतिबिंदु:, अवयवतां प्राप्त जो तो. क्रु. बिदिधा. अवयवअ. थेंब. उ. पु.

**बिंबिका** बिंबिंकायतीतिबिंबिका, बोबडें बोलविणारीजीती. क्रु. कैधा. शब्दअ. तोंडलीची वेल. आ. स्त्री.

**बिलं** बिल्यतेइतिबिलं, भेदन करिजेलें जें तें. क्रु. बिलधा. भेदनअ. छिद्र. अ. न.

**बिलेशय:** बिलेशेतेसोबिलेशय:, बिळाचेठायीं शयनकर्ती जो तो. क्रु. शीङ्धा. स्वप्नअ. सर्प. अ. पु.

**बिल्व:** बिलतीतिबिल्व:, नाश करितो जो तो. क्रु. बिलधा. भेदनअ. बिल्ववृक्ष. अ. पु.

**बिसं** बिसतीतिबिसं, कमलातें प्रेरण करितें जें तें. क्रु. बिसधा. प्रेरणअ. भिसें. अ. पु. न.

**बिसकंठिका** बिसवत्कंठोयस्या:साबिसकंठिका, बिसासारिखा आहे लांब कंठ जीचा ती. स. बगळा ह्म. बाळे टोक. आ. स्त्री.

**बिसप्रसूनं** बिसस्यप्रसूनंपुष्पं बिसप्रसूनं, बिस ह्म. कमलनाल तत्संबंधीं जें प्रसून ह्म. पुष्पतें. स. कमळ. अ. न.

**बिसिनी** बिसंअस्तिअस्या:साबिसिनी, नाल आहे जीस ती. त. कमलिनी. ई. स्त्री.

**बिस्त:** बिस्यतेइतिबिस्त:, तुलनार्थ टाकिजेतो जो तो. क्रु. बिसधा. क्षेपणअ. सोन्याचा आठ गुंजाचा तोळा. अ. पु.

**बीजं** बीज्यतेनेनेतिबीजं, उत्पत्ति होइजेत्ये जेणें करून तें. क्रु. बीजधा. प्रादुर्भावादिअ. रेत. २ बीं. ३ कारण. अ. न.

**बीजकोश:** बीजस्यकोशोवी

जकोशः, बीजाचा जो कोश
ह्म. संग्रह तो. स. बियांचा कां
दा. अ. पु.
**बीजपूरः** बीजंपूरयतीतिबीज
पूरः, बीजातें पूरण करितो -
जो तो. क्र. पूरीधा. आप्यायन
अ. माहळुंग. अ. पु.
**बीजाकृतं** बीजेनसहकृतंक्र
ष्टंबीजाकृतं, बीजासहवर्त
मान जें कृष्ट ह्म. नागरलेंते.प्रथ
म बीं पेरून नंतर नागरलेलें
शेत. वि. अ. पु. न. आ. स्त्री.
**बीज्यः** बीजेभवोबीज्यः, बी
जाच्येठायीं झाला जो तो. त.
कुलीन. वि. अ. पुं. न. आ. स्त्री.
**बीभत्सः** बीभत्स्यतेनेनबी
भत्सः, अतिशयें करून भये
च्छा पाविजेतात जेणें तो. क्र.
त्रभीसन्नंतधा. भयअ. आठर
सांतील एकरस. अ. पुं.
**बुकः** बातीतिबुकः, ऊर्ध्व गम
न करितो जो तो. क्र. वाधा. ग
तिअ. रुई मंदार. अ. पुं.
**बुक्का** बुक्यतेइतिबुक्का, कम
ळाकार असें बोलिजेलें जी ती
क्र. बुक्कधा. भषणअ. हृदयां
तील मांसभाग. ह्म. काळिज.
आ. स्त्री.
**बुद्धः** प्रशस्ताबुद्धिरस्यबुद्धः,
चांगली आहे बुद्धि जाची तो.
त. अवगत ह्म. जाणलेला. वि.
अ. पुं. न. आ. स्त्री.
**बुध्नः** बुध्यतेइतिबुध्नः, बांधि
जेतो जो तो. क्र. बंधधा. बंधन
अ.
**बुद्धिः** बुध्यतेनयाबुद्धिः, आ
णिजेतें जीणें करून ती. क्र. बु
धिर्धा. बोधनअ. सर्वव्यवहा
रांस कारण जें ज्ञान ती. इ. स्त्री.
**बुद्बुदः** बुदंबुदतीतिबुद्बुदः, बु
द ह्म. अव्यक्त ध्वनीतें करितो
जो तो. क्र. उबुंदिर्धा. निशाम
नअ. पाण्याचा बुडबुडा. अ. पु.
**बुधः** बुध्यतेइतिबुधः, जाणणा
रा जो तो. क्र. बुधधा. अवगमन
अ. पंडित. २ नवग्रहांतील बु
ध तो. अ. पुं.
**बुधितं** विग्रहादिसर्वबुद्धशब्द.
**बुभुक्षा** भोक्तुमिच्छाबुभुक्षा,
भोजन करावया कारणें जी इच्छा

ती. क्रु. भुजधा. अभ्यवहारअ.
क्षुधा. आ. स्त्री.

**बुभुक्षितः** बुभुक्षासंजातास्य बुभुक्षितः, भोजनेच्छा झाली आहे ज्यास तो. त. भुकेलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**बुषः** विग्रहादि बुसशब्दाप्रमाणें भूस. अ. न.

**बुसं** बुस्यतेइतिबुसं, टाकिजेतें जें तें. कृ. बुसधा. उत्सर्ग अ. भूस. अ. न.

**बृहतिका** बृहत्येवबृहतिका, बृहती ह्म. वसनांतर जें तीच बृहतिका, त. आंगवस्त्र. आ. स्त्री.

**बृहती** बर्हतीतिबृहती, वृद्धी पावत्ये जी ती. कृ. बृहधा. वृद्धिअ. रिंगणीचें झाड. २ लहान डोरली वांगी. ३ छंदोविशेष. ई. स्त्री.

**बृहत्** बर्हतीतिबृहत्, वृद्धी पावतें जें तें. कृ. बृहधा. वृद्धिअ. मोठा. वि. त्. पु. न. ई. स्त्री.

**बृहत्कुक्षिः** बृहतीकुक्षिर्यस्यबृहत्कुक्षिः, मोठें आहे पोट ज्याचें तो. स. दोंदिल. इ. पु.

**बृहद्भानुः** बृहंतःभानवोयस्य सः बृहद्भानुः, वृद्धिगामी आहेत भानु ह्म. किरण ज्याचे तो. स. अग्नि. उ. पु.

**बृहस्पतिः** बृहतांपतिर्बृहस्पतिः, देवांचा जो पती ह्म. गुरु तो. स. देवांचा गुरु. इ. पु.

**बृंहितं** बृंहणंबृंहितं, हत्तीचा जो शब्द तें. कृ. बृंहिधा. शब्दअ. हत्तीचा शब्द. अ. न.

**बोधकरः** बोधंकरोतीतिबोधकरः, जागृती करणारा जो तो. कृ. डुकृञ्धा. करणअ. राजाचा स्तुतिपाठक. अ. पु.

**बोधिद्रुमः** बुध्यतइतिबोधिः स चासौद्रुमश्चबोधिद्रुमः, जाणिजे तो जो तो बोधि बोधि असा जो द्रुम ह्म. वृक्ष तो. स. पिंपळाचें झाड. अ. पु.

**बोलः** बोलयतीतिबोलः, मज्जन ह्म. अंतः प्रविष्ट ह्म. शरीरासंदुःखनिवर्तक जो तो. कृ. बुलधा. मज्जनअ. रक्ताबोळ. अ. पु.

**ब्रध्नः** तिमिरंबध्नातीतिब्रध्नः, अंधकारातें नाश करितो जो तो. कृ. बधधा. बंधनअ. सूर्य. अ. पु.

**ब्रह्मचारी** ब्रह्मवेदाध्ययनव्रतं चरतीति ब्रह्मचारी, वेदाध्ययनार्थ ब्रह्मचर्य व्रताचरण करितो जो तो. क्रु. चरधा. गतिअ. ब्रह्मचर्य व्रत धारण केलेला. इन्. पु.

**ब्रह्मण्यः** ब्रह्माणमर्हतीति ब्रह्मण्यः, ब्रह्मदेवाला जो पूज्य तो. त. पारसा पिंपळ. अ. पु.

**ब्रह्मत्वं** ब्रह्मणोभावो ब्रह्मत्वं, ब्रह्माची जी सत्ता तें त. ब्रह्मभाव. अ. न.

**ब्रह्मदर्भा** ब्रह्मणा दर्भ्यतेइति ब्रह्मदर्भा, ब्रह्मदेवानें रोगनिरस्यर्थ आज्ञापिजेली जी ती. क्रु. दर्भधा. आज्ञापनअ. ओवा. आ. स्त्री.

**ब्रह्मदारु** ब्रह्मणिदारु ब्रह्मदारु, ब्रह्मा विषयीं जें दारुरूप तें. स. पारसा पिंपळ. उ. न.

**ब्रह्मा** बृंहयतिवर्धयतिप्रजाइति ब्रह्मा, प्रजा वृद्धि करितो जो तो. क्रु. वृहिधा. वृद्धिअ. ब्रह्मदेव. २ ब्राह्मण. नू. पु. ३ वेद. ४ चैतन्य. ५ तप. नू. न.

**ब्रह्मपुत्रः** ब्रह्मणः पुत्रः ब्रह्मपुत्रः, ब्रह्मदेवाचा जो पुत्र तो. स. विष विशेष. अ. न.

**ब्रह्मबंधुः** ब्रह्मब्राह्मणजातिर्बंधुरस्य ब्रह्मबंधुः, ब्राह्मण जाती आहे बंधू जाचा तो. स. ब्राह्मण निंदेचा प्रयोग. २ ब्राह्मणाची निंदा. उ. पु.

**ब्रह्मभूयं** ब्रह्मणोभावो ब्रह्मभूयं, ब्रह्माचा जो भाव तें. कृ. भूधा. सत्ताअ. ब्रह्मत्व. अ. न.

**ब्रह्मयज्ञः** ब्रह्मणोयज्ञः ब्रह्मयज्ञः, वेदांचें जें पूजन तो. स. पंचयज्ञांतील एक भेद. अ. पु.

**ब्रह्मवर्चसं** ब्रह्मणोवेदस्य तपसोवावर्चो ब्रह्मवर्चसं, वेदानें किंवा तपानें जें तेज तें. त. सदाचार पाकून वेदाभ्यास करणें. २ तपस्व्याध्यायाचें तेज. अ. न.

**ब्रह्मबिंदवः** ब्रह्मणः बिंदवो ब्रह्मबिंदवः, वेद पाठ काली मुखापासून निघतात जे ते. स. वेद पढत असतां तोंडांतून जलकण निघतात ते प्रत्येक. उ. पु.

**ब्रह्मसायुज्यं** योजनंयुक् युजा सहसयुक् सयुजो भावः सायुज्यं,

ब्रह्मणः सायुज्यंब्रह्मसायुज्यं, ब्रह्मानें जें सायुज्य ह्म. तत्स्वरूपता तेंस. ब्रह्मत्व. अ. न.

**ब्रह्मसूः** ब्रह्मतपः ब्रह्माणंवासुवतिचालयतीति ब्रह्मसूः, तपातें अथवा ब्रह्मदेवातें ही चालन करितोजो तो. क. सूधा. प्रेरणअ. अनिरुद्ध ह्म. मदनाचापुत्र. ऊ. पु.

**ब्रह्मांजलिः** ब्रह्मणोंजलिःब्रह्मांजलिः, वेदपठणकाळींचा जो अंजली तो. स. वेदाभ्यास करते वेळीं आरंभीं व शेवटीं प्रणवोच्चार करून जो नमस्कार तो. इ. पु.

**ब्रह्मासनं** ब्रह्मणः आसनंब्रह्मासनं; ब्रह्म ह्म. अध्ययनाचा उपाय तत्संबंधीं स्वस्तिकादि जें आसन तें. स. ध्यान व योग यां विषयीं जें आसन तें. अ. न.

**ब्राह्मः** ब्रह्मणः इदंब्राह्मं, ब्रह्मदेवाचें जें हें तें. न. आंगठ्याचें मूळ, ब्रह्मतीर्थ. अ. न.

**ब्राह्मणः** ब्रह्मवेदमधीतेब्राह्मणः, वेदाध्ययन करितो जो तो. क्र. इङ्धा. अध्ययनअ. चार वर्णांतील पहिला वर्ण. अ. पु.

**ब्राह्मण्यं** ब्राह्मणानांसमूहोब्राह्मण्यं, ब्राह्मणांचा जो समुदाय तें. त. ब्राह्मणाचा समुदाय. अ. नपुं.

**ब्राह्मणयष्टिका** ब्राह्मणस्ययष्टिरिवतादृशप्रकांडत्वात् ब्राह्मणयष्टिका, ब्राह्मणाच्या यष्टिसदृश आहे प्रकांड जीचें ती. त. भारंग. आ. स्त्री.

**ब्राह्मणी** ब्रह्मणःइयंब्राह्मणी, अर्थादि पूर्वीच्या शब्दाप्रमाणें. भारंग. ई. स्त्री.

**ब्राह्मी** ब्रह्मणइयंब्राह्मी, ब्रह्मदेवासंबंधीं जी ती. त. सरस्वती. २ सात मातृदेवतेंतील पाहिली देवता. ३ सोमलता. ई. स्त्री.

**भं** भातीतिभं, दीप्ति करितें जें तें. कृ. भाधा. दीप्तिअ. नक्षत्र. अ. न.

**भक्तं** भज्यतेस्मभक्तं, सेवन करि जेतें जें तें. कृ. भजधा. सेवाअ. अन्न. अ. न.

**भक्षक:** भक्षयतीतिभक्षक:, अन्नादि भक्षण करितो जो तो. कृ. भक्षधा. अदनअ. भक्षणकरणारा. २ खादाड. अ. पु.

**भक्ष्यकार: भक्ष्यकार:** भक्षं करोतीतिभक्षकार:, भक्षातें करणारा जो तो. कृ. भक्ष्य पदार्थ करणाराजोतोवि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भक्ष्यंकार:** विग्रहादिसर्वपूर्वीच्या शब्दाप्रमाणें.

**भग:** भज्यतेइतिभग:, सेवा करिजेतो जो तो. कृ. भजधा. सेवनअ. सूर्य. अ. पु. २ योनि. ३ संपत्तीची शोभा. ४ इच्छा. ५ माहात्म्य. ६ प्रयत्न. ७ पराक्रम. ८ कीर्ति. अ. न.

**भगंदर:** भगंदारयतीतिभगंदर:, भगातें विदारण करितोजो तो. कृ. दृधा. विदारणअ. रोगविशेष. अ. पु.

**भगवान्** भगंभाग्यमस्तियस्यभगवान्, भाग्यआहे जास तो. त. ईश्वर. २ नास्तिक. त्. पुल्लिं.

**भगिनी** भगमिच्छास्त्यस्या:भगिनी, इच्छा आहे जीस ती. त: बहीण. ई. स्त्री.

**भंग:** भंजनंभंग:, आमर्दन जें तो. कृ. भंजधा. आमर्दअ. नाश. २ पाण्याची लाट. अ. पु.

**भंगा** भज्यतेअनयाभंगा, पीडा करिजेत्ये जीणेंकरून ती. कृ. भंजधाआमर्दनअ. भांग. २ तागाचें बी. आ. स्त्री.

**भंगि:** भगस्यकरणंभगि:, भंगाचें जें करण ती. कृ. भगप्रकृतिकधा. करणअ. कौटिल्यभेद. २ विच्छित्तिरूपहाव. इ. स्त्री.

**भंग्यं भंग्या** भवनंक्षेत्रंभंग्यं, मातुलानी होण्याचें जें क्षेत्र तें. त. भागउत्पन्न होण्याचें शेत. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भजमान:** भजतेफलमनुबध्नातिभजमान:, फलानुबंध करणा

शी जो तो. क्रु. भजधा. सेवाअ. नीतीनें मिळावयाचा विभागादिक वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भटः** भरतीतिभटः, सैन्यातें र क्षण करणाराजो तो. क्रु. भटधा. भृतिअ. योद्धा. अ. पु.

**भटित्रं** भटतीतिभटित्रं, स्वभ क्षणानें पोषण करतें जें मांस तें. क्रु. भटधा. भृतिअ. लोह शलाके नें संस्कृत जें मांसादिकें. अ. न.

**भट्टारकः** भटान् शत्रून् अरती तिभट्टारकः, शत्रुनाशनार्थआलो जो तो. क्रु. ऋधा. गतिअ. राजा अ. पु.

**भाट्टिनी** भटतिउद्धतंभाषतेइति भाट्टिनी, उद्धट भाषण करणारी जी ती. क्रु. भटधा. परिभाषणअ. पट्टाभिषिक्त स्त्रियां खेरीज ज्या अन्यराज स्त्रिया त्या प्रत्येक. ई. स्त्री.

**भंटाकी** भट्यते भण्यतेवा भंटा की, औषधार्थ बोलिजेली जीती क्रु. भटधा. परिभाषणअ. डोर ली वांगी. ई. स्त्री.

**भंडिलः भंडिरः** भंडअनेइ तिभंडिलः, कल्याण करतीजो तो. क्रु. भडिधा. कल्याणअ. शि रस ह्रस्व. अ. पु.

**भांडुरी** विग्रहादिसर्वपूर्वींच्याश ब्दाप्रमाणें. ई. स्त्री.

**भंडी** विग्रहादिपूर्वींच्याशब्दाप्रमा णें. शिरसह्रस्व. ई. स्त्री.

**भांडीरी** विग्रहादिसर्वपूर्वींच्याश ब्दाप्रमाणें.

**भंडीलः** विग्रहादिपूर्वींच्याशब्दा प्रमाणें. शिरसह्रस्व. अ. पु.

**भद्रं** भंदतइतिभद्रं, कल्याणकिं वा सुख पावतो जो तो. क्रु. भदि धा. कल्याण आ. सुखअ. कल्या ण. अ. न. २ नागर मोथा. ३ बैल. अ. पु.

**भद्रकुंभः** भद्रश्चासोकुंभश्च भ द्रकुंभः, जलपूर्णत्वात् कल्याण कारक जो घर तो. भरलेली घाग र तांब्याइत्यादि. अ. पु.

**भद्रदारु** भद्रंदारुयस्य भद्र दारुः, कल्याण कारक आहे का ष्ठ ज्याचें तो. स. देवदारूचें झाड. उ. पु. न.

**भद्रपर्णी** भद्राणिपर्णान्यस्य भ द्रपर्णी, कल्याण कारक आहेत

पर्णें जीचीं ती. स. शिवणीचें झा ड. ई. स्त्री.

**भद्रमुस्तकः** भंदतेइतिभद्रं भद्रंकरोतीतिभद्रः सचासौमुस्त कश्चभद्रमुस्तकः, कल्याण कार क असा जो मुस्तक तो. स. नाग रमोथा. अ. पु. न.

**भद्रयवं** भद्रंचतत्यवंचभद्रय वं, कल्याण कारक असें जें यव तें. स. कुड्याची शेंग. अ. पु. न.

**भद्रबला** भद्रंबलमस्याः भद्र बला, कल्याण कारक आहे ब ल जीचें ती. स. चांदवेल. आ. स्त्री.

**भद्रश्रीः** भद्राश्रीर्यस्यभद्रश्रीः, कल्याण कारक आहे शोभा ज्याची तो. स. मैलागिरिचंदनई का. पु.

**भद्रासनं** भद्रंचतदासनंचभ द्रासनं, कल्याण कारक असें जें आसन तें. स. रत्नजडित जें राजादिकाचें आसन तें. अ. न.

**भयं**. विग्रहादिभीतिशब्दाप्रमा णें. अ. न.

**भयंकरं** भयंकरोतीतिभयंक रं, भयातें करणार जें तें. क्र. डुकृञ्‌धा. करणअ. भीतिका रक. २ भयानकनामारस. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भयद्रुतः** भयाद्द्रुतोभयद्रुतः, भयें करून पलायित जो तो. स. भयानें पळणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भयानकः** भयंआनितिभया नः भयानएवभयानकः, भया तें उत्पन्न करितो जो तो भयान तोच भयानक. त. रसविशेष. अ. पु. २ भयंकर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भरः** भरणंभरः, भरण ह्म. धा रण जें तो. क्र. डुभृञ्‌धा. धार णअ. अतिशय. २ भार. अ. पु.

**भरणं** विग्रहादिभृत्याशब्दाप्र माणें. वेतन. २ पोषण. अ. न.

**भरण्यं** **भरण्या** भरणेसा धुभरण्यं, पोषणाविषयीं जें दक्ष तें. त. वेतन. अ. न. २ आ. स्त्री.

**भरण्यभुक्** भरण्यंवेतनंभुं केभरण्यभुक्, वेतन घेऊन क र्म करितो जो तो. क्र. भुजधा. पा लनादिअ. वेतन घेऊन चाकरी

करणारा. ऋ. पु. स्त्री. न.

**भरत:** भरतस्यमुनेः शिष्योभरतः, भरत ऋषीचा जो शिष्य तो. भरत ऋषीचा शिष्य. अ. पु.

**भरद्वाज:** भरंतः वाजाः पक्षाय स्यसभरद्वाजः, धारण करणारे आहेत पक्ष जाचे तो. स. कुकुड कोंबडा. अ. पु.

**भर्ग:** भर्ज्यंतेकामादयोनेनेतिभर्गः, भाजले आहेत कामादिक वैरी जानें तो. कृ. भ्रजीधा. भर्जनअ. महादेव. अ. पु.

**भर्ता** बिभर्तीतिभर्ता, पोषण करणारा जो तो. कृ. डुभृञ्धा. पोषणअ. नवरा. ऋ. पु. धारण करणारा. ३ पोषण करणारा. वि. ऋ. पु. न. ई. स्त्री.

**भर्तृदारक:** ध्रियतेइतिदारकः, भर्तुः दारकः भर्तृदारकः, राजाचा आदर करितो जो तो. स. युवराजा. अ. पु.

**भर्तृदारिका** विग्रहादिपूर्वींच्या शब्दाप्रमाणें. राजाची कन्या नाटकांतील. आ. स्त्री.

**भर्त्सनं** भर्त्स्यतेइतिभर्त्सनं, तर्जनजें तें. कृ. भर्त्सधा. तर्जनअ. अपकारार्थक भाषण. अ. न.

**भर्म** बिभर्तीतिभर्म, पोषण करितेजें तें. कृ. डुभृञ्धा. पोषणादिअ. सोनें. २ वेतन. न्. न.

**भल्ल:** भल्लतेइतिभल्लः, हिंसा करितो जो तो. कृ. भल्लधा. हिंसाअ. आस्वल. अ. पु. २ कल्याण. अ. न.

**भल्लातकी** भल्लइवअततीतिभल्लातकी, कल्याणातें निरंतर प्राप्त करित्ये जी ती. कृ. अतधा. सातत्यगमनअ. भिलावा. अ. पु. ई. स्त्री.

**भल्लुक:** भल्लतेइतिभल्लुकः, हिंसा करितो जो तो. कृ. भल्लधा. हिंसाअ. आस्वल. अ. पु.

**भल्लूक:** विग्रहादिसर्वपूर्वींच्याशब्दाप्रमाणें.

**भव:** भवतेइतिभवः, स्वरूपप्राप्ति करितो जो तो. कृ. भूधा. प्राप्तिअ. महादेव. २ उत्पत्ति. अ. पु.

**भवनं** भवंतिअस्मिंतिभवनं, उत्पन्न होतात ज्याचेठायीं तें. कृ. भूधा. सत्ताअ. घर. अ. न.

**भवानी** भवस्यस्त्रीभवानी, भव म्ह. शंकर त्याची जी पत्नी ती.

स्वीय. पार्वती. ई. स्त्री.

**भाविकं** प्रशस्तोभवोभद्रमत्रा-स्तीति भाविकं, उत्कृष्ट आहे कल्याण प्राप्ति ज्याचेठायीं तें. त. कल्याण. अ. न.

**भाविता** विग्रहादिभूष्णूशब्दाप्रमाणें. होणारा. वि. ऋ. पु. न. ई. स्त्रीलिं.

**भाविष्णुः** विग्रहादिभविताशब्दाप्रमाणें. उत्पन्न होणारा. वि. उ. पु. स्त्री. न.

**भव्यं** भवनार्हं भव्यं, भवना विषयीं जें योग्य तें. त. कल्याण. २ फलकार्य. अ. न.

**भषकः** भषतीतिभषकः, भों कतो जो तो. कृ. भषधा. हिंसा अ. कुत्रा. अ. पु.

**भस्त्रा** भस्यतेअनयाभस्त्रा, अग्न्युद्दीपन करिजेतें जीणें करून ती. कृ. भसधा. दीप्तिअ. विस्तव पेटविण्याचा चामड्याचा भाता. आ. स्त्री.

**भस्मगंधिनी** भस्मनोगंधःसोस्यास्तीतिभस्मगंधिनी, भस्माचा जो गंध म्ह. सुवास तो आहे जीस ती. त. सुवासिक द्रव्यविशेष. ई. स्त्री.

**भस्मगर्भा** भस्मगर्भोयस्याः सा भस्मगर्भा, भस्म आहे गर्भाचेठायीं जीच्या ती. स. शिसव्याचें झाड. आ. स्त्रीलिं.

**भा** भानंभा, दीप्ति जी ती. कृ. भा. धा. दीप्तिअ. कांति. आ. स्त्री.

**भागः** भज्यतेइतिभागः, सेवन करिजे तो जो तो. कृ. भजधा. सेवाअ. अंश. अ. पु.

**भागधेयं** भागएवभागधेयं, भागजो तेंच त. दैव. अ. न. २ सरकारसारा. अ. पु.

**भागिनेयः भागिनेयी** भगिन्याः अपत्यंभागिनेयः, भगिनीचा जो पुत्र तो. त. बहिणीचा पुत्र व कन्या. अ. पु. २ ई. स्त्री.

**भागीरथी** भगीरथस्यापत्यंस्त्री भागीरथी, भगीरथाची जी कन्या ती. त. गंगा नदी. ई. स्त्री.

**भाग्यं** भज्यतइतिभाग्यं, सेविजेतें जें तें. कृ. भजधा. सेवाअ. दैव. २ जन्मांतरीयसुभासुभकर्म. ३ ऐश्वर्य. अ. न.

**भागीनं** विग्रहादिभंग्यशब्दाप्रमाणें. भांग उत्पन्न होण्याचें शेत. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भाजनं** भाजयतीतिभाजनं, विभाग करणारें जें तें. कृ. भाजधा. पृथक्कर्मअ. भांडें. अ. न.

**भांडं** भंडतातिभांडं, कल्याण किंवा सुख देतें जें तें. कृ. भंडिधा. कल्याणसुखअ. भांडें. २ भूषण. ३ घोड्याचा अलंकार. ४ वाण्याचें मूळ भांडवल. अ. न.

**भाद्र:** भद्राभ्यांयुक्ताभाद्री साअस्मिन्‌सभाद्र:, भद्रायुक्त जी पौर्णिमा ती आहे ज्याचेठायीं तो. त. भाद्रपदमास. अ. पु.

**भानु:** भातीतिभानु:, प्रकाशमान जो तो. कृ. भाधा. दीप्तिअ. सूर्य. २ किरण. उ. पु.

**भामिनी** अवश्यंभामतेइति भामिनी, अवश्य क्रोध करणारी जी ती. कृ. भामधा. क्रोधअ. रागीट बायको. ई. स्त्री.

**भार:** विग्रहादिभरशब्दाप्रमाणें सोन्याच्या वीस तुला. २ बत्तीस पायल्या. अ. पु.

**भारतं** विग्रहादि भरतशब्दाप्रमाणें. भरतखंड. २ नटवा. अ. पु.

**भारती** विश्वानिभूतानिभ्रियंतेनयाभारती, विश्वें जीं तीं पालन करितां हेत जीणें ती. कृ. भृञ्‌धा. भरणअ. सरस्वती. ई. स्त्री.

**भारद्वाजी** भरद्वाजमुनेरियंभारद्वाजी, भरद्वाज मुनीची जी होती ती. त. रान कापशीण. ई. स्त्री.

**भारयष्टि:** भारस्ययष्टि: भारयष्टि:, भार धरण्याची जी यष्टि ती. स. खुंटी. इ. स्त्री.

**भारवाह:** भारं वहतीतिभारवाह:, भारातें वाहणारा जो तो. कृ. वहधा. प्रापणअ. हेलकरी स. हमाल. अ. पु.

**भारिक:** भारोवाह्यत्वेनास्तीति भारिक:, भार वाह्य आहे जास तो. हमाल. अ. पु.

**भार्गव:** भृगोरपत्यंभार्गव:, भृगूचें जें अपत्य तो. त. शुक्राचार्य. अ. पु.

**भार्गवी** भृगोरियंभार्गवी, भृगूची जी होती ती. त. दूर्वा. ई. स्त्री.

**भार्गी** भर्गस्यइयंभार्गी, भर्गस्य·

शर्वेत्याच्या जी प्रिय ती. त. भा रंगाचें झाड. ई. स्त्री.

**भार्या** भ्रियतेसाभार्या, पोषण करिजेत्ये जी ती. क्रु. डुभृञ् धा. धारणादृअ. विवाहितबायको. आ. स्त्री.

**भार्यापती** भार्याचपतिश्च भार्यापती. अर्थदंपतीशब्दाप्रमाणें. बायको आणिनवरा. इ. पु.

**भालुकः भाल्लूकः** भल्लतेइतिभल्लुकः स एवभाल्लुकः हिंसा करितो जो तो. भल्लुकतोच भाल्लुक. क्रु. भल्लुधा. हिंसा अ. आस्वल. अ. पु.

**भावः** भावयतीतिभावः, सत्ता करितो जो तो. क्रु. भूधा. सत्ताअ. सत्ता. २ स्वभाव. ३ अभिप्राय. ४ चेष्टा. ५ आत्मा. ६ जन्म. ७ मनोविकार. ८ विद्वान. अ. पु.

**भावित** भाव्यतेस्मभावितं, प्राप्त झालें जें तें. क्रु. भूधा. प्राप्तिअ. सुगंधि. २ मिळालेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भावुकं** भवतीतिभावुकं, होतें जें तें. क्रु. भूधा. सत्ताअ. कल्याण. अ. न.

**भाषा** भाष्यतेस्तूयत इति भाषा. स्तवन करि जेत्ये जी ती. क्रु. भाषधा. व्यक्तवाणिअ. सरस्वती. आ. स्त्री.

**भाषित** भाष्यतेस्मभाषितं, भाषण करिजेलें जें तें. क्रु. भाषधा. व्यक्तवाकूअ. भाषण. अ. न. २ बोललेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भाष्यं** भाष्यतेसूत्रार्थोयेनइति भाष्यं, सूत्रार्थ बोलिजेतो जेणें करून तें. क्रु. भाषधा. व्यक्तवाणिअ. पदांच्या अर्थाचें विवरण ह्मणूनसूत्राचा अर्थ ज्या ग्रंथांत वर्णन केला तो ग्रंथ. अ. न.

**भाः** भासनमितिभाः, दीप्तिजी ती. क्रु. भाधा. दीप्तिअ. कांति. स. स्त्री.

**भास्करः** भाः करोतीतिभास्करः, प्रभेतें करितो जो तो. क्रु. डुकृञ्धा. करणअ. सूर्य. अ. पु.

**भास्वान्** भाः अस्तियस्यसः भास्वान्, प्रभा आहे ज्यास तो.

न. सूर्य. तृ. पु.

**भिक्षा** भिक्षणंभिक्षा, याचना जी ती. क्रु. भिक्ष्धा. भिक्षा अ. याचना. २ चाकरी. ३ वेतन. ४ भिक्षेनें मिळालेलें वस्तु. आ. स्त्री.

**भिक्षुः** भिक्षणशीलोभिक्षुः, भिक्षास्वभाव जो तो. क्रु. भिक्षधा. भिक्षाअ. संन्यासी. उ. पु.

**भित्तं** भिद्यतेस्मइतिभित्तं, भेदन कारजेलें जें तें. क्रु. भिदृधा. विदारणअ. शकल, खंड. अ. न.

**भित्तिः** भिद्यतेइतिभित्तिः, विदीर्णहोइजेस्ये जी ती. क्रु. भिदृधा. विदारणअ. भिंत. इ. स्त्री.

**भिदा** भेदनंभिदा, भेदनजें ती. क्रु. भिदृधा. विदारण अ. द्विधाभवन. आ. स्त्री.

**भिदिरं** भिनत्तीतिभिदिरं, शत्रूंचा भेद कारितें जें तें. क्रु. भिदृधा. विदारणअ. वज्र. अ. न.

**भिदुरं** भिनत्तितत्भिदुरं, अर्थी दिपूर्वीच्या शब्दाप्रमाणें. वज्र. अ. न.

**भिंदिपालः** भिंदतीतिभिंदिः, तांपालयतीतिभिंदिपालः, स्वावयव करणाऱ्याशान्यातें पालण करणारा जो तो. क्रु. पालधा. रक्षणअ. दगड मारण्याचें एक यंत्र, गोफीण. अ. पु.

**भिन्नः** भिद्यतेइतिभिन्नः, भेद कारिजेतो जो तो. क्रु. भिदृधा. विदारणअ. विदारण केलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भिषक्** भिषज्यतीतिभिषक्, चिकित्सा कारितो जो तो. क्रु. भिषज्धा. चिकित्साअ. वैद्य. तृ. पु.

**भिस्सटा** भिः सांटीकतेभिस्सटा, निंद्यान्नाप्रत गमन कारित्ये — जी ती. क्रु. टीकृधा. गतिअ. जळालेलें अन्न, करप. आ. स्त्री.

**भिस्सा** बभस्तीतिभिस्सा, दीप्ति कारित्ये जी ती. क्रु. भसधा. दीप्तिअ. अन्न. आ. स्त्री.

**भीः** विग्रहादभीतिशब्दाप्रमाणें भय. ई. का. स्त्री.

**भीतः** विग्रहादभीरुशब्दाप्रमाणें. भित्रा. २ भियालेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भीतिः** भायनेइतिभीतिः, भयजें ती. कृ. ञिभीधा. भयअ. भय. इ. स्त्री.

**भीमः** बिभेत्यस्मादितिभीमः, भयपावतें जा पासून तो. कृ. ञिभीधा. भयअ. महादेव. २ भयानक नामारस. अ. पु. ३ भयंकर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भीरुः भीरुकः** भयशीलो भीरुः, भयस्वभाव जो तो. कृ. ञिभीधा. भयअ. भित्रा. वि. उ. पु. स्त्री. न. २ वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भीलुकः** नियहादपूर्वोच्याशब्दाप्रमाणें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भीषणं** भीषयतइतिभीषणं, भयातें करणारें जें तें. कृ. ञिभी धा. भयअ. भयानक नामारस. २ भयंकर. वि. अ. पु. न. आ. स्त्रीलिं.

**भीष्मं** बिभेत्यस्मादितिभीष्मं, शत्रूभितो जा पासून तो. कृ. ञिभीधा. भयअ. शंतनूचा पुत्र. अ. पु. २ भीषण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भीष्मसूः** भीष्मंसूतेसाभीष्मसूः, भीष्मातें प्रसवणारी जी ती. कृ. षूङ्धा. प्राणिगर्भविमोचनअ. भागीरथी नदी. ऊ. स्त्री.

**भुक्तं** भुज्यतेस्मभुक्तं, भक्षण करिजेलें जें तें. कृ. भुजधा. अभ्यवहारअ. भक्षित. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भुक्तसमुज्झितं** पूर्वंभुक्तंपश्चात्समुज्झितंभुक्तसमुज्झितं, पूर्वी भुक्त करून मग टाकिजेलें जें तें. स. प्रथम भोगून नंतर टाकलाजो तो. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भुग्नं** भुनक्तिस्मभुग्नं, कौटिल्य ग्रहण करितें झालें जें तें. कृ. भुजो धा. कौटिल्यअ. वांकडा. २ व्याधित किंवा भग्न झालेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भुजः** भुज्यतेनेनभुजः. भक्षण करितें जेणेंकरून तो. कृ. भुज धा. पालनादिअ. हात. अ. पु.

**भुजगः** भुजतीतिभुजः सर्पदेहस्तेनगच्छतीतिभुजगः, कौटिल्ययुक्त देहानें गमन करणारा जो तो. कृ. गम्लृधा. गतिअ.

सर्प. अ. पु.

**भुजंगः** विग्रहादिसर्वपूर्वींच्या शब्दाप्रमाणें.

**भुजंगभुक्** भुजंगंभुंक्तेभुजंगभुक्. सर्प भक्षण करणारा जो तो. क्रु. भुजधा. भक्षणअ. मयूर. ज्. पु.

**भुजंगमः** विग्रहादिसर्वभुजगशब्दाप्रमाणें.

**भुजंगाक्षी** भुजंगानक्षतीति भुजंगाक्षी, भुजंगांनें व्याप्त करित्ये जी ती. कृ. अक्षूधा. व्याप्तिअ. मुंगुसवेल. ई. स्त्री.

**भुजशिरः** भुजस्यशिरोभुजशिरः. भुजांचें मस्तक जें तें. स. खांद,खांदा. स. न.

**भुजांतरं** भुजयोअंतरंभुजांतरं, भुजांचें जें अंतर ह्म. मध्य तें. स. वक्षस्थळ. अ. न.

**भुजिष्यः** स्वाम्युच्छिष्टंभुंक्तेभुजिष्यः. स्वामीचें उच्छिष्ट भोजन करितो जो तो. कृ. भुजधा. अभ्यवहारअ. चाकर. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**भुवनं** भवंत्यस्मात्सर्वेइभुवनं, संपूर्ण उत्पन्न होतें ज्यापासून तें. कृ. भूधा. सत्ताअ. भूतल. २ उदक. अ. न.

**भूः** भवतीतिभूः, उदकापासून उत्पन्न होत्ये जी ती. कृ. भूधा. सत्ताअ. भूमि. ऊ. स्त्री.

**भूतः** भूतिरस्यास्तीतिभूतः, ऐश्वर्य आहे ज्यास तो. त. पिशाच. अ. पु. २ सारखा. ३ लब्ध. ४ प्राणी. ५ अतीत झालेला. ६ युक्त. ७ वि. अ. पु. न. आ. स्त्री. ७ पृथिव्यादि पंच महाभूतें प्रत्येक. ८ सत्य. अ. न.

**भूतकेशः** भूतानांकेशाइव केशायस्य भूतकेशः, भूतांचा केशासारिखे आहेत केश ज्याचे तो. स. जटामांशी. अ. पु.

**भूतावासः** भूतानांआवासः भूतावासः, पश्व्यादिकांचें जें स्थान तो. त. बेहडेचें झाड. अ. पु.

**भूतयज्ञः** भूतानांयज्ञः भूतयज्ञः, भूतादिकांचा जो यज्ञ ह्म. पूजन तो. स. बलिहरणादि. अ. पु.

**भूतवेशी** भूतानिविशंतीतिभू

